# रावबहादुर नाना मोरोजी, मुंबईचे माजी माजिस्ट्रेट यांचें चरित्र.



हें पुस्तक




गणेश हरि भिडे,

एलफिन्स्टन् मिडल् स्कुलांतील शिक्षक,

यांनीं तयार करून

मुंबईंत

जावजी दादाजी यांच्या "निर्णयसागर" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.



सन १८९६.

किंमत १२ आणे.

# रावबहादुर नाना मोरोजी.



जन्म.
१८ मार्च, इ० स० १८२२.

मृत्यु.
१२ मे, इ० स० १८९५.

हें पुस्तक

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

**सर्जन मेजर**

**कान्होबा रणछोडदास कीर्त्तिकर,**

**ठाणें जिल्ह्याचे सिव्हिलसर्जन,**

फेलो ऑफ् धि बाँबे युनिव्हर्सिटी, फेलो आफ् धि लिनिअन सोसाइटी; आणि भक्तिसुधा, विलाप-लहरी, इंदिराकाव्य, रामदासवचनामृत, ज्ञानेश्वरवचनामृत, डार्विनाचें चरित्र, इत्यादि पुस्तकांचे कर्त्ते,

**यांप्रत**

चरित्रनायकांची बहुगुणसाम्यता यांच्यामध्यें पाहून ग्रंथकारानें सानुमतें सप्रेम अर्पण केलें असे.

# प्रस्तावना.



प्रस्तुतकाळीं बहुत स्त्रीपुरुषांच्या वाचनाच्या पुस्तकांमध्यें थोर पुरुषांच्या चरित्रांचा समुदाय माझ्या मतें इतर प्रकारच्या पुस्तकांच्या मानानें फार कमी आहे, त्यास अंशतः भर पडावी आणि रावबहादुर नाना मोरोजी यांच्या थोरपणानें, निष्कलंक आचरणानें, शांत वृत्तीनें व सुविचारानें माझ्या मनास जसा चटका लावून सोडिलें आहे, त्याचप्रमाणें माझे वाचकांच्याही मनाची स्थिति होईल असें वाटल्यावरून त्यांचें चरित्र लिहिण्याचा हा मीं यत्न केला आहे. इ० स० १८७२ पासून या सत्पुरुषाचा व माझा समागम झाला; त्या दिवसापासून शेवटपर्यंत ते किंवा मी आजारी असल्याशिवाय बहुतकरून दररोज निदान अर्धा तास तरी आपआपल्या सुखासंतोषाच्या गोष्टी झाल्याशिवाय एकही दिवस गेला नाहीं. त्यांचा हेतु काय असेल त्याचा माझ्यानें तर्क करवत नाहीं, परंतु त्यांच्याशीं संभाषणांत वेळ गेला तो कांहीं तरी नवी गोष्ट शिकण्यामध्यें सत्कार्यीं खर्च झाला असें मला दिवसेंदिवस फार वाटूं लागलें. कांहीं दिवसांनीं या संभाषणांनंतर घरीं जाऊन विशेष महत्वाच्या गोष्टी मी स्मरणवहींत टांचून ठेवूं लागलों. कांहीं वर्षें याप्रमाणें लोटलीं. स्मरणवह्या एकामागून एक भरत गेल्या. चरित्ररूपानें त्या सर्व गोष्टी लिहाव्या असें मनांत येऊन तो विचार मीं त्यांजपाशीं प्रगट केला, त्या वेळीं त्यांनीं विषयांतर करून तत्संबंधीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. कांहीं महिने लोटल्यावर एके दिवशीं चरित्रें प्रसिद्ध कोणाचीं झालीं पाहिजेत, लोकांस कोणाचीं वाचावीशीं वाटतात व कोणाचीं वाचल्यापासून लोकांचें हित आहे या गोष्टींविषयीं आपण होऊन नानांनीं बराच ऊहापोह केला व शेवटीं नाना मोरोजींचें चरित्र लोकांना फारसें वाचनीय होईल असें वाटत नाहीं असें बोलून दाखविलें. ही माझी कल्पना वेडगळ ह्मणा किंवा

फार धाडसाची आहे असें मला त्यांनीं दर्शविलें. त्यांच्या घरांतील सर्व मुलांमाणसांमध्यें माझा फार दिवसांचा सहवास असल्यामुळें माझ्या कामास अवश्य कागद माझ्या हातीं लागण्यास मुळींच अडचण पडली नाहीं. तदनंतर बरेच वर्षांनीं मीं लिहिलेली हकीकत एके दिवशीं ऐकण्याविषयीं त्यांची विनंति केली. हंसून त्याजवर नाना ह्मणतात "एकून तुह्मीं आपला हेका पुरा केलात, संभाळा या व्यापारांत तुह्मांला घस लागण्याचें भय आहे." सर्व लेख वाचून ऐकिल्यावर नाना ह्मणाले, "अतिशयोक्तीखेरीज यांत कांहीं चूक नाहीं."

कादंबऱ्या वाचल्यापेक्षां थोर पुरुषांचीं खरीं चरित्रें वाचण्यामध्यें अधिक हित आहे याविषयीं कोणाचाच अभिप्राय द्विधा नाहीं, ह्मणून त्याविषयीं चर्चा न करितां हा ग्रंथ लोकांचे आदरास पात्र होईल अशी आशा दृढ बाळगून वाचकांस सादर करितों.

डाक्तर का० र० कीर्तिकर यांनीं माझी विनंति मान्य करून नानांच्या स्तुतिपर आपण केलेले श्लोक माझ्या स्वाधीन केले ते मी अत्यादरें खालीं देतों.

या चरित्राच्या पहिल्या भागांत "मूळपीठिका व बाळपण" या सदराखालीं जो श्लोक दिला आहे त्याच्या पहिल्या चरणांतील "भिडे" शब्दावर डाक्तरसाहेबांनीं जो एका श्लोकांत कोटिक्रम केला आहे तो त्यांच्या सूचनेवरून येथें निराळाच देत आहें.

(शार्दूलविक्रीडित छंद.)

**सत्या, ना त्यजिलें, भिडे पदरिं ते नानांहिं, हो वाहिले**
**होवोनी प्रिय त्या भिड्यां अमर ते नाना जनीं जाहले ॥**
**मोठे भक्त भिडे ! चरित्र रचिण्या सत्पात्र झाले, तरी**
**हा मानीं बहु लाभ दुःखिं सुख कीं झालें जगाभीतरीं १**

ग. ह. भिडे.

# नानास्मृतिजन्यवृत्तें.

श्लोक (शार्दूलविक्रीडित छंद.)

जन्मा येउनि थोरशा प्रभुकुळीं नाना! स्वयें राहिलां
जन्माचे अति थोर; देह अवघा सत्कारणीं वाहिला॥
झालां मान्य तुह्मी गुणी निजजनीं आबालवृद्धां सदा
धैर्यातें तुमच्या न पार दिसला; वाचा सदा सौख्यदा १
होतां हो मितभाषणी; हित परी वाणीमधीं सर्वदा,
साधोनी, उपदेशही सुलभशा गंभीर शब्दीं वदां ॥
वाणी ते मधुरा, जशी हितमिता, चिच्छांत उच्चारिली
नाहीं म्यां चतुरा, अशी अजिवरी कोणा मुखीं ऐकिली २
होता "बादशहास" तो चतुरसा मंत्री जसा "बिर्बल,"
वाटे, ऐकत वाणि तेंवि तुमची कीं, हो! तुह्मी केवल॥
आहां "बिर्बल;" "बादशाह" खुटला तेजास दावावया
चातुर्या तुमच्या, अभाविं न गमे आलें उणें, ऐशिया ३
वाटे कीं अवतारि "बिर्बल" तुह्मी चातुर्यखाणी असां
ज्ञानाचेनि बळें, नितांत निववां अत्यंत कीं तामसां ॥
वाणीचे मृदु हो जरी, न कधिंही सत्यव्रता त्यागिलें
होतां शुद्ध तुह्मी स्वयें ह्मणवुनी दुष्टां सदा जिंकिलें ४
ऐसा थोर न म्यां कधीं बघितला सन्मार्गगामी नर;
ठेवीलें निज शांत सर्व समयीं यत्नें जयें अंतर; ॥
गर्वाचा लवलेशही न जडला उत्कर्षकालीं जया
बोले माणुस कोण, 'सत्पुरुष' मी नामूं शकेंना तया? ५

नानांसारखिं माणसें विरळ तीं; प्राणी जगद्दीप हो!
त्यांच्या सोज्वल वर्त्तनीं सकल या लोकीं सदा लाभ हो ॥
नानांच्या सम लोकशुद्ध विभुती होवोन जाती जगीं
सन्मार्गाप्रति लाविणें निजजनां ही सर्व त्यां जिंदगी ६
कन्या चार, सुपुत्र आठ असुनी भार्येसवें भोगिलें
सौख्यानें सकलायु जैं पदरिं त्यां अंतीं उणें पावलें. ॥
दारापुत्रवियोगवन्हिमधुनी जैं तप्त व्हावें मन
तें ना होउन शांतले उलट तैं नाना महा सज्जन ७
नानांहीं भगव्या न संतवसना दुःखांतिं स्वीकारिलें
जात्या ते परि शुद्धबुद्धि समजा; दुःखें न ते कष्टले ॥
लक्ष्मी हे अति चंचला, सतत या जैं पाळियेलें ब्रिदा
त्या नानां गमली अयोग्य मिलिता नाहीं कदा सौख्यदा ८
देवें जें दिधलें सुखी तथिं पुरा जो राहिला सर्वदा
ऐशा श्रेष्ठ नरा सदा स्मरुनियां पाळा तयाच्या ब्रिदा ॥
नानांच्या सम थोर लोक असती भूमंडळीं दुर्मिळ
जाणा, घ्या, पदरीं, तदानुकरणें जें इष्ट तें सत्फळ ९

शिखरणी छंद.

बघोनी स्वज्ञातीजन सुहृद, वा, दीन दुबळे
सदा ज्याचें अंतःकरण अति दुःखें कळवळे ॥
यथाशक्त्या जेणें निजपरकरीं साह्य दिधलें
सुवंद्यां नानां त्यां अखिल जनिं स्यां श्रेष्ठ गणिलें १०
सदा नानांची हो प्रभुजन! धरा चिर्त्ति करणी
स्मरा त्यांची सारी स्वपरजनसेवेंत सरणी ॥

तयांचें व्हा तेणें तिळहि उतराई तुह्मि भले
जनांच्या सेवेचे सुपथ तयिं दावोन दिधले ११

शार्दूलविक्रीडित छंद.

ज्या कालीं गृहिं लक्ष्मि नांदत असे त्या कालिं दीनां जनां
चा कर्तृत्व कदाहि ना विसरला; जैं आवरोनी मना ॥
श्रीमंती न कदा वृथा मिरवली सौजन्य स्वीकारिलें
तो झाला बहुमान्य हो नरगणीं हें पाहिजे जाणिलें १२

---

# अनुक्रमणिका.

# नाना मोरोजी यांचें चरित्र.

## भाग १

### मूळपीठिका व बाळपण.

॥ सत्या सांडु नको, भिडे धरुं नको, सन्मार्ग सोडूं नको ॥
॥ खोटा पक्ष धरूं नको, प्रियजनीं द्वेषास जोडूं नको ॥
॥ खोटें कर्म करावयास्तव कधीं लालूच घेऊं नको ॥
॥ काम क्रोध तसाच लोभ तिसरा चित्तांत ठेवूं नको ॥ १ ॥

संसारांत राहून अलिप्त, तीव्रबुद्धि, दयाळू, मनुष्यस्वभाव जाणणारा, इत्यादि गुणांनीं अखंड मंडित न्यायाधिश असावा. न्याय करतांना मी या जगांतील मनुष्य नव्हे अशी कल्पना करून तदनुसार वागण्याचें जर सामर्थ्य न्यायाधीशामध्यें नसेल तर त्याचें मन अनेक कारणांवरून कलुषित होऊन कोणत्यातरी पक्षाचें त्याच्या हातून अनहित होण्याचा फार संभव असतो. आपल्या सर्व ऐहिक वरिष्ठांपेक्षां परमेश्वराची भीति त्याच्या मनांत चिरकाल जागृत असली पाहिजे, नाहींतर वरिष्ठांबद्दल तरी त्याच्याहातून तरफदारी होण्याची धास्तीच. असा गुणसंपन्न न्यायाधीश या भूतलावर मिळणें दुरापास्तच, तरी आपल्या समजुतीप्रमाणें वागणारा, पापभीरू असला ह्मणजे आपल्या कोत्या बुद्धीच्या माणसांचें काम झालें.

हे वरील विचार दिवाणीन्यायाधीशाच्या संबंधानें जितके मनांत येतात, त्याच्यापेक्षां ते सहस्रपट नेटानें

फौजदारीन्यायाधीशाच्या कामांत येतात, ही गोष्ट कोणासच नाकबूल होणार नाहीं. वित्तापेक्षां जीविताचें महत्व कोणास अधिक वाटत नाहीं ?

या काल्पनिक न्यायाधीशाचा जवळ जवळ उतारा रावबहादूर नाना मोरोजीपेक्षां क्वचित् माणसांमध्यें आमच्या पहाण्यांत आला. फोरजेटसाहेब मुंबईचे पोलिसकमिशनर व नाना मोरोजी माजिस्त्रेट हे आज आबालवृद्धांच्या तोंडीं मुंबईंत आहेत. बदमाश लोकांच्या तर आंगावर हीं नांवें ऐकून आज कांटा उभा रहात आहे. लफंगे लोकांमध्यें नाना मोरोजी हा कडक व खरें निवडणारा माजिस्त्रेटवाचक सामान्य शब्द होऊन बसला आहे. "अरे जा तीनदां मी नाना मोरोजीच्या ( माजिस्त्रेटाच्या ) हातून सुटून आलों आहें तो तुला भितों का ?" असे उद्गार साधारण रस्त्यावर कांनीं अद्याप येतात. हेच गृहस्थ आमचे चरित्रनायक होत.

इ० स० १७२८ या वर्षी रामजी नामक पुरुष मुंबईशहरीं जन्मला. ह्या सत्पुरुषापासून तिसऱ्या पिढीचा पुरुष मोरोजी. या पुरुषास इंग्रजसरकारच्या पदरीं कमिसरीखात्यांत नौकरी होती. यास मुंबई सोडून बाहेरगांवीं ह्मणजे पुणें, सोलापूर, नगर, धुळें, मालेगांव वगैरे ठिकाणीं फिरावें लागत असे. यास पगार सुमारें पन्नासपासून शंभर या दरम्यान असावा; यास पुत्र दोन. थोरल्या मुलाचें नांव पिलाजी. ते पिलाजीकाका या नांवानें प्रसिद्ध होते. इंग्रजसरकाराकडून झाल्या नौकरीबद्दल वृद्धापकाळीं इहलोकींच्या संसारसंबंधी खटपटी दूर ठेवून

स्वस्थ बसावें आणि आजपर्यंत संपादित ज्ञानभांडाराच्या पायावर काल्पनिक इहलौकिक किंवा पारलौकिक इमारती बांधाव्या ह्मणून कांहीं वेतन (पेन्शन्) मिळत असतें, त्याप्रमाणें त्यांस मिळत होतें. धाकट्या मुलाचें नांव नाना. हाच पुरुष या लेखाचा विषय आहे.

या मुलाचा जन्म मुंबईमध्यें इ० स० १८२२ सांत मार्च महिन्याच्या १८ वे तारखेस गुरुवारीं सकाळीं सूर्योदयाच्या सुमारास झाला. रात्रीच्या सुखावह झोपेनें प्रातःकाळीं मनुष्याची चित्तवृति जशी शांत असते, तद्वत् हे गृहस्थ शांत, विचारी, आणि गंभीर असत. बृहस्पतवारीं जन्म असल्यामुळेंच बृहस्पती निपजले कीं काय कोण जाणे. हें निर्जीव मूल पुढें ज्ञानसंपन्न होऊन इंदूरसारख्या बड्या संस्थानचा दिवाण होईल असें आईच्या मनांत आलें असेल काय? बी फोडल्यावर आंत जो पानासारखा हिरवट भाग दिसतो, त्याचा पुढें प्रचंड वृक्ष होणार असें कोणाच्या मनांत येणार? आई तान्हेपणींच परलोकवासी झाली असल्यामुळें नानास मातावियोगाचें दुःख मनांतच आणतां येत नव्हतें. असो. आजमितीस वृद्धापकाळीं या पुरुषाचें बाह्यस्वरूप व बांधा कसा असेल याची वाचकांच्या मनांत कांहींतरी जवळ जवळ कल्पना यावी ह्मणून चार शब्द लिहितों.

हे उंच पुरुषांत मोडले जात. ताळवेवरील केश पातळ होऊन बरेंच खलवाट पडलेलें होतें. ब्राह्मणींतऱ्हेची शेंडी, ह्मणजे गाईच्या पावलाएवढी. स्वाभाविकच कपाळ उंच व रुंद; त्यामध्यें एक आडवी सुरकुती. भोंवया

ऱ्याच लांब व डोळे वृद्धापकाळामुळें जरा खोल; तथापि पाणीदार व फार सूक्ष्म व भेदक. डोळयांखालचे खुब्यांचीं हाडें उंच. गाल बसलेले. मिशी जाड तरी गालावर मोठाले कल्ले नाहींत. केंस वळवितां येतील इतके लांब नाहींत. कांहीं दंत शिथिल झाल्यामुळें सोन्याच्या तारेनें बांधलेले. पुढील दांत ठिकाणीं असल्यामुळें वर्णोच्चार स्पष्ट, नाक उच्च व सरळ, तथापि गरुडाच्या चोंचीसारखें नव्हे. पुढचा भाग जरा जाड व चपटा; तेणेंकरून हास्यमुख नसतें तेव्हां सर्व मुद्रा विलक्षण गंभीर, विचारी, पाणीदार व मोहक दिसते. अगदीं अपरिचित मनुष्यास जरी अशी मुद्रा प्रथमदर्शनीं दिसली तरी सलोख्याचा स्नेही किंबहुना ओळखी, यांच्या भेटीअंतीं तीच मुद्रा प्रफुल्लित, भव्य, आणि संभाषणेच्छु व सदोदित आनंदीच असते असा भास होतो. मान उंच, शरीराचा बांधा सडपातळ, उभार व तरतरीत. शरीरांत मांसाची आसि. दिसण्यांत हाडगळ. थंडीच्या दिवसांत शरीरास कफाची धास्ती व आमांशानें तर हें आपलें वसतिस्थानच केलें कीं काय कोण जाणे; इतकेंही असून नियमित वर्तनानें हे सर्व रिपू आपल्या कह्यांत ठेवलेले होते.

ह्या कुटुंबाचें नांव त्रैलोक्यकर. आरंभीं यांना राहण्यास एक नियमित स्थान नव्हतें. मिळेल जागा तेथें यांणीं त्रैलोक्यांत रहावें. अशी मूळपुरुषाची दशा असल्यामुळें हें नांव प्राप्त झालें काय? हल्लीं हे लिहितांना त्रिलोकेकर असा अपभ्रंश करून लिहितात.

हे आपणांस पाठारे प्रभु ह्मणवितात, पाठारगांवचे, कारण कायस्थ ह्मणून एक प्रभु आहेत, त्यांची वस्ती मुंबईच्या बाहेर फार आहे, व हे मूळचे मुंबईकर. आतां धंद्याच्या संबंधानें क्वचित् अन्यत्रही आढळतात. हे लोक मुंबईच्या बाहेर फारकरून स्थायिक होऊं इच्छित नाहींत. प्रभु ह्मणजे राजकुळांतील पुरुषांस ह्मणण्याची चाल आहे. हे आपणांस क्षत्रिय ह्मणवितात, परंतु अलीकडे शिपाईबाण्याचें त्यांच्यामध्यें कांहीं एक चिन्ह दिसत नाहीं. या लोकांना तालमीचा नाद फार क्वचित्. शारीरिक मेहनत नीच मानतात. फार दिवसांपासून यांचा धंदा कारकुनीचा.

पन्नासएक वर्षांपूर्वी या लोकांची रीतभात अगदीं ब्राह्मणांसारखी असे. घरांतील संसारसंबंधी सर्व काम चाकरांसंगतीं बायकांनीं व पुरुषांनीं करावयाची वहिवाट फार. गडी असले तरी भूषणदायक, स्वैंपाक करण्यास ब्राह्मण असले तरी त्यांच्यावर तें काम फारच कमी पडे. पुरुषांनीं सकाळीं मुखमार्जन झाल्यावर स्नान करून त्रुटक संध्यादि पाठ करावा. आपलीं धोतरें आपण धुवावीं. तांब्या पंचपात्री वगैरे भांडीं आपलीं आपणच घांसावीं. कारण गड्याच्या हातचें काम सोवळ्यांत चालत नसे आणि संसारसंबंधी घराबाहेरील मात्र काम आपण त्याच्याकडून करवावें. फारसें चाकरांवर अवलंबून राहण्याची चाल नसे. फार श्रीमान् घराण्यांतील ही गोष्ट नव्हे, तरी सांगण्याची गोष्ट इतकीच कीं, अशीं आपल्या घरचीं कामें आपणच करण्यास त्यावेळीं लोकांस

हलकेपणा वाटत नसे. धर्मबंधनाची शिथिलता झा-
ल्यामुळें तीं कामें आतां कोणीं केलीं तरी चालतात.
प्रस्तुत या चालीमध्यें बराच फरक पडत चालला आहे,
तो आमच्या प्रस्तुत चरित्रांत हळु हळु वाचकांच्या दृ-
ष्टीस पडेल.

नानांचे सहा चुलते होते. सर्वांना नोकऱ्या होत्या.
त्यांमधून ह्या मुलाचें संगोपन एकाच्या हातीं पडलें.
त्याचें नांव नारायण शंकोबा. दुर्दैवानें ह्मणा किंवा सुदै-
वानें ह्मणा, नानांच्या मातोश्रीस लवकरच देवाज्ञा झाली.
वडील तर नौकरीच्या संबंधानें बाहेरगांवीं रहात असत.
खर्चाकरितां व उभयमुलांच्या शिक्षणाकरितां कांहीं नि-
यमित रकम नारायणरावांस पोंचत असे. याखेरीज बा-
पाचा मुलाशीं कांहीं संबंध नाहीं असें ह्मटल्यास फारशी
चूक होणार नाहीं. नारायणराव जात्या मनुष्य हुशार,
इमानी, पोक्त, ममताळू व प्रेमळ असत. मुलास घरा-
मध्यें फार लळा ह्मणजे या पुरुषाचा. काकानें मात्र या
अशक्त मुलाचें वेळोवेळीं फार कौतुक करीत असावें.
मुलाची बुद्धि, धूर्तता, काम करण्याची हौस हीं पाहून
नारायणरावांस या मुलावांचून चैनच पडूं नये. हा मु-
लगा नारायणराव बोलत असतील तेथें त्यांच्याजवळ
असे. काय बोलतात तें लक्षपूर्वक ऐकावें. आणि ती
बैठक उठल्यावर कांहीं वेळानें त्यांस गत संभाषणाविषयीं
कांहीं चमत्कारिक प्रश्न करावे. एवढ्याशा लहान मु-
लाचें वडील मनुष्यें काय बोलतात त्याकडे इतकें लक्ष
व चौकसपणा ! चुलत्याचे मनास वारंवार वाटे कीं,

अशी बुद्धि उदयास येण्याचा संभव नाहीं. कारण मुलगा पडला अशक्त. अगदीं कागदी जवान.

तथापि नानाच्या चुलत्यानें या दुर्बळ मुलाची जिज्ञासा सौम्यपणानें त्याच्या पृथक् पृथक् प्रश्नांचीं वेळोवेळीं समर्पक उत्तरें देऊन लहानपणापासून वाढविली. मूल जितकें जिज्ञासू व चौकस तितकें हुशार व तीव्रबुद्धि ह्मणून समजावें; अशा मुलाची कठोर शब्दांनीं आशा भंग न करितां त्याच्या जिज्ञासेला वडिलांनीं व गुरूनीं वृद्धिंगत करण्याचा पदोपदीं यत्न केला पाहिजे. जान स्टयुअर्ट मिल्ल याला जें वळण त्याच्या बापानें लाविलें, तसलाच कित्ता नारायणरावांनीं नानाकडून गिरविला ह्मटलें तरी चालेल.

नानाला सातवे वर्षीं शाळेंत घातला, पण नारायणरावांस भावाच्या मुलाची फार धास्ती. विद्याभ्यासानेंच याच्या जिवास कांहीं धोका येईल कीं काय कोण जाणे. त्यांनीं त्यास नेहमीं ह्मणावें कीं, नाना तूं फार अभ्यास करूं नको. कारण ह्या तुझ्या प्रखर अभ्यासापासून कोणत्यावेळीं काय विपरीत होईल याचा नेम नाहीं. पण नानानें कधींही घरीं राहूं नये. चुलता कचेरीस गेला कीं घरांत आपलें ह्मणण्यासारखें कोणीं नाहीं, तेव्हां त्यास शाळेंतच कर्मणूक चांगली होत असे. घरांत चुलती होती, पण ती असली तरी चुलती. आईची सर येणार नाहीं. कारण,

मातासमं नास्ति शरीरपोषणं
भार्यासमं नास्ति शरीरतोषणं ।

विद्यासमं नास्ति शरीरभूषणं
चिंतासमं नास्ति शरीरशोषणं ॥ १ ॥

या कव्योक्तीस अपवाद येईल अशीं फार विरळा स्थळें आढळतील.

लहानांनीं वडील मनुष्यांच्या उलट बोलणें ही गोष्ट तर त्यावेळीं व विशेषेंकरून तर यांच्या घरांत मुळींच माहीत नव्हती. लहानामध्यें कोणी वडील आले असतां त्यांनीं मर्यादेनें उठून उभें रहावें, किंवा एका बाजूस व्हावें अशी रीत असे. भोजनास सर्वांनीं एकपंक्तीस जमावें. भोजनास आरंभ झाल्यावर काकांच्या शब्दाशिवाय एकाचाही शब्द ऐकूं येऊं नये. पानावर पडेल तें खावें आणि उठून जावें. एखाद्याचा एखादा पदार्थ लौकर संपला तर त्यास तो मागण्याची अरुता नाहीं. पुन्हा तो पदार्थ वाढावयास येईल त्यावेळीं मागून घ्यावा. प्रहिल्या वाढपालाच एखाद्यानें एखादा पदार्थ नको ह्मणतां कामा नये. नको असल्यास दुसऱ्यानें घेऊं नये. अशा नियमांनीं बद्ध आमचे नायक घरीं असत. शाळेंत तर नियामक पुरुषांच्याच हाताखालीं सर्वांप्रमाणें सर्व वेळ घालवणें त्यांस भाग पडत असे. तात्पर्य, ह्या लहान मुलास अगदीं लहानपणापासून एका प्रकारचा सोज्वळ व पद्धतवार आणि अनुकरणीय कित्ता मिळाला. जी शिस्त घरीं तीच दारीं. बरें, अंगीं थोडा अल्लडपणा असावा तर मुलगा पडला कागदी. यामुळें झालें काय कीं आपल्यामुळें इतरांस जेवढा कमी त्रास देववेल तितका देण्यास तो झटत असे.

"कोंवळें झाड नि ओलें मडकें" वळवावें तसें वळतें. जो गुण लहानपणीं लागला तोच शेवटपर्यंत आंगचा बनून गेला. याचीं अनेक उदाहरणें उत्तरोत्तर आमच्या वाचकांच्या नजरेस येतील. याची सर्व थोरवी नारायणरावांस. या मुलाच्या अंगीं काम करण्याची हौस, वडील मनुष्यांच्या शब्दांवर भरवसा, इत्यादि गुण लहानपणींच अलौकिक होते. वडील माणसांनीं कांहीं सांगितलें कीं तें पुटपुटल्याखेरीज हा करूं लागलाच. त्याच्यावर याचा प्रश्न कधींच यावयाचा नाहीं. ही गोष्ट शेजारच्या मनुष्यांसही माहीत झाली. नारायणरावांनीं या मुलाचे कांहींना कांहीं गुण आपल्या स्नेहीमंडळीजवळ वाखाणावे. त्यामुळें लोकांनाही थट्टेला ह्मणा, किंवा मौजेला ह्मणा हा एक विषयच झाला होता. एके दिवशीं कांहीं मंडळी नारायणरावाच्या ओसरीवर गप्पा मारीत बसली होती, इतक्यांत हें अशक्त मूल चुलत्याचे मागें आहेच. पंढरपूरच्या गोष्टी निघाल्या. पंढरीचा महिमा वर्णन करीत आहेत. तेथील तो भजनाचा तडाका! संतांचा मेळा! गोपाळांचा डाव! बडव्याचे तोबे! दर्शनाची मारामार! इतक्यांत एक ह्मणतो, आपण पंढरपूर अद्याप पाहिलें नाहीं. दुसरा ह्मणतो, असें महास्थान पाहिलें नाहीं त्याचें जिणें व्यर्थ. चवथा ह्मणतो, चला, आपण जायाचा बेत करूं या. नारायणराव ह्मणतात, चला बापडे. नाना हळूच कानाशीं लागून ह्मणतो, कोठें काकाजी? त्यांतीलच एक मनुष्य ह्मणतो, अरे बाबा पंढरपुरास हो. तूं येतोस का? जा, येत असलास तर

घरांत विचारून ये. इतकें ह्मणतात तों नाना गेला माजघरांत. आपला अंगरखा, टोपी, विजार घेतली, बाकी कपड्यांचें बोचकें बांधलें. पोटांत घरचा कळवळा आहे कोठें ? घरांत जातो कोणाला विचारायला ? कायतें निधान काका ? आला तयार होऊन नारायणरावांच्या पुढें. नारायणराव कौतुकानें ह्मणतातः आहारे ! माझा नाना, एखाद्या खंदकांत जरी मी उडी घे ह्मणून सांगितलें, तरी माझा पाय मोडेल असें बिचाऱ्याच्या मनांत सुद्धां यायचें नाहीं बरें ! तेव्हांच देईल फेंकून. कां, सदाशिवजी ! आमची तुह्मी थट्टा करीत असतां ना ? पहा, नानाच्या डोक्यावर आपल्या कपड्यांचा बोजा आहे कीं नाहीं. नाना पंढरपुरास निघण्यास तयार झाला. दाखवा, तुमच्या घरांतलें एक तरी पोर असें आहे का !

वा ! वा ! हा रोग आतां काय धार मारणार आहे तें पाहूं तर खरें.

खरोखर, लहान मुलांना असत्त्याचा वासही नसतो. सत्त्याचें बीजारोपण जन्मतः झालेलें असतेंच. त्याचें पुढें झाड होणें हें मुलांच्या शिक्षणावर पुष्कळ अंशीं अवलंबून असतें. जवळील मनुष्यांचें वर्तन, व मुलांच्या सहचरांचा खेळ, यांमध्यें मुलांस असत्त्याचाराचा भाग अधिक मिळतो. सत्य हा स्वभाव व असत्य ही संवय होय.

मराठी शाळेंत याचें वर्तन कसें होतें, शिकविणारे गुरु कोण होते वगैरे माहिती आह्मांस फारशी नाहीं. मराठी साधारण लिहितां वाचतां येऊं लागलें, इतक्यांत या मुलास फिरंगी शाळेंत पाठविलें. यावेळीं अद्याप हें

बेट मूळचें फिरंग्यांचें, असें लोकांच्या मनांत वागत असे. या लोकांच्या घरांमध्यें उपयोग करण्याच्या शब्दसमूहांत बरेच शब्द फिरंगी असत व पुरुषमंडळींत फिरंगी बोलणें ह्मणजे सुशिक्षितपणाचें एक अंग मानीत असत. जुन्या लोकांमध्यें अद्यापही वृद्धलोक पोर्टुगीज बोलणारे आढळतात, हें मान उत्तरोत्तर कमी कमी होत जाऊन ती जागा इंग्रजीनें भरून काढली इतकेंच नव्हे; पण थोडी बहूत मराठींतलीही खाल्ली असें पहाण्यांत येतें. या भाषेचा आमचे चरित्रनायकांनीं पुढें अभ्यास चांगला केला.

---

## भाग २.

## पाठशाळेंतील शिक्षण.

सुमारें १२ वे वर्षी या मुलास इंग्रजी शाळेंत जाण्याची परवानगी नारायणरावांकडून मिळाली. त्यांचें ह्मणणें या पाप्यांच्या पितरानें पुढें विद्याव्यासंग सोडून द्यावा. त्यावेळीं या मुलास मराठी व पोर्टुगीज भाषा व्याकरणशुद्ध येत होत्या व गुजराथी या मुंबईशहरची अर्धी भाषाच असल्यामुळें ह्मणा किंवा आमचे नानास दाईनें बाळकडूंच घातलें. त्यावेळीं हाताशीं जायफळ, मायफळ, अतिविष, डाळिंबसाल, सुंठ वगैरे नेहमींचीं औषधें मिळालीं नाहींत ह्मणून तिनें सर्व भाषांचा एक एक वळसाच उगाळून पाजला, किंवा आरंभींच सकलभाषाज्ञानांची चिरटोळी तोंडांत दिली होती ह्मणून ह्मणा, गुजराथी बोललेलें सुद्धां या मुलास समजत असे व बरेंच बोलतांही येत असे व पुढें यानें अनेक भाषांचें

ज्ञान संपादिलें. तें स्थलविशेषें वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

यावेळीं या शाळेस एलफिन्स्टन् इन्स्टिट्यूशन असें नांव होतें. कालेज व शाळा पूर्वीं एकच असे. कांहीं काळानंतर याचे दोन भाग होऊन एका भागाचें नांव एलफिस्टन् कालेज व दुसऱ्यास एलफिन्स्टन् हायस्कूल असें नांव मिळालें. अलीकडे एलफिन्स्टन् मिडल स्कूल ह्मणून तिसरा भाग झाला आहे. हेंडरसन् ह्मणून एक पाश्चिमात्य विद्यागुरु होते. या गृहस्थांनीं शिकविण्याच्या कामीं मोठेंच नांव मिळविलें. यांच्या चांगुलपणाचीं कांहीं एक दोन उदाहरणें सांगितल्याखेरीज पुढें जाणें ह्मणजे अन्याय होईल असें वाटतें. आह्मी हीं उदाहरणें आमच्या नायकांच्या संबंधानेंच सांगतों, तथापि या सद्गृहस्थाची वर्तणूक आपल्या सर्व शिष्यांजवळ अशीच असे. यांना आपल्या हाताखालचीं मुलें ह्मणजे आपलींच मुलें असें वाटे. हे नीच, काळ्या कातडीचे क्षुद्र प्राणी आहेत असें त्यांच्या कांहीं वर्गबंधूप्रमाणें त्यांस वाटत नसे. त्या मुलांचा त्यांना फार अभिमान. आपल्या एखाद्या पाश्चिमात्य स्नेह्याचा अपमान झाला तरी चिंता नाहीं. परंतु आपल्या मुलांपैकीं एखाद्याच्या केंसासही धक्का लागला कीं, यांचें काळीज करपलेंच. नानाभाई हा मुलगा कफक्षयी असा आह्मी पूर्वींच उल्लेख केला आहे. एके दिवशीं खिडकीजवळ नाना फार खोंकत उभा होता; व खोकतां खोकतां अगदीं घाबरा झाला. हें त्यांच्या ममताळू गुरूनीं पाहून ते नानाच्या नकळत त्याच्यामागें बराच वेळ उभे राहिले व खोक कमी होते आहे इत-

क्यांत त्याच्या पाठीवर हात ठेऊन "नानाभाई तुला अशी घातुक खोक केव्हांपासून लागली ? त्यास कांहीं इलाज करतोस कीं नाहीं ?" मला अशी बरेच दिवस आहे. कधीं कधीं कमजास्त होत असते, असें नानानें उत्तर दिलें. गुरूनीं नानास हातीं धरून आपल्या निजावयाच्या बिछान्यावर निजविला, आणि सांगितलें कीं, कांहीं वेळ तुला आराम वाटेपर्यंत उठूं नको. काय हें मुलांवर प्रेम तरी ! हे गुरुजी अविवाहित होते. स्वतांची कूस धुपल्यावांचून बायकांचें मन शिशुविलापानीं पाझरत नाहीं. तसेंच पुरुषाचें; परंतु आमचे हे गुरुनायक अगदींच या नियमास अपवाद असें ह्मटलें पाहिजे. अशीं उदाहरणें आमच्या प्राचीन ऋषिवर्गांमध्यें होतीं, अशीं वाचण्यांत व श्रवणांत येतात, पण प्रस्तुत फार विरळा, यांत संदेहच नाहीं. गुरुपद इतकें उच्च व वंद्य शाहाणे लोक मानतात, त्याचें तरी कारण हेंच आहे. वर्गांमध्यें झोंप घेणाऱ्या, वर्तमानपत्रें व प्रुफें वाचित बसणाऱ्या, ह्मणजे "नवरा मरो का नवरी मरो" या न्यायानें वागणाऱ्या महापातकी पंतोजीस हें पद न मिळाल्यास तो व्यक्तिविशेष दोष गणला पाहिजे. अलीकडे तरी लोक कांहीं अंध झाले नाहींत. कारण हंडरसन, हारकनेस, वर्डसवर्थ, केरुनाना व बाळशास्त्री जांभेकर अशा मंडळीचींच नांवें मात्र कांहो लोकांनीं गावीं ? असो. सायंकाळीं घरीं जातांना त्यानीं नानास आपल्या गाडींतून आपले बंगल्यावर नेलें. आणि त्यांचें स्नेही डॉ० मिलर यांस या मुलाची हकीकत सांगितली. त्याची छाती वगैरे तपासण्या-

विषयीं विनंती केली, तेव्हां डॉक्तर यांनीं सांगितलें कीं, कांहीं धास्ती नाहीं. उत्तरोत्तर हा रोग कमी कमी होत जाईल. प्रस्तुत यास कांहीं औषध देतों तें द्यावें.

त्यावेळीं सर रॉबर्ट ग्रँट हे मुंबईचे गव्हरनर होते, व सर अरस्किन पेरी हे विद्याखात्याचे मुख्य होते. ते एके दिवशीं परिक्षेकरितां शाळेंत आले, तेव्हां त्यांनीं गुरुजींस पुसलें कीं, सरकारवाड्यामध्यें पगारदार विद्यार्थ्यांस समारंभाच्या दिवशीं आमंत्रण नसतें काय? या प्रश्नाचें उत्तर निषेधार्थीं आल्यावरून गव्हरनर साहेबांनीं आमंत्रण देण्याची आज्ञा दिली. व तदनुसार पुढच्या खेपेस निमंत्रण चिट्ट्या आल्या. कांहीं श्रीमंत लोकांचीं मुलें होतीं, तीं आपापल्या गाड्यांतून गेलीं. गरीब मुलांनांही आमंत्रण होतें, परंतु तीं जातात कशीं? भाऊ दाजी आणि नाना हीं दोन मुलें गरिबाचीं आहेत हें हॅन्डरसन साहेबांचे लक्षांत वागत होतें. त्यांनीं त्यांस विचारलें:—नानाभाई, भाऊ, तुह्मांला सरकार वाड्यांत आमंत्रण आहे कीं नाहीं? तुमची जाण्याची मर्जी आहेना? बरें, कांहीं सोय नसेल तर आमच्या गाडींतून जा. आज मला येण्यास सवड मिळणार नाहीं. या गुरुवर्यांनीं या मुलांची हौस पुरविण्याकरितां आपण जाण्याचें नाकारलें. इतका सूज्ञ बाप तरी असेल काय? कोण धूर्तता ही! काय हें प्रेम! मुलांचें सामर्थ्य व दौर्बल्य हीं सदोदित त्यांचें लक्षांत असत. अलीकडे असलीं रत्नें कोठें आढळतात! या गृहस्थास कांहीं दिवस बुद्धिभ्रंश झाला होता.

एके दिवशीं आमचे नायक व त्यांचे स्नेही विख्यात भाऊ दाजी डाक्टर या गुरूंस भेटावयास ह्मणून गेले. उभयतां मुलांनीं आपल्या पायांतील जोडे एतद्देशीय चालीप्रमाणें बंगल्याच्या दारामागें काढून ठेवले, आणि तेथें कांहीं कोचें होतीं त्यावर जाऊन नित्य चालीप्रमाणें बसले. इतक्यांत प्रोफेसर हॅन्डरसनचे स्नेही एक बडे डॉकतर होते, ते आंत आले. त्यांची नजर तेथें पोंचली, दृष्टीस ते नेटिव्ह जोडे पडले. मग काय विचारतां! महाराणी व्हिक्टोरियाच्या जातीचे गौरकाय डाक्टरांचें पित्त कपाळास चढलें. त्यांनीं ते जोडे पायांनीं बंगल्याच्या बाहेर फेंकून दिले. काठीनें ते इतके लांब उडवून दिले कीं, मुलांना त्यांची आशा सोडून देणें भाग पडलें. त्यांच्यानें ते परत आणण्यास जाववेना. कदाचित् ते क्षुब्ध झालेले राजवैद्य आपल्यासही मार देतात कीं काय, ह्मणून ते कांपूं लागले, अंगास घाम सुटला, ओंठ सुकले, अगदीं ते गर्भगळित झाले, आणि पुढें काय करावें हें सुचेना. इतक्यांत त्या प्रेमबद्ध पुरुषाचा आचारी मागल्या वाटेनें पुढल्या दारीं हळूच नकळत आला, आणि ते जोडे घेऊन गेला. मुलें खालीं मान घालून बसलीं होतीं, तरी चोरून नजर त्या जोड्यांकडे फेंकीत होतीं. बिचारीं काय करतील? जोडे गेले, पुढें कितीएक महिनेपर्यंत अनवाणी चालणें आपल्या कपाळीं येणार ह्मणून त्यांस भय पडलें होतें. इतक्यांत गुरुजींनीं त्यांस आपल्या खोलींत बोलावलें, आणि ह्मणाले, येथें तुमच्या कांहीं वस्तु आहेत काय? एका कोंपऱ्यांत

जोडे पुसून ठेविले होते. मुलांस ह्मणतात, ते घ्या आणि घाला पायांत. घरांत साऱ्याभर डाक्टरसाहेबांनीं कांचा फोडून टाकिल्या आहेत, त्या तुमच्या पायांत बोंचतील. हें बोलणें उपरोधिक होतें, हें वाचकांच्या सहजच लक्षांत येईल. इतक्यांत साहेब मजकूर हातांत वेताची छडी घेऊन आले आणि दरवाजांत डॉक्टर भेटले, त्यांच्या तोंडांतून गुरुशिष्यांविषयीं उपहासकारक उद्गार येतांच त्यांच्यावर छडीचे फटके बेधडक लगावले. परस्परांचे दोन हात झाले. मुलांची तर अगदीं गाळणच झाली. त्यांस "दे माय धरणी ठाव" असें झालें. पळावें तर डाक्टर पकडतील कीं काय कोण जाणें. शेवटीं गुरुजींनीं मुलांस हातीं धरून त्यांचें शांतवन केलें व बंगल्यापासून दूरवर पोंचविलें. तुह्मीं आतां खुशाल घरीं जा, त्या डाक्टर साहेबांना लागलें आहे खूळ, असें ह्मणून मुलांचा निरोप घेतला. आतां खुळाचें वारें कोणत्या पक्षाकडे होतें हें आह्मी सांगणें नलगे. एवंच खरें गुरुप्रेम यांत व्यक्त होतें यांत कांहीं संदेह नाहीं.

एक वेळ आमचें शिष्यमंडळ दुसरे एक प्रोफेसर बेलसाहेब होते, त्यांच्या बंगल्यावर गेलें होतें. प्रोफेसरांनीं नूतनच लग्न केलें होतें, ते आपल्या पत्नीस ह्मणतात, आमच्या या छोटेखानी गृहस्थांस पियानो वाजवून थोडावेळ रंजन कराल काय? त्या बाईनें मुलांस गम्मत वाटेल असें वर्तन केलें. आतां तर आपल्या अनुभवास विपरीत गोष्टी येतात. साहेबांची मडम घरांत असली कीं काळी कातडी दरवाजासमोरून फिरकूं देत नाहींत.

परकी गृहस्थ दरवाजाच्या, निदान हद्दीच्या आंत आला कीं चाकर लोकांची उडाली धांदल. असो.

प्रोफेसर हॅन्डरसन हे आपल्या वर्गांतल्या मुलांस फावल्या वेळांत एकादें नवीन पुस्तक आणून चमत्कारिक गोष्टी, बोधपर ह्मणा किंवा विशेष माहितीच्या ह्मणा, वाचून दाखवीत असत. एके दिवशीं सर वुलिअम जोन्स, कलकत्त्याच्या हायकोर्टाचे माजी मुख्य न्यायाधीश यांचें चरित्र मुलांस वाचून दाखवीत होते. त्यांचे भाषाज्ञानाविषयीं वर्णन चाललें असतां, त्यांस आठ भाषा अवगत होत्या असें वाचलें. गुरुजीनीं एकएकास प्रश्न केला, नानाभाई, तुला किती भाषांचें ज्ञान आहे? तो ह्मणाला, मला पांच भाषा येतात. सहावीस सुरवात आहे. फार चांगलें. तुझ्या बरोबरीच्या मुलांपैकीं एकासही असें सांगवलें नाहीं. तुझें भाषाज्ञानाकडे विशेष लक्ष आहे हें मी जाणतों. तुझ्या मनांतून लॅटिन्, ग्रीक, फ्रेंच, इटालियन शिकणें असेल तर मजकडेस येत जा. मनांत आणशील तर तूं प्रतिजोन्स होशील. नानाच्या मनांत हें शेवटचें गुरुवाक्य बिंबलें. हेंच त्याच्या भाषाज्ञानाचें बीज. यास थोड्याच अवकाशांत अंकूर आला. पुढें त्या रोप्यास जमीन चांगली मिळाली. खतपाणी घालणारा चांगला आस्थेचा, मग झाड तयार होण्यास किती उशीर? लहानपणीं थोर पुरुषांचीं चरित्रें वाचल्यानें व ऐकल्यानें व महात्मे गुरूंच्या सुबोधानें मुलांच्या अंगांत एक तऱ्हेची हुरुप येत असते, त्यावेळीं जो ठसा उमटत असतो, त्याप्रमाणें पुढें वर्तन

होत असतें. वडिलांनीं हा क्रम सदोदित मुलांकडून चालविला पाहिजे. केव्हां प्रकाश पडेल याचा नेम नसतो. नानाच्या भाषाज्ञानास जसें जोन्ससाहेबाचें चरित्र कारणीभूत झालें, व शिवाजीस पुराणांतील थोर पुरुषांनीं हिंमत दिली, अशीं शेंकडों उदाहरणें सांपडतील. आपल्यामध्येंतरी थोर पुरुषांचा रोज स्तोत्रपाठ करण्याचाही हेतु हाच आहे. "अहल्या द्रौपदी सीता," "प्रल्हाद नारद पराशर पौंडरीक," वगैरे पाठांचाही उद्देश हाच आहे.

नानास शाळेंतून दहा रुपये मिळूं लागले होते, ही गोष्ट कितीएक दिवस घरांतील वडील माणसांस सुद्धां माहीत नव्हती. त्या पैशांचा व्यय तो अनेक खासगी गुरूंना त्यांच्या श्रमाबद्दल शक्त्यनुसार पोंचविण्यांत करीत असे. त्याचे वडील एकवेळीं घरीं आले होते, त्यांस ती गोष्ट अन्यमार्गानें समजली. या बाबतींत त्यांनीं नानापाशीं चौकशी करितां सर्व खरा मजकूर समजला. तूं ते रुपये नारायण काकापाशीं कां देत नाहींस? त्यांनीं मजपाशीं मागितले नाहींत, असें विसंगत व अप्रशस्त उत्तर ऐकून त्यांस राग आला, व त्या बरोबर हातांत पाणी काढावयाची दोरी होती, तिचा प्रहार मुलाच्या पाठीवर झाला. एक, दोन, चार, पांच, फटके झाले. हा नानाचा पहिला व शेवटला मार. अरे, आह्मी भाऊ जर सर्व पैसा त्यांच्या स्वाधीन करतों, तर तुला विचारावयास पाहिजे काय? तूं ह्मणजे कोणत्या झाडाचा पाला? हा मार नाना शेवटपर्यंत विसरले नाहींत. 'व इतउपर नानाचे सर्व पैशांचा व्यय चुलत्याचे अनुमोदनानें होत असे.

पुढें कांहीं काळानें नानाचे वडील निवर्तले. ही गोष्ट मुलास किती खेदकारक झाली असेल? अतिजवळचा आप्त, ज्यावर आपलें सर्वस्व अवलंबून आहे, अशा मनुष्याचा एकाएकीं अनिवार्य वियोग होणें, ज्या मनुष्यावर असा पहिलाच प्रसंग गुदरतो त्या मनुष्याच्या मनाची स्थिति यापासून काय होते, हें ज्यांना त्या गोष्टीचा स्वतां अनुभव दुर्दैवेंकरून आला असेल, त्यानांच या मुलाच्या मानसिक स्थितीचें हुबेहुब चित्र डोळयांपुढें उभें करतां येईल. नाहीं आई, नाहीं बाप, पोरका पोर! ज्या हपिसांत मोरोजी नोकरीस होते, तेथील साहेबांनीं चौकशी करून वडील मुलगा नोकरी करण्यासारखा आहे असें समजल्यावर त्यास तेथें लाऊन दिला आणि आमचे नायक तसेच पुढें शिकत गेले.

या मुलाच्या तीर्थरूपांच्या देहविसर्जनानेंच याच्या आयुष्य क्रमणास एक प्रकारचें हितकर वळण मिळालें असें ह्मटलें तरी चालेल. मनुष्यास अनिष्ट दिसतात अशा गोष्टींपासूनही ईश्वरकरणीनें इष्ट हेतुसिद्धि होत असते. योगायोग विलक्षण येतात. यावेळीं नानास त्याच्या विद्याभ्यासापुरते पैसे मिळत असत. वडील बंधूची तर तजवीज झालीच होती. संस्कृत, फारशी, अरबी, गुजराथी, गोमंतकी, फ्रेंच्, लॅटिन्, ग्रीक या भाषांचा अभ्यास जारीनें चालला. दहा रुपयांची परिक्षा झाली. पुढें विसांची, व तिसांची झाली. पुढें कांहीं वेळ शिकवावें व कांहीं वेळ अश्रांत अभ्यासांत घालवावा.

या मुलाची एकचित्तेंकरून अभ्यास करण्याची संवय,

त्याची शिक्षाग्राहकता, तत्परता, आणि सौजन्य हीं पाहून या हँडरसन गुरुजींचें मन या मुलावर बसलें असें त्यांनींच एके ठिकाणीं ह्मटलें आहे. हा गुरुशिष्याचा प्रेमभाव उत्तरोत्तर दृढतर होत चालला. आधींच या मुलाची कुशाग्रबुद्धि असे, त्यांत एकसारख्या अव्याहत व्यासंगानें ती तीक्ष्ण होत चालली आहे ही गोष्ट यथाकालीं सकलगुरुमंडळाचे लक्षांत आली. ज्ञानवैचित्र्यानें याचें मन प्रगल्भ दशेस येत चाललें, व अनेक भाषांतील सुरस ग्रंथाभ्यासानें त्यावर जिल्हई व तरतरितपणा आला. या इलाख्यांत विख्यात झालेले विद्यागुरु हारक्नेससाहेब या मुलाविषयीं ह्मणतात कीं 'भाषाज्ञान संपादनार्थ आमच्या नायकांस वेडच लागलें आहे'. येथील विद्यागुरु बेल् साहेब ह्मणतात 'या मुलाचा आह्मां कोणालाच विसर पडणार नाहीं. या मुलाची बुद्धि साधारण लोकांपेक्षां अधिक प्रखर आहे. रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, ज्योतिषशास्त्र, व शिल्पशास्त्र आणि यंत्रशास्त्र यांचीं मूलतत्वें याला चांगलीं अवगत आहेत. इंग्रजी व एतद्देशीय भाषांचा व्यासंग नानास फार आहे.'

एतद्देशीय नांवाजलेल्या गृहस्थांपैकीं बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचा आमच्या नायकांवर चांगल्याच तऱ्हेचा लोभ होता. शास्त्रीबुवांचा विद्याव्यासंग व अनेक विषयांत पारंगता सर्वांच्या ऐकण्यांत असेलच. अलीकडे यांचें चरित्र छापून प्रसिद्ध झालें आहे, तें वाचल्यास वांयां वेळ गेलासें वाटणार नाहीं. या पुरुषामध्यें गुरुशिष्यप्रेमबंधन याप्रमाणें वाढण्याचें तरी कारण उभय-

तांचा विद्याव्यासंगच समजला पाहिजे. "समानशीले व्यसनेषु सख्यं," शास्त्रीबुवा पाहांटेस उठून खिडकीसमोर घोंगडीवर कांहीं ग्रंथावलोकन करतांना नानांनीं रोज पाहून त्यांस साल्हादाश्चर्य वाटत असावें. या सत्पुरुषास गुरु हें नांव शोभे. कारण आबालवृद्धांपैकीं कोणी जावो, पाहिजे तो प्रश्न करो, शिकविण्याचा नेहमीं यांस उल्हास असे. जशी शिष्य शिक्षक या नात्याची परमावधी पितापुत्रप्रेमानें व्हावी, तद्वत् यांच्या ठिकाणीं ती मूर्तिमंत दृष्टीस पडे. शास्त्रीबुवांचा अभिप्राय या शिष्याविषयीं फार वर्णनीय असे. प्रसंगविशेषीं त्यांनीं तो अनेक वेळां व्यक्त करूनही दाखविला आहे. कॉलेज सोडतेवेळीं नानास भूमित्यादी गणितशास्त्रें यांचें चांगलें ज्ञान होतें. कांहीं दिवसांनीं या विद्यार्थ्यास स्कॉलरशिपबद्दल दाहा रुपये मिळूं लागले, हें वाचकांस सांगितलेंच आहे. या मुलानें त्या रुपयांचा व्यय एका शास्त्रीबुवांपाशीं कांहीं संस्कृत अध्ययन करण्यामध्यें करावा असें मनांत योजिलें. वेदशास्त्रसंपन्न रा० रामशास्त्री खांडेकर यांना कांहीं नियमित रक्कम देऊं करून संस्कृत शिकण्याचें ठरविलें. नानांनीं आपले चुलत्याचे कानावर ही गोष्ट घातली. तेव्हां ते ह्मणाले अरे बाबा! आपल्याला संस्कृत शिकून भटाचा का धंदा करायचा आहे? तूं आतां पुराण सांगून पोट भरणार वाटतें? अगोदरच तूं अशक्त, त्यांतून हीं असलीं हजार लफडीं आपल्या पाठीस लाऊन घेतोस हें बरें नाहीं. आपली प्रकृती संभाळ. आपल्याला संस्कृत नको आणि कांहीं नको. तें काम भटांनींच करावें. हें काकाजींचें बो-

लणें मुलास रुचलें नाहीं. नानांनीं आरंभ तर केलाच. शास्त्रीबुवा रोज सकाळीं येऊं लागले. पाहांटेस नानांस शास्त्रीबुवांनीं हाक मारावी. मुलानें उल्हासानें शिकण्यास बसावें. नानांस वाटे कीं आपण शिकून जांभेकर शास्त्रीबुवांसारखे होऊं काय? आह्मी कसचे त्याच्यासारखे होणार! काय त्यांचे परिश्रम! कोण निजध्यास! बसतां, उठतां, शयनीं, भोजनीं, विद्याध्ययन वा अध्यापन, नाहींच तर मनन, एकसारखें काम चालू आहेच. कां! विद्या विद्या ह्मणजे काय? आपले घरीं पाणी नाहीं भरणार? नानास अशीं जाज्वल्य प्रत्यक्ष उदाहरणें डोळ्यापुढें दृष्टीस पडत. व तीं महत्वेच्छेच्या बीजारोपणास कारणीभूत होत असत. या मनोविकाराचें जबरदस्त वजन याच्या मनावर बसलेंसें वाटतें. आपणांस लोक विद्वानांत केव्हां मोडतील, या गोष्टीचें त्यांनीं चिंतन करीत असावें. चिंतनानंतर साधनाची योजना व योजनोत्तर यत्न सुरू झाला. एक गोष्टीकडे मन वेधलें कीं बाकीच्या सर्व गोष्टींकडे साहजिकच दुर्लक्ष होऊं लागतें. मनास एक मार्ग मिळाला ह्मणजे तें अन्यमार्गीं अंध झाल्यासारखें होतें. गुजराथ प्रांतांत सर्व तरुण गृहस्थांस पैसा संपादनाचें एक व्यसन असल्यामुळें आपल्याकडील खुशालचंद तरुणांमध्यें जे नाद व व्यसनें आढळतात, तीं त्या लोकांत आढळत नाहींत, असें कित्येक विद्वज्जनांचें ह्मणणें आहे, त्यांतही कांहीं तथ्यांश दिसतो. नानांस विद्याव्यसन असल्यामुळें इतर व्यसनें व संसारांतील कित्येक कामें क्षुल्लक वाटत असत. यांचा भाषाज्ञानाकडे

भर फार असल्यामुळें गणित, काव्य वगैरे इतर विषयांची यांस विशेष अभिरुचि नव्हती. भाषाज्ञान ह्मणजे मनुष्य-स्वभावाचें ज्ञान; जितक्या भाषा शिकाव्या तितक्यावेळां मनुष्ययोनींत आयुष्यक्रमण केल्याचें श्रय येतें अशी एक ह्मण आहे, ती या पुरुषांच्या ठायीं मूर्तिमंत दृष्टीस पडत असे.

नवीन मनुष्याची भेट झाली असतां आपण त्याच्याशीं थोडें बोलून त्या मनुष्यानेंच विशेष बोलावें असे त्यास प्रश्न करण्याची या पुरुषाची कांहीं विलक्षण शैली असे. त्या परकी मनुष्याच्या बोलण्याच्या झोंकावरून, त्याचा डौल लक्षांत आणून, त्याच्या बोलण्याचा रोंख कोण-त्याविषयाकडे आहे तें पाहून, त्याचे मित्र वगैरे स्नेही-मंडळ कोणच्या प्रकारचें असावें याचा खुलासा होईल तितकें करून ध्यानांत घेऊन, हे मनुष्याची पारख फार चतुराईनें करीत.

त्या वेळचे त्यांचे वर्गबंधु नामदार दादाभाई नवरोजी, रघुनाथ नारायण खोटे, डाक्टर भाऊ दाजी, या मंड-ळींचा परम स्नेह तेव्हांच्या सर्वांच्या विद्याव्यसनामुळेंच बनला. सर्वांची गरिबी एकाच मासल्याची. गरिबी ही महत्वेच्छेत्तेजक कडवट गोळी या सर्वांना मिळाली. तेणेंकरून ज्ञानक्षुधा जी एकदां तापली ती शेवटपावेतों अंशतःही शमन न होतां वृद्धिंगतच होत गेली. हिंदुस्था-नांतील अलिकडचे सार्वजनिक, राजकीय आचार्यगुरू दादाभाई नवरोजी यांस जी इतकी हिंदुस्थानातील गरिब प्रजेची कींव येते त्याचेंही कारण त्यांच्या पूर्वींच्या अनाथ स्थितीमध्येंच आहे.

---

## भाग ३.

### लग्न व ठाणें येथील इंग्रजी शाळेचे मुख्य गुरू.

या सुमारास ह्मणजे इ० स० १८४३ मध्यें या गृहस्थांस पगारदार विद्यार्थी या नात्यानें तीस रुपये दरमहा मिळत होते, ते प्रस्तुत त्याच विद्यालयांतील शिक्षक नेमिल्यामुळें पन्नास रुपये मिळूं लागले. यांचें वय सुमारें चोवीस वर्षांचें झालें. यांचे स्नेही व आप्तमंडळ यांच्या मनांत विवाहप्रेरणा करून देऊं लागले. आरंभापासून विद्याव्यासंगाच्या बंधनानें व आपण क्षयी आहों अशाप्रकारची समजूत असल्यामुळें, लग्न करावें असें त्यांचें मन घेईना. कितीही विचारवंत हिंदु असला तरी अविवाहित राहण्याचे विचार त्याचे मनांत फार दिवस टिकणार नाहींत, यास अनेक कारणें आहेत. एक तर असें ब्रह्मचर्य आमरणांत धारण करण्याची आमच्यामध्यें प्राचीनकालापासून चाल नाहीं. जी कांहीं थोडी बहुत कोठें कोठें आढळते, ते लोक गृहस्थाश्रमी लोकांमध्यें राहत नाहींत. मुली अविवाहित मुळींच राहत नाहींत. प्रस्तुतकालीं अविवाहित मुलींचें उदाहरण कोणाच्या पहाण्यांत व ऐकण्यांत आलें नसावें. अर्थात पुरुषांचीं लग्नें केलीं पाहिजेत हें ओळीसच आलें. "जसा देश तसा वेष" अशी एक ह्मणच आहे. नानांचे हे विचार किती दिवस टिकाव धरतात? बहिणी, भाऊ, काका, मामा व सर्व स्नेहीमंडळ यांच्या पदोपदीं व्याख्यानापुढें हें पाश्चिमात्य

तिमिर किती नेट धरणार? कांहीं दिवसांनीं नानांनीं ह्या विचारास रुकार दिला, व घरांतील माणसें मुलगी पाहण्यास लागलीं. तथापि ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं नानांची शरीरप्रकृति सदृढ नसे, तेव्हां कित्येक ठिकाणीं मुलींच्या आईबापांनीं तर प्रथम दर्शनींच नाकें मुरडलीं. कितीएक मुलींच्या आईनीं स्पष्ट बोलून दाखविलें कीं, अशा सुदाम्यास मुलगी देण्यापेक्षां लग्न होत नाहीं ह्मणून मुलीची मोट बांधून विहिरींत लोटून देऊं. शेवटीं पाहातां पाहातां शिवशंकर रणछोडजी यांच्या वडील मुलीची योजना झाली; परंतु मुलाच्या शरीराकडे पाहून घरांतील सर्व बायका मुलगी देण्याविषयीं प्रतिकूळच होत्या. पुरुषमंडळीचें ह्मणणें पडे कीं, मुलगा विद्यासंपन्न आहे, कुलशील नांव ठेवण्यासारखें नाहीं. आतां प्रकृतीच्या संबंधानें ह्मणावें तर अगदींच नाकारण्यासारखें आहे असें नाहीं. विशेष धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं. हिंदुकुटुंबांत पुरुषांवर बायकांचें अशा कामांत किती प्राबल्य असतें व तें किती चालतें, या गोष्टी परकीयांस बराबर समजणार नाहींत, व सांगतांही येणार नाहींत. त्या जर एकवेळ बिथरल्या तर त्यांस आपल्या पक्षाकडे आणण्यास पुरुषांस फार आयास पडतात. घरगुतीकामामध्यें त्याच मालकिणी असतात. त्यांस गुलामाप्रमाणें आह्मी वागवितों वगैरे आक्षेप अगदीं निर्मूल आहेत. परकी लोकांच्या तोंडीं हे आक्षेप आपल्या नांवाची टिमकी वाजविण्याच्या कामीं मात्र उपयोगीं पडतात. "येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत्," सज्जनांचे नांवाचा डांगोरा पाहि-

जे त्यानें पिटून आपला हेतु सिद्धीस न्यावा. "दुर्जनः प्रथमं वंदेत्," सज्जन कांहीं बोलणार नाहींत. त्याची त्यांना परवा कशास पाहिजे? असो, घरांतील बायका व पुरुष यांमध्यें असा मतभेद पडला. सरतेशेवटीं पुरुषांनीं अशी तोड काढली कीं स्त्रियांचें ह्मणणें फक्त मुलाच्या शरीरप्रकृतीविषयीं आहे, बाकी कोणत्याही गोष्टींत त्यांचा वानवा नाहीं, इतकेंच नव्हे पण इतर गुणांमध्यें असा मुलगा शोधूं लागल्यास सांपडणार नाहीं, असाही बायकांचा अभिप्राय होता, तर या गोष्टीवर बायकांचें व आमच्यासारख्या पुरुषांचें बोलणें निरर्थक आहे. या गोष्टीचा निर्णय वैद्यकनैपुण्य ज्यांच्या अंगीं आहे त्यांचाच अभिप्राय घेतला पाहिजे, व तोच विशेष महत्वाचा आहे असें उभयपक्षांस मानणें भाग आहे. असें ठरून मुलीचे चुलत आजे दामोदर केशवजी उर्फ सोकर डॉक्टर त्यावेळीं नामांकित गृहस्थ, फार सज्जन, तशांत मुलीचे आप्त असल्यामुळें तिच्या हिताअनहिताविषयीं आईबापांइतकीच कळकळ बाळगणारे, हे सांगतील त्या प्रमाणें मान्य करण्याचा बेत ठरला.

या गृहस्थांसही रुकार देण्यानदेण्याचा विचार पडला, तथापि आपल्याकडून होईल तितकी चौकशी व तपासणी करून विवाहास अनुकूल असाच अभिप्राय यांनीं दिला. मग काय विचारतां! तेव्हांच वधूवरांकडील लोक लागले तयारीला. पत्रिका जोशीबावांनीं पाहिली व वधूवरांमध्यें प्रीति रहाणार नाहीं असा ग्रहांवरून अदमास दिसतो असें सांगितलें. ही गोष्ट नारायणराव काकाजींनीं

नानास कळविली. ती गोष्ट नानास कबूल झाली. ग्रहलाघवावर भरंवसा कमी होण्यापुरतें नानाचें अध्ययन झालें होतें, व नानाच्या मनास ती मुलगी अगोदरच पसंत पडली होती.

या मुलीचें नांव कृष्णाबाई होतें. ही लग्नांत सुमारें १३–१४ वर्षांची होती. नाका डोळयांनीं सुरेख, निमगोरी, तरतरित, अंगवर्ण कळकट नव्हे, चेहऱ्याचें पाणी सौम्य तथापि म्लान नव्हे, हस्तमुख तथापि त्यांत छिचोरपणाची बिलकुल झांक नव्हती, केश अगदीं काळे व लांब, एकंदर बांधा उंच स्त्रियांच्या वळणावर जाणारा दिसत नसे, तथापि खुजट व कृश नव्हती. धांवता–स्थूल अंगलोट दिसत असे. हिच्या कपाळावर एक लहानसें वाळुक होतें. हिला लिहितां वाचतां चांगलें येत असे, व आपल्या भावंडांवर व साधारण मुलांवर इचें प्रेम फार. मनाचा भोळेपणा, सरळपणा, काम करण्याची हौस हे गुण या मुलीचे अंगीं लहानपणींच दिसून येऊं लागले.

यावेळीं शाळाखात्याचें आधिपत्य सर अर्स्किन्‌पेरी या गृहस्थांकडे होतें, कारण ते "बोर्ड ऑफ एज्युकेशन्" नामक सभेचे अध्यक्ष असत. इन्स्पेक्टर लोकांनीं शाळा-तपासण्याचें काम करून आपला पत्रव्यवहार बोर्डाच्या चिटणिसापाशीं करावा. व कांहीं इंग्रजी शाळा मोठमोठ्या असत त्यांचाही पत्रव्यवहार प्रत्यक्ष चिटणिसांपाशीं होत असे. या पद्धतीची एक शाळा ठाण्यास असे. पूर्वीच्या लोकांचा व अलिकडील कांहीं लोकांचा असा समज आहे कीं, ज्या ठिकाणीं टापटिपीची व्यवस्था, बुद्धिकौशल्य व प्रामाणिकपणा आणि अव्याहत व अश्रांत

श्रम करण्याची हौस, बिकट कामांत शक्कल लढवून पार पडण्याचा हिय्या, हे गुण अवश्य आहेत अशा ठिकाणीं यूरोपस्थ गृहस्थांची योजना पाहिजे. या समजाप्रमाणें ठाणें येथील पाठशाळेवर एका यूरोपियन् गृहस्थाची नेमणूक झाली. कोणत्याही भाषेचें ज्ञान करून घेणें तें ज्याची ती बालभाषा असेल त्यापासूनच घेतलें पाहिजे. एरव्हीं त्या भाषेचें मर्म परस्थांस बरोबर समजाऊन देतां येणार नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. तथापि इंग्रजी शाळेंत इंग्रजीभाषाज्ञान मात्र करून द्यावयाचें असें नाहीं. शाळा चालविणें ह्मणजे एक छोटेखानी राज्य चालविणें होय. तर तें चालविण्यास गुणवैचित्र्यच पाहिजे. तें ज्याच्या अंगीं असेल तोच पंतोजीचें काम करण्यास लायक. मग तो गौरकाय असो अगर नसो. त्याचा धर्म, रंग, रूप, देश वगैरे बाह्यगुणांविषयीं नियामक आरेखडा घालण्याचा यत्न करणें ह्मणजे व्यक्तिविशेष खूळ आहे. यापेक्षां काय ह्मणावें?

या गतोक्त शाळेच्या मुख्य गुरूंनीं जे लेख लिहून कळविले होते त्यांवरून त्या शाळेची आशा सोडण्याची वेळ आली होती. दिवसेंदिवस मुलांची संख्या कमी होत चालली होती; अशी मुलांची पराङ्मुखता पाहून साहेबांनीं तर हातपायच गाळले होते. त्यांनीं ही शाळा बंद करावी अशी बोर्डास शिफारस केली होती.

त्यांचें ह्मणणें कीं, ठाणें येथील जमीन फार खडकळ, थोडीबहुत माती आहे ती अगदीं वालुकामय आहे. तेथील हवा अगदीं रुक्ष व लोकसमूहाच्या अनास्थारूपी

पाण्यानें इंग्रजीविद्येची लागवड या जमिनींत वृद्धिंगत होणार नाहीं. हें झाड आहे त्या स्थितींत जरी रहातें तरी शेतकऱ्यांस हताश होण्याचें कारण नव्हतें; परंतु ह्या रोप्यास दिवसें दिवस अधिकाधिकच कीड लागत चालली आहे. उत्साहश्रमी शेती मी येथें अरण्यरुद-नाप्रमाणें अध्यापनश्रम करीत आहें, असा येथील गुरु-वर्यांचा लेख आला होता. बोर्डांतील धूर्त, नांवाजलेले व लोकसमूहाच्या मानसिकस्थितीचे पूर्ण अनुभवी ना-मदार जगन्नाथ शंकरशेट, महंमद इब्राहिम् मकबा, बंमनजी होरमसजी वाडिया वगैरे मंडळीच्या मनांत या आपल्याच हातानें लावलेल्या झाडाच्या मुळाशीं एकाएकीं हत्यार लावावें असें येईना. त्यांच्या मनांत हें झाड एका नवीन एतद्देशीय तरुण विद्वान् बागवा-नाच्या स्वाधीन करून पहावें असें आलें, नाहीं तर शेवटीं आपण या गोष्टीची आशा सोडलीच आहे.

बहुमतानें पुष्कळ लोकांचीं नांवें पुढें आलीं परंतु देखदेखत कोणाच्यानेंही विस्तवांत पाय घालवेना. विकत-श्राद्ध घेऊन अपसव्य करण्याची इच्छा कोणास होईना. जळत घर भाड्यानें कोणी घ्यावें? पतकरील त्यास भीक नको पण कुत्रें आंवर, अशी अवस्था व्हावयाची; पण सरते शेवटीं भीत भीत आमच्या कफक्षयी रोडक्या ना-यकांस बोर्डानें आज्ञापत्र पाठविलें. एकदम आज्ञापत्र नानास येण्यास धूर्त व चतुर पुरूष नानाशंकरशेट हे वि-शेष कारणीभूत झाले. या शेटजीची नजर फार खोल असे. यांची गुणग्राहकता अद्याप लोक वाखाणतात.

यांच्या मनाला रत्नें निवडण्याची संवयच पडून गेली होती आणि चमत्कार हा कीं या प्रचंडबुद्धीच्या पुरुष्याच्या विशाळ मनांत त्यांतलें एकही रत्न दडून रहात नसे, मग नानाच कसे चुकून रहातील? या भावीस्थितीकडे आमच्या नानांनीं अगदीं अन्यतऱ्हेनें अवलोकन केलें. शाळा आपल्या हातून ऊर्जित दशेस आल्यास इतउप्पर आपल्या बढतीस कारणीभूत होईल, नाहींतर देखदेखत शेरा मारलेल्या जळक्या कातळावर जेथें यूरोपस्थ कुशल गुरूंची टांकी लागली नाहीं, तेथें जय न मिळाल्यास आपणांस कोणी फांशीं देणार नाहीं. आपल्या नांवास बट्टा लागेलसें वाटत नाहीं. येथें आपल्या शिक्षणपद्धतीस कलंक तो कसला? असा विचार करून नानांनीं ठाण्यास मुख्य गुरूच्या स्थानीं जाण्याचा निश्चय केला. लागलीच कामास सुरवात केली.

नानांला शिकविण्याची फार हौस; स्वाभाविक तीव्रता, मार्दव, खुबीदार गुलहौसीपणा, कठीण विषयाची फोड करण्याची शैली, आपला शिष्य अडतो कां तें कारण सट्कन् धूर्ततेनें निवडण्याची शक्ति, गांभीर्य, तोंडांतून त्या अर्भकांदेखत अपशब्द न काढण्याचा निश्चय, व अध्यापनकालाव्यतिरिक्त आपल्या शिष्यवर्गाला दाखविलेलें प्रेम, आणि अगदीं घरगुती, मुलांच्या नैसर्गिक, असमंजस, अभ्यासास व्यत्यय आणणाऱ्या वर्तणुकीविषयीं त्यांची पृथक् पृथक् कानउघडणी करण्याची व समजूत घालण्याची संवय, या गुणांनीं त्यांनीं ठाण्यास लवकरच नांव मिळविलें. चोंहींकडून आसपासच्या गांवचीं मुलें आपोआप मुंबईचा खर्च

टाकून ठाण्यासच जमूं लागलीं. तेथील परदेशस्थ व एतद्देशीय वजनदार लोकांनीं तोंडांत बोटें घातलीं. यूरोपस्थ गुरुवर्यांनीं जेथें हात टेंकले व तेणेंकरून आमच्या लोकांचाही आशाभंगच झाला होता, तेथें या अल्पवयस्क व अगदीं नूतनच पाठशाला सोडून आलेल्या गृहस्थानें अशा खडतर ठिकाणीं शाळा तर रंगरूपास आणिली. या ठिकाणीं यांनीं अश्रांत श्रम बरेच दिवस चालविले, व त्यांच्या लवकरच लक्षांत आलें कीं, शाळाखात्यांत श्रमाचें फळ शुष्कस्तुतिपाठांखेरीज अन्य आपणांस मिळणार नाहीं. इहलोकीं मनुष्यानें साधारण जनाच्या समजुतीप्रमाणें विद्वत्ता, प्रामाणिकपणा, सुशीलता, व आणखीं असले अनेक चांगले चांगले गुण मिळविण्यास लोकदृष्ट्या एकच साधन आहे, व तें या कपाळकुटीच्या गुरें हांकणाऱ्या मेंढक्याच्या धंद्यानें कालत्रयींही आपणांस मिळणार नाहीं.

यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः
स पंडितः सः श्रुतिमान् गुणज्ञः ॥
स एव वक्ता स च दर्शनीयः
सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ॥ १ ॥

ही गोष्ट मनांत बिंबून त्यांनीं नजर बाहेर ठेविली होती. त्यावेळीं अशा विद्वान् लोकांची बरीच दुर्मिळता होती. एके दिवशीं तेथील कलेक्टरसाहेबांस नाना भेटावयास गेले होते. हवापाण्याची व परस्पर प्रकृतिमानाची शुष्क प्रश्नोत्तरावळी आटोपल्यावर साहेबांच्या हेडक्लार्काची जागा आपणांस मिळावी अशी इच्छा नानांनीं प्रदर्शित

केली. आश्चर्यमुद्रेनें साहेब ह्मणतात, छेः, तें काम यूरोपीयनाशिवाय झेंपणार नाहीं. हें बिकट काम तुमच्या हातून कसें रेंटेल? नानानीं ती दिशा सोडून विषयांतर केलें, व अल्पकाळांतच भेटीचा शेवट झाला. एवढ्या ठेंचेनें नाना स्वस्थ बसले नाहींत. इतर ठिकाणीं यत्न तसाच चालला होता. ठाण्यास दोन वर्षें झालीं नाहींत तोंच मुंबईच्या सदर कोर्टामध्यें हरिसनसाहेबांच्या हाताखालीं ट्रान्सलेटरची जागा नानांस मिळाली. कायमची जागा सोडून, ९० रुपयांचें नुकसान करून अशाश्वत ७९ रुपयांवर जाण्यास त्यांचें मन कांहीं वेळ द्विधा होतें. "तूर्तदान महापुण्य" पन्नास रुपयांचें नुकसान करावेंसें वाटेना. पण पंतोजीपणाचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहिलें. वाटेनें जात असलें ह्मणजे शाळेंतील मार खाणारीं द्वाड पोरें खरमरीत गुरूस पाण्यांत पहात असतात, व संधी राखून अश्लाघ्य टवाळपणा करण्यास चुकत नाहींत. शाळेंतला सूड तीं आपल्या मतें उगवितात. पाठीमागें दूर आड उभें राहून वेड्या वांकड्या उच्च स्वरानें गुरुजींचें नांव घेऊन हाक मारावी, मागे पाहिलें कीं तोंड लपवावें. असा क्रम बराच वेळ चालावा. शाळेंतील उरसफोड ती निराळीच. मुलें उत्तरें कशीं देतात कोण जाणे. बरीं दिल्यास भांड्यांत जीव पडतो; नाहीं तर वरिष्ठअधिकाऱ्यांसमोर गुरूची पांचावर धारण बसते. बहुतेक वरिष्ठ परिक्षकांस शिक्षकाचा अनुभव कमी असतो. शाळेमध्यें त्यांचा अधिकार गुरुशिष्यांवर अमोघ. नव्या रक्ताचे, ताज्या दमाचे, विद्येची आढ्यता मिरविणारे असे ते असले तर पंतोजीचा तेथेंच

पाणउतारा, नाहीं तर एकांत खोलींत किंवा आपल्या उच्चस्थलापासून, निदान शालजोडींतले तरी करकरीत मिळायचेच. "मिळेना भीक तर पंतोजीपणा शीक." अशी एक आपल्याकडे अशिक्षित लोकांत ह्मण आहे. व उत्तरोत्तर या खात्यांतील लोकांचें मातेरेंच होत जाणार; असें समजून सदर कोर्टांतील जागा आमच्या नायकांनीं स्वीकारली. आज नुकसान दिसतें खरें, तथापि विद्याखात्यांत बढती ह्मणजे मुसळालाच अंकुर. कांहीं फेरबदल झाल्यास झीज मात्र पदरांत पडायची.

ठाणें येथील मुख्य गुरुपदास रामराम करण्याच्यावेळीं तेथील एतद्देशीय व परदेशीय सुज्ञ गृहस्थांनीं एकत्र जमून सार्वजनिकरीत्या नानांस मानपत्र दिलें, व तेथील शाळेची स्थिति सुधारण्याविषयीं काळजीनें आस्था बाळगणाऱ्या कितीएक नामांकित गृहस्थांनीं आमच्या नायकांची खासगीरीतीनें भेट घेऊन पृथक् पृथक् साश्चर्य खेदप्रदर्शन केलें.

"मेल्या ह्मशीस पांच शेर दूध" तद्वत् मानपत्रें व गुणविशिष्टपत्रें यांची ही अशीच गोष्ट आहे. कोणी एखाद्याचे व्यर्थ गुणानुवाद गाईले तर सुशील लोक त्यास आक्षेप घेत नाहींत, अशी वहिवाट आहे. कांहीं लोकांच्या पुढील वर्तनावरून ही गोष्ट अशी नव्हती असें दिसतें. अंतःकरणपूर्वक अश्रांत श्रम करण्याची संवय, बुद्धीची कुशाग्रता, साधारण सुविचार, विद्वत्ता व मनुष्याची पारख, नानांच्या अंगचे हे गुण उच्चजनमंडळाच्या मनांत चांगले बिंबून राहिले. त्यावेळीं कित्येक

लोकांच्या मनावर नानांच्या गुणवैचित्र्याचा जो ठसा उमटला, त्याचे उद्गार फार दिवस यांच्या कर्णोपकर्णीं येत असत.

---

## भाग ४.

### सदर अदालतीमध्यें ट्रान्स्लेटर ( भाषांतरकार ) व ठाण्यास कलेक्टरचे मुख्य कारभारी.

सदर अदालतींत यांना हारिसन साहेबांच्या हाताखालीं काम करावें लागत असे. कचेरींत काम करून, घरीं यांस वरिष्ठ अंमलदाराचें काम करावें लागे. कोर्टांत जे महत्वाचे ठराव होत असत ते छापून प्रसिद्ध करण्याचे कामांत यांनीं मदत करण्याचें पत्करिलें. छापण्यास जाण्यापूर्वीं हस्तलेख तपासावे लागत, ते साहेबांनीं आपण स्वतः तपासावे, व नंतर यांजपाशीं पुन्हा तपासण्यास द्यावे. साहेबांनीं स्वतः तपासलेल्यांत आपणांस चुका त्या काय निघणार, असें मनांत न आणतां त्यांनीं डोळ्यांत तेल घालून त्यांत कांहीं ना कांहीं तरी हस्तदोष ह्मणा, किंवा लेखनप्रमाद ह्मणा काढून दाखवावे. साहेबांस त्या सर्व न्यूनता कबूल करणें भाग पडे. शेवटीं उत्तरोत्तर साहेबही अगोदरच विशेष काळजीनें तपासूं लागले, तरी नानांनीं आपलें बोट घालावेंच. साहेबांनीं ओंठ खावे, तरी त्यांस साल्हाद खेद होत असे. त्यांनीं अधिकाधिकच यांचेकडे काम देत जावें, व ह्मणावें कीं, नानाजी, आज आपण काय श्लेश काढतां तें पाहूं या. तथापि नानांचा पगडा वर आहेच. "एक जामात श्व-

शुरगृहीं भोजनास बसले होते. पात्रावर नजर फेंकून पाहतात तों त्यांत अळवाची भाजी होती. ती त्यांस आवडत नसे. ह्मणून त्यांनीं ती पहिल्यानेंच संपविली. आणि पात्रावरील अनपेक्षणीय पदार्थ नाहींसा केला. परंतु धूर्त बायकांची अशी चाल असते कीं, मंडळी बाहेर भोजनास बसली असतां आडून पात्रांवर नजर ठेवावी व लोकांनीं पदार्थ मागितल्याशिवाय कोणास काय पाहिजे तें वाढावयास पाठवावें. जामातांचे पानांतील अळवाची भाजी संपली असें पाहून सट्कन पुन्हा पानावर पडे अशी तजवीज घरांतील स्त्रियांनीं ठेविली. जामातांस कांहीं बोलतां नये चालतां नये. कांहीं वेळानें एका परक्या गृहस्थानें मुग्धता मोडण्याचा निश्चय करून जामातांस प्रश्न केला, आपण किती बंधू? जामात मोठे नकली, मार्मिक व मर्मभेदक होते; त्यांनीं उत्तर केलें, पांच असामी आहोंत खरे, परंतु या अळूभाजीच्या लोंढ्यांतून जर मी मुक्त झालों नाहीं तर चारच समजायचे!" नानांनीं अधिकाधिक झटून काम करावें तों तों त्यांच्या पाठीस कामाची वरणी अधिकाधिकच लागावी, असें होऊं लागलें. सारांश अदालतींतही वरिष्ट अंमलदारामध्यें यांच्याविषयीं जो समज झाला, तोही याच्यापुढें चांगलाच उपयोगीं पडला. येथें हरिसन् व बेलँसिस् या उभय अंमलदारांनीं यांच्यांविषयीं विशेष गुणप्रदर्शक लेख लिहिले आहेत ते पाहिले असतां यांची मनःपूर्वक अश्रांत श्रम करण्याची हौस स्पष्ट दिसून येते. पुढें कांहीं कालानें यांस अनपेक्षित स्थलाहून निमंत्रण आलें. हें ही गतकालीं

केलेल्या श्रमाचें व बुद्धिकौशल्यप्रदर्शनाचेंच फल होतें असें आमच्या वाचकांस दिसून येईल.

कित्येक अविचारी, केवळ पुस्तकज्ञ, शालाशिक्षित अशा लोकांमध्यें आंगावर पडलेल्या कामांत चुकारूपणा, व होतां होई तोंपर्यंत विशेष काम टाळण्यास यत्न करण्याची खोड, व जबरीनें तें अंगावरच पडल्यास कपाळास शतशः आंठ्या घालून नाइलाजास्तव कसें तरी शेवटास नेण्याची संवय आढळते. कृतसुश्रमाचें फळ कधीं ना कधीं तरी आल्याशिवाय रहात नाहीं; ही गोष्ट ते विसरतात. ह्मणजे ईश्वराचे घरीं अक्कल वांटणीच्यावेळीं ते हजरच नव्हते असें ह्मणावें लागतें. उत्साहपूर्वक श्रम करण्याच्या हौसेपासून तद्व्यक्तिमात्रांचें व कधीं कधीं अन्यत्र जनांचेंही अनेक प्रकारें हित झाल्याशिवाय रहात नाहीं. ह्मणूनच मुलांच्या शिक्षणपद्धतीमध्यें गुरुजींनीं व तत्स्थानापन्न होण्याचा ज्यांस प्रसंग येतो त्यांनीं ही गोष्ट पक्की लक्षांत ठेविली पाहिजे कीं, विशेष विषयनैपुण्य जरी मुलांच्या हातून मिळविणें झालें नाहीं, तरी त्यांच्या कपाळाशीं नावडत्या विषयांची कपाळकुटी करीत न बसतां साधारणतः अश्रांत श्रम करण्याची संवय, गोडी, हौस, व नूतन अपरिचित कामाविषयीं हिय्या, हे गुण अंगीं जडतील असें त्यांस वळण देण्याचा यत्न केला पाहिजे. नावडता विषय घांसून मुलांच्या मनास किळस मात्र येतो; श्रम करण्याच्या हौसेवर पाणी पडतें; बुध्यांकुर खुटतो व तिची कुशाग्रता बोथट होते; गुरूचे वाग्बाणही तेथें मग कार्यविरहित खालीं पडतात;

त्यांचा रिघाव होत नाहीं; "नळी फुंकिली सोनारें नि इकडून तिकडे गेलें वारें" अशी दशा मुलांची होते. वाचकांस आह्मी वाहावलों असें वाटेल, परंतु आमच्या गोष्टीचा ओघच तसा आला.

ठाण्याचे कलेक्टर लॉ साहेब यांनीं नानांस एकवेळ धुडकावून वेड्यांत काढलें होतें ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत असेलच. त्यांच्या मुख्य कारकुनाची जागा खालीं झाली. त्यांनीं आमच्या नायकांस आपण होऊनच एक चिठी पाठविली, व मुख्य कारकुनाची जागा रिकामी झाली आहे; पतकरणें असल्यास यावें; हा मजकूर वाचून नानांस मोठें नवल वाटलें. जागा दिडशांची, कायमची व जमाबंदी खातें. पाऊणशांची डळमळीत जागा सोडून जावें असें कोणास वाटणार नाहीं? माध्याह्नकाळीं एखाद्या वाटसरूला उभें रहाण्यास जागा तरी मिळो असें झालें असतां तुह्मीं पंचपक्वान्नी भोजन स्वीकाराल काय? असा एखाद्या गृहस्थाश्रमी सत्पुरुषानें प्रश्न केला तर त्याबद्दल विचार करण्यास कोणी वेळ लावील काय? नाना ठाण्यास जाऊन कामावर रुजू झाले.

तेथील पोलिसाचे मुख्य अधिकारी कॅपटन् मिलन् नांवाचे यूरोपस्थ गृहस्थ होते. मुंबईचे प्रस्तुत बिशप यांचे हे वडील होत. हे गृहस्थ फार सरळ मनाचे होते; मोठ्या कुळांतले, लष्करी खात्यांतले व वजनदार पुरुष होते; यांच्या पत्नीस व यांच्याच घरांतील आणखी एका युवतीस खासगी वेळांत मराठी शिकविण्याचें काम यांनीं पतकरलें. स्वभाषानैपुण्य संपादन केल्यानें व स्वभाषेंतच अनेक

विषयांत पारंगत मनुष्याच्या बुद्धीस तीव्रता, ग्राहकता, आणि स्थैर्य आलें असलें ह्मणजे परकीय बिकट भाषाही अवगत करून घेण्यास फारसें कठीण पडत नाहीं. ही गोष्ट प्रस्तुत आमच्या विद्या व्यासंगांत निमग्न झालेल्या एतद्देशीय गृहस्थांस व विद्याखात्यांतील मोठमोठ्या पटाईत अधिकाऱ्यांस कळतच नाहीं काय? ह्या बाईस एकवेळ मूळाक्षरें मात्र शिकविलीं व नंतर काना, मात्रा वेलांटी, उकारादि खुणांची मोडणी व त्यांच्या उच्चारांची पद्धत एकवेळ दाखवून दिली. ती सुशील गृहिणी दुसऱ्याच दिवशीं सुवाच्य बालबोधवाचनशकट गुरूंची फारशी मदत घेतल्याशिवाय हांकूं लागली. परस्परांच्या मनावर एकमेकांच्या बुद्धितीव्रतेचा व शिक्षणकौशल्याचा उत्तम ग्रह झाला. नाना तर तिच्या कुशाग्र बुद्धीचें शेवटपर्यंत कौतुक करीत असत. तिनें आपल्या पतीजवळ यांच्या विद्वत्तेचें व शिकविण्याच्या शैलीचें नेहमीं गीतच गात असावें. कधीं तिला आपल्या स्नेहीमंडळीमध्यें जाणें झाल्यास तेथें तिची पहिली गोष्ट आपल्या पंडितांची असे.

फावल्या वेळांत नाना बड्या गृहस्थांची कधीं कधीं भेट घेत असत. तेथील जज्जांची व आमच्या नायकांची कांहीं कारणावरून ओळख झाली होती. या गृहस्थाचें नांव लॅम्स्डेन् असें होतें. यांस भेटण्याचा उद्देश आरंभीं सत्समागम, याखेरीज अधिक नव्हता. यांच्या भेटीस जावें त्यावेळीं या जज्जांस जे विषय आवडत असत त्या विषयांमध्यें नानांची पारंगता पाहून या उभयतांचा बराच प्रे-

मभाव जडला. पुढें हे साहेब बदलून पोलिटिकल् खात्याचे सेक्रेटरी (चिटणीस) झाले.

---

## भाग ५.

### कोल्हापुरास पोलिटिकल् सुपरिंटेंडंटचे हेडक्लार्क (मुख्य कारभारी) व राजांचे खासगी शिक्षक.

कोल्हापुरास पोलिटिकल् सुपरिंटेंडेंट अंडरसन् साहेब होते, त्यांचे मुख्य कारकुनाची २०० रुपयांची जागा खालीं झाली अशी नानांस बातमी लागली, व ती आपणांस मिळावी ह्मणून सदरहू साहेबांकडे नानांनीं एक अर्ज पाठविला. नंतर ताबडतोब मुंबईस येऊन लॅमूस्डेन् साहेबांस भेटले व कोल्हापुरच्या जागेविषयीं हकीगत सांगून तेथील साहेबांस एक पत्र आपल्याबद्दल लिहिण्याविषयीं विनंति केली. या गृहस्थांनीं आरंभीं कांहीं आढेवेढे घेतले, परंतु कांहींवेळ विचार करून एक चिठी लिहिली, व नानांच्या स्वाधीन करून ती टपालांत टाकण्यास सांगितलें. ती जागा त्या पत्राप्रमाणें नानांसच मिळाली. पोलिटिकल् सुपरिंटेंडेंट ह्मणजे सेक्रेटरीच्या खालच्या पायरीचे मनुष्य; तेव्हां या चिठीस मान देणें भाग पडलें कीं काय कोण जाणें.

कोल्हापुर मुक्कामीं नानांच्या आंगचे अनेक गुण प्रगट होण्यास एक स्थळ मिळालें. कोणत्याही प्रकारचें काम पुढें आल्यास त्याकडे एकाग्रतेनें कान देऊन व लक्ष लावून मुग्ध बसणें हा गुण नानांच्या आंगच्या पुष्कळ गुणांमध्यें विचित्र होता. यांच्या आंगीं धूर्तता अधिक

किंवा विषयाची ग्राहकता अधिक हे निवडणें फार कठीण काम आहे.

यावेळीं संस्थानांतील लोकांस हल्लींच्या मानाप्रमाणें पाहूं गेल्यास अर्वाचीन सार्वजनिक शिक्षण फारच कमी असे. तें साधारण सर्व लोकांस मिळावें असें तेथील पोलिटिकल् सुपरिंटेंडंट यांच्या मनांत नानांनींच भरून दिलें. तें काम जारीनें चालविण्यास नानांची जितकी मदत झाली तितकी फार थोड्या लोकांची झाली असेल, असें ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. त्या ठिकाणीं एक प्रथमच छापखाना आणवून मासिक पुस्तक सुरु केलें. त्याची सर्व व्यवस्था नानांकडे असे. या मासिक पुस्तकामध्यें व्यावहारिक विषयावर जे लेख येत असत ते सर्व यांचे असत. तेणेंकरून यांच्या विद्वत्तेविषयीं व साधारण ऐहिक माहितीविषयीं लोकांच्या व पोलिटिकल् सुपरिंटेंडंटाच्या मनावर ग्रह चांगल्या प्रकारचा झाला. नानांचें वास्तव्य कोल्हापुर मुकामीं होतें, तेथपर्यंत या मासिकपुस्तकाच्या उत्कर्षाप्रीत्यर्थ यांचे अव्याहत परिश्रम चालले होते. कोल्हापुरामध्यें इंग्रजी शाळा (प्रस्तुत हायस्कूल) नानांच्या विद्याभिरुचीमुळें व प्रचंड खटपटीमुळेंच स्थापन झालें.

यावेळीं राजकुळांत **बाबासाहेब** व **चिमासाहेब** असे दोन बंधु असत. पहिल्या पुरुषाचा स्वभाव शांत असून त्यामध्यें राजकुळांतील शिपाईबाणा कांहीं झळकत नव्हता. दुसऱ्याचा स्वभाव याच्या अगदीं उलट होता. **चिमासाहेब** बंडास सामील असल्याचा इंग्रजसरकारास संशय आल्यावरून १८५७ सालच्या सत्रामध्यें यांस

कराचीस वास्तव्य करणें भाग पडलें होतें ही गोष्ट आमच्या वाचकांस माहीतच असेल. वडील अपत्याचा स्वभाव गरीब, भोळा, दयाळू अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त असतो व उत्तरोत्तर पुढील अपत्यें अधिक बुद्धिवान्, धूर्त, तल्लख, वगैरे गुणसंपन्न आढळतात. याचें कारण मातापितरांचे वयामध्यें व मानसिक बुद्धि, शक्ति वगैरेमध्यें जो फरक पडत जातो तो असावा असें अनुमान केल्याशिवाय राहवत नाहीं. असें जर आहे तर आईबापांच्या शरीरामध्यें आणि बुद्धीमध्यें आधिक्य आणण्याचा यत्न प्रथम करून मग त्यांस आईबाप होऊं देणें हें अगदीं जरूर आहे. हा पुढील प्रजा सशक्त व बुद्धिवान् करण्याचा एक मार्ग आहे, हें कोणी नाकबूल करील काय? हा वर सांगितलेला फरक नाना व त्यांचे वडील बंधु व नानांचीं मुलें यांमध्येंही आमच्या मतें व्यक्त होत असे. असो. या राजकुळांतील बंधुद्वयांस तीन वर्षेंपर्यंत नानांचें शिक्षण होतें.

कोल्हापुर संस्थानांतील इनामदार लोकांचीं इनामें तपासण्याचें काम यावेळीं चाललें होतें. या लोकांच्या सनदा तपासून त्या खऱ्या असल्यास चालू ठेवावयाच्या, नाहींपेक्षां बंद करावयाच्या. हें काम ज्याच्या हातीं असणार, त्याचे हातीं लोकांचें बरेंवाईट करण्याचें पुष्कळ अंशीं रहाणार, तर हें काम करणाराचे अंगीं पहिला गुण ह्मणजे पापभीरूपणा असला पाहिजे. सारासार विचारबुद्धि, न्यायदृष्टी, व्यक्तिविशेषाचें हित व सार्वजनिक संस्थानाचें हित यांत फरक कोणत्या प्रकारचा असला पा-

हिजे, पहिल्याचें महत्व दुसऱ्याच्या पुढें कोणकोणत्या गोष्टीं मध्यें व कोण कोणत्या स्थळीं लोपून गेलें पाहिजे, हें समजण्याची शक्ति या सर्व गुणांचें मूळ विशेष विद्वत्ता हें होय. अशा गुणमंडित पुरुषाच्या हातीं हें काम पडलें, व साधारण रीत्या पाहूं गेलें असतां लोकांमध्यें अस्वस्थता, दुःख, व हायहाय वगैरे न पसरतां आणि सरकारचें नुकसान न होतां या कामाचा शेवट आमचे नायक नाना यांचे हातून झाला.

दोन पक्षकार न्यायाधीशापुढें आले ह्मणजे, एकास यश व दुसऱ्यास अपयश आलेंच पाहिजे. दुसरा मनुष्य सहिष्णु व न्यायी असला तर फारसा कुरकुरणार नाहीं. तेंच त्यास अपहार करण्याची इच्छा असल्यास तो स्वस्थ बसणार नाहीं. तो, न्याय झाल्यावरही सूड उगविण्याकरितां दगडावर दगड घांशीत बसतोच. त्याप्रमाणें कितीएक अपयश आलेले दुष्ट मनाचे लोक होते त्याणीं नाना लांच खातात अशी कंडी उठविली; व ही हूक त्यांच्या वरिष्ठांच्या कानावर गेली. तथापि नानांचा पापभीरूपणा व प्रामाणिकपणा याविषयीं अनेक कारणांवरून खात्री झालेली असल्यामुळें त्यापासून कांहीं एक परिणाम झाला नाहीं. असो. आह्मांस येथें असें सांगणें भाग आहे कीं हा विनाकारण आरोप हलक्या लोकांच्या तोंडीं असतो, व तो हे गृहस्थ नोकरीवर होते तोंपर्यंत लोकांच्या तोंडीं होता. तो नानांच्या कांनींही कधींकधीं येत असे, तरी "कर नाहीं त्यास डर कशास पाहिजे," असें ह्मणून त्यांनीं स्वस्थ असावें. अशी बोलवा उठण्याचें कारण काय असावें याचा शोध त्यांनीं

मुळींच केला नाहीं, किंवा त्यांस माहिती असून तीं कारणें मोडून टाकण्याचा यत्नही केला नाहीं ह्मणा. यांचा स्वभाव दुसऱ्याचें मन दुखावेल तें काम होतां होईं तोंपर्यंत न करण्याचा होता. यांच्या पदरीं ह्मणा किंवा आश्रयास ह्मणा, कांहीं लोक असे होते कीं ते यांचे अपकीर्तीस कारण झाले असें ह्मटलें तरी चालेल. यांच्यापुढें त्यांच्या दुष्कृतीचा प्रश्न न्यायास आल्याखेरीज ते त्यांस वाईट ह्मणत नसत. कोणत्याही स्वभावाचा मनुष्य असला तरी यांचें त्याच्याशीं पटणार नाहीं अशी गोष्ट कधींच होत नसे. त्यांच्यापाशीं चोर, चहाड, लबाड, लुच्चा, कसाही मनुष्य आला तरी गोड शब्दांनीं त्याचें समाधान व्हावयाचें. भेटावयास येणारा मनुष्य कसाही असो, ज्यांना तो भेटावयास येतो त्यांच्या सौजन्याप्रमाणें त्यास नानांच्या हातून सन्मान मिळत असे. या स्वभावाचा लोकांवर परिणाम असा झाला कीं, यांच्या सहवासाच्या कांहीं वाईट लोकांनीं आतुर, गरजू लोकांना थाप द्यावी आणि ह्मणावें, आह्मी हरतऱ्हा करून आपलें काम करून देतों, मग त्यांस लांच देऊन ह्मणा किंवा आमचा त्यांचा स्नेह आहे तो खर्चीं घालून ह्मणा; अशी भुरळ घालून लोकांपासून पैसे उपटावे. गरजू मनुष्यास दूर उभा करून या लबाड मनुष्यानें नानांची भेट घ्यावी व इकडील तिकडील हवा पाण्याच्या सर्व साधारण गप्पा माराव्या आणि गरजूस आपलें काम खचित होणार ह्मणून येऊन सांगावें. असा क्रम चालत असतां दहा गोष्टींमध्यें एकादी गोष्ट "काकतालीय न्या-

यानें" मनासारखी जमून जाई. व त्यानें लोकांमध्यें सांगत फिरावें कीं, कां? नानांला अमक्याच्या मार्फत पैसे चारले, पण काम झालें. ऐकणारांमध्यें सांगितल्या गोष्टीचा खरेपणा, साधकबाधक कारणें ताडून मागचें पुढचें धोरण राखून व सांगणाराची योग्यता, अंतर्यामींचे हेतु व त्याचा खोटा समज होण्याचा संभव, अशा अनेक गोष्टींचा विचार करून तथ्यांश काढीत बसणारा सद्गृहस्थ फार विरळा. श्रमसाध्य वस्तु संपादन करण्यापेक्षां सहज मिळेल तेंच घेऊन समाधान मानण्याकडे साधारण मनुष्यमात्राचा कल अधिक असतो. परक्याच्या दोषावर साधारण लोक जितका अधिक विश्वास ठेवितात, तितका गुणांवर ठेवीत नाहींत. अशी गोष्ट लांचाच्या व व्यभिचाराच्या कामांत फार अनुभवास येते. तर नानासाहेबांविषयीं लोक असें बोलूं लागले यांत काहीं नवल नाहीं. यांच्याविषयीं आणखी एका गोष्टीमध्यें लोकांचा गैर समज झाला होता, त्याजविषयीं आपण योग्यस्थळीं विचार करूं.

जैनधर्म हा हिंदुधर्माचाच फांटा आहे. तरी या उभय धर्माच्या लोकांमध्यें आचारविचारांत इतका फरक पडला आहे कीं, उभयपक्षाचे लोक एकमेकांस पाण्यांत पहात असतात. ज्या पक्षाला राजाश्रय असतो त्या पक्षाचा पगडा वर असलाच पाहिजे. कोल्हापुर संस्थान ह्मणजे तेथील सरकार हिंदुधर्मानुयायी आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. यांच्या अंमलाखालीं लिंगाईतवाणी व जैनधर्मी लोकांचा भरणा बराच आहे.

यांच्या पारसनाथ देवाची मूर्ति नग्न असते. या मूर्ति शहरांतून प्रसिद्धपणें हिंदु लोकांच्या भरवस्तींतून नेण्यास परवानगी मिळणें दुरापस्त असे. तथापि, दरसाल श्रावक लोकांनीं यत्न करणें सोडलें नाहीं. दरसाल त्यांनीं सरकारास अर्ज करावा व त्यांस प्रतिकूळ असा त्यांच्या अर्जाचा निकाल व्हावा. कारण दाजी कृष्ण पंडित मुख्य कारभारी ब्राह्मण, रावसाहेब सरलष्कर सर्व सैन्याचे मुख्य अधिकारी अस्सल मराठे साहेब, यांचे शिरस्तेदारही ब्राह्मणच. एवंच सरकारी कारभारांत राजापासून तों अगदीं हलक्या प्रतीच्या नोकरांपर्यंत सर्वच हिंदुधर्मानुयायी भरलेले, व जैन लोकांचा समाज जरी श्रीमान् असे तरी ते पडले व्यापारी. त्यांचा अर्ज पोलिटिकल सुपरिंटेंडंट साहेबांपुढें येऊंच देत नसत. आल्यास हिंदुधर्मास अनुकूळ अशा तऱ्हेनें समजावणी केली ह्मणजे झालें.

प्रस्तुत, पोलिटिकल् सुपरिंटेंडंट साहेब महत्वाचीं कामें नानांकडून समजून घेत असत, हें आमच्या वाचकांच्या लक्षांत असेलच. या अर्जाचा निकाल नानांनीं आपण कोणच्याच धर्माचे नव्हे अशी कल्पना करून केला व उभयपक्षांच्या खऱ्या वस्तुस्थितीची समजूत सुपरिंटेंडंट साहेबांची पाडून दिली. कोणाच्याही धर्मसंबंधी विचारांत व समजुतींत परधर्मी लोकांनीं हात घालण्याचा यत्न करूं नये तर जैनधर्मी लोकांचे पक्षास मदत करावी असें त्यांचे मनांत भरून गेलें. सर्व राज्यशकटाच्या दोऱ्या हिंदु लोकांच्या हातीं होत्या. तेव्हां यांच्याकडून सुपरिंटेंडंट

साहेबांच्या ह्मणण्यास प्रतिकूळ अशा गोष्टी होऊं लागल्या. खुद्द मासाहेबांचेही ( राणीसाहेब ) कान भरून मध्यस्ती घातल्या. खून पडतील, शहरभर दंगा होईल, लोकांमध्यें अस्वस्थता होईल, भर ब्राह्मणवस्तींतून नग्नमूर्ति जाणें अगदीं प्रळयास कारण होईल, अशी धास्ती सर्वांनीं घातली. नानांनीं मूर्ति जाण्याच्या रस्त्यावरील ब्राह्मणांची गुप्तपणें भेट घेण्याचा बेत केला. हा निश्चय अंडरसन् साहेबांस पसंत पडला, व त्यांनीं नानांबरोबर येण्याचा विचार केला. मूर्ती जाण्याच्या अगोदर चार दिवस उभयतां उठून त्या रस्त्यावरील ब्राह्मणांमध्यें जाडीं जाडीं प्रकर्णें होतीं त्यांस जाऊन भेटले आणि सांगितलें कीं, अमुक दिवशीं अमक्यावेळीं एक दोन तास कृपाकरून जैनांचे देव मार्गानें जात असतील तेव्हां दरवाजे लाऊन बसावें ह्मणजे अदर्शनीय मूर्ती निर्मळ ब्रह्मवृंदांच्या नजरेस पडणार नाहींत. हें गोड बोलणें आणि त्यांत साहेबांच्या तोंडचें, व साहेब स्वतः आमच्या घरीं येऊन बोलले ह्मणून सर्व ब्राह्मण कबूल झाले इतकेंच नव्हे, पण त्यांनीं साहेबांचे फार आभार मानले, कारण राजकीय लोकांचीं अगोदर झालेलीं बोलणीं त्यांस मुळींच माहीत नव्हतीं. पालखीचा दिवस येऊन ठेपला. नाना, सुपरिंटेंडंट साहेब स्वतां, आणखी कांहीं यूरोपिअन् व एतद्देशीय कामदार लोक घोड्यावर बसून बंदोबस्ताकरितां निघाले. इकडे गांवांतील ब्राह्मण व इतर हिंदुलोक अंबाबाईच्या देवळांत जमले व बंदोबस्ताकरितां आलेल्या लष्करी स्वारांवर व पोलिसांवर दगड फेकूं लागले. कांहीं लोकांचीं डोकीं

फुटली. देवळाजवळ बराच दंगा झाला. जिकडे तिकडे धराधर आणि पळापळ चालली. इतक्यांत एक स्वार दवडत दवडत सुपरिंटेंडंट साहेबांजवळ येऊन त्यानें त्यांस हीं देवळाजवळ चाललेल्या दंग्याची खबर दिली. सुपरिंटेंडंट साहेबांची टोळी एका निमिषांत देवळाजवळ येऊन ठेपली. इतक्यांत देवळांतून सर्व लोक फरारी झाले. बऱ्याच लोकांच्या मुसक्या बांधल्या होत्या. त्यांपैकीं एका बड्या सरदारास नानांनीं ओळखलें. ते गृहस्थ राजकुळाचे संबंधी होते, साहेबांचे कोर्टांत कारणपरत्वें हे सरदार ऑसेसर् असत, तथापि त्या स्थितींतल्या पोषाखामुळें साहेब मजकुरांनीं त्यांस ओळखलें नाहीं. नानांनीं हळूच कानाशीं लागून त्या बड्या गृहस्थांची ओळख दिली, व ताबडतोब त्यांची मुक्तता करविली, व त्यांस घरीं पोंचते करण्यास सांगितलें. जिकडे तिकडे थावराथावर झाल्यावर नाना व सुपरिंटेंडंट साहेब स्वतः त्या गृहस्थांकडे जाऊन त्यांची क्षमा मागितली व ह्मणाले कीं, त्या ठिकाणीं आपला जो अपमान झाला तो आमचा झाला असें आह्मी समजतों. तर या आमच्या अपराधाची क्षमा करणें आपणांकडे आहे. हें सुपरिंटेंडंट साहेबांचें बोलणें ऐकतांच ते गृहस्थ अगदीं विरघळून गेले.

इतक्यांत अंडरसन साहेबांची बदली झाली व कायमचे पोलिटिकल सुपरिंटेंडंट मेजर ग्रेहाम साहेब तेथें आले. अन्डरसन साहेब व मेजर ग्रेहाम या दोन गृहस्थांचा नानांविषयीं चांगला अभिप्राय दिवसेंदिवस वृद्धिंगत होऊन परस्परांमध्यें प्रेम वाढत चाललें. या उभयतां

साहेबांनीं नानांबद्दल सरकारास स्तुतिपर लेख लिहिले व सरकारानेंही तत्संबंधी आपली पूर्ण मान्यता त्यांस लेखी कळविली आहे. त्या प्रदेशामध्यें विद्याप्रसाराच्या कामीं नानांनीं जे झटून परिश्रम केले त्याबद्दल त्यांची त्यांच्या वरिष्ठांनीं फार वाखाणणी केली. शेवटीं सरकारानें यांस डेप्युटी कलेक्टरची जागा दिली. कोल्हापुर येथील नानांच्या वरिष्ठ अंमलदारांनीं सरकारास उलट लिहिलें कीं नानांस अद्याप कांहीं दिवस आमच्यानें सोडवत नाहीं. या मनुष्याच्या सौजन्याचा, बुद्धीचा, विद्वत्तेचा आणि कोल्हापुर संस्थानांतील अनेक सरकारी गोष्टींची जी त्यांस माहिती झाली आहे त्यांपासून अद्याप येथील लोकांस हित करून घेणें आहे, सबब त्यांच्या बढतीकरितां त्यांस येथेंच पगार वाढवून ह्याच ठिकाणीं ठेवण्याची मेहरबानी करावी. ती गोष्ट सरकारानें पसंत केली नाहीं.

सरकारी अधिकारी आपल्या हाताखालीं सार्वजनिक-कामांत आप्तविषयी सोयारेधायरे भरतात असा आक्षेप आमच्या बहुत अधिकाऱ्यांवर आणलेला आढळतो. व जर या आक्षेपांत कांहीं सत्व आहे असें कबूल केलें तर या आमच्या नायकांवरही अंशतः येऊं शकतो, हें प्रस्तुत व कांहीं पुढील उदाहरणांवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

नानासाहेबानीं बरेच दिवस खटपट व प्रयत्न सुरू ठेवल्यामुळें कोल्हापुरास एक इंग्रजी शाळा स्थापन करण्याचा विचार झाला. नानांचें वजन बरेंच असे. यांच्या इंग्रजीभाषाज्ञानाविषयीं त्यांच्या वरिष्ठांचा अभिप्राय मत्सर उत्पन्न होण्यासारखा होता, तेव्हां हेड्मास्तर नेमण्याचें काम

वस्तुतः यांचेकडेसच होतें. आत्माराम नारायण, नानांचे पितृस्थानीं मानलेले चुलते त्यांचे हे चिरंजीव, यांस नानांनीं हेडमास्तर नेमविलें. हे गृहस्थ शाळेचें काम करण्यालायक होते. ही शाळा प्रस्तुत "राजाराम हायस्कूल" या नांवानें प्रसिद्ध आहे. ही शाळा, एक छापखाना व मागें निर्दिष्ट केलेलें मासिकपत्र या तिहींच्या उत्कर्षासाठीं नानांनीं अव्याहत व अश्रांत श्रम केले. त्या श्रमांचें पुढें कालगतीनें उत्कृष्ट फळ आलें. सुपरिंटेंडंटच्या ऑफिसांत एक इंग्रजी कारकुनाची जागा झाली, ती यांनीं सदाशीव सखाराम यांस देवविली. हे गृहस्थ नानांचे अति जिवलग लंगोटीयार व त्यांचेच जातीचे होते. हे गृहस्थही या कामास अयोग्य नव्हते; नंतर त्याच ऑफिसांत आणखी एक जागा झाली, तीही त्यांनीं सजातीय परभू अनंतराव चाफाजी यांस मिळेल अशी तजवीज केली व तदनुसार गोष्ट घडून आली.

मानव स्वभावाचें पृथक्करण करण्यास विचारांची शस्त्रक्रिया जर वरील आक्षेपाच्या भ्रमाच्या भोंपळयावर करून पाहिली तर तो तत्क्षणींच फुटून आंत कांहीं सांपडत नाहीं. लोकांच्या गुणावगुणांमध्यें निवड करावयाची ती माहितीवरून. स्वतः त्या प्रसंगीं चौकशी करून वर्तमानकाळीं माहिती मिळवा अथवा भूतकाळीं संपादन केलेल्या माहितीचा संचय घ्या. वर्तमानकाळच्या माहितीमध्यें ओळखी, स्नेही व बडे कीर्तिमान् पुरुष यांच्या शिफारसी मोडतात. भूतकाळच्या माहितीमध्यें स्नेही, संबंधी, ओळखीदेखी व नातेवाईक वगैरेंची गणना करूं. या दोन काळच्या माहितींत भूतकाळची माहिती दृढतर असते,

तर मनुष्यानें कोणत्या माहितीवर अवलंबून चालावें? आपले निकटसंबंधी लोकांचेच हक्क पहिल्यानें पुढें येतात व त्यानंतर पायरीपायरीनें इतरांचे. हा तर मानवस्वभावच आहे. हिंदुस्थानांतशी काय, परंतु प्रत्येक सुशिक्षित व अशिक्षित देशांत सुद्धां हीच तऱ्हा वाचकांस आढळेल. बादशाहींत मुसलमान लोकांचें प्राबल्य असे. पेशवाईंत ब्राह्मण पुढें सरसावलेले दिसत. इंग्रजींत सुद्धां शेंकडों ठिकाणीं अशीच ओरड कानीं येते. पंचवीस रुपयांच्या जागेपर्यंत ख्रिस्तानुयायी मिळेल तर बरा. मामलेदारीच्या हुद्याकरितां उमेदवार ग्रॅज्युएट् पाहिजे; परंतु एकाद्या गव्हरनर साहेबांच्या नाकचा बाल, अथवा एकाद्या राजकुलोत्पन्न बड्या साहेबांच्या भेटीनें पावन झालेला मनुष्य, एकादी क्षुल्लक परीक्षा पास होऊन पंचवीसांवरून ३।४ शें रुपयांवर एकदम उडी मारूं शकतो; आणि ही तर अनुभवसिद्ध गोष्ट आहे कीं, बहुतेक सार्वजनिक सरकारी कामें ( विद्याखातें खेरीजकरून ) साधारण शिकलेला मनुष्य प्रामाणिक, पापभीरू, व उद्योगी असला तर करूं शकतो. आतां नीतिमत्ता असून जर बुद्धिमत्ता त्यांत मिळालेली असली तर दुधांत साखर पडून सोन्यापेक्षां पिवळें होईल, पण केवळ दुसऱ्या गुणांवर भरवसा ठेवतां येत नाहीं. विद्वान् झाला ह्मणजे पापभीरू होतोच असा नेम बांधतां येत नाहीं. इतकें मात्र खरें कीं, जाणत्याची लबाडी अजाणाच्या खुळेपणापेक्षां अधिक बेमालुम होऊन उघडकीस येणें दुरापस्त होईल; पण ह्मणूनच अधिक भयंकर!

---

## भाग ६.

## सोलापुरची कारकीर्द. फौजदारी न्यायाधीश.

सोलापुरास जाऊन लफ्नन् साहेब कलेक्टर होते त्यांच्या हाताखालीं डेप्युटी कलेक्टरचीं वस्त्रें नानांनीं स्वीकारलीं. या ठिकाणीं यांचें वास्तव्य फार दिवस झालें नाहीं; कारण हे साहेब धर्मभोळे, हलक्या कानाचे, हेकेखोर व एकदां मनानें जी गोष्ट धरली तिच्या विरुद्ध कितीही खातरीलायक प्रमाणें आढळलीं तरी तिकडे दुर्लक्ष करणारे होते. हे रत्नागिरीस असिस्टंट कलेक्टर असतां सदाशीवराव ऊर्फ तात्या ह्मणून कोणी एक मराठा साहेबमजकुरांकडे जोडे फाडीत असे. तात्याच्या मनांत पोलिसामध्यें हुद्याची नोकरी मिळवावयाची होती; तेथें तात्याचा हेतु सिद्धीस न गेल्यामुळें, यानें या कलेक्टरांची पाठ सोलापुरास पुरविली. येथें फौजदारीची जागा यास मिळाली. तात्यासाहेब खराच मराठभाई असे. हुद्याची जागा करण्यांत कीर्तीसंपादन हा त्याचा हेतु नव्हता, तर चैनबाजी, डौल, मिजास व पोकळ मीपणा हा होता. सोलापुर शहरांत या फौजदार साहेबांची स्वारी रस्त्यानें जाऊं लागली ह्मणजे मराठी दरबारांतील कारभारी जात आहेत कीं काय असें लोकांस वाटावें. बरोबर चार शिपाई, चार इतर, दिसण्यांत वजनदार पण लुच्चे लोक, हांजी हांजी करीत असत. फौजदारांचा पोषाख सरदारी डौलाचा असे. लुच्चांची पंढरी पिकलीच होती. त्यांनीं ह्या रावसाहेबांस वेश्यांचे नादीं लावलें. नाच, तमाशे वगैरे यांच्या पुढें करविले कीं, फौजदारांच्या अधिकाराचा दुरुप-

योग पाहिजे त्यानें करावा. या सर्व गोष्टी कलेक्टर साहेबांचे जोरावर चालत, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. सज्जनांस या फौजदारांपासून फार पीडा होत असे, परंतु करतात काय? तात्यानें वेळोवेळीं कलेक्टरांकडे जात असावें व ह्मणावें कीं, सरकार साहेब! माझी मराठ्याची तळी हे ब्राह्मण लोक केव्हां उठवितील याचा नेम नाहीं. हे माझी डाळ शिजूं देतां कठीण दिसतें. आपल्या आश्रयावांचून यांच्या पुढें माझी टांकी लागणार नाहीं. तेव्हां साहेबांनीं ह्मणावें कीं "कुच फिकिर नही हम् देखेंगे," असें ह्मणून साहेबांनीं त्यास आश्वासन देत असावें. तात्या फौजदार नानांचेंही आर्जव करण्यास चुकत नसे. नानांनीं याचें बोलणें मुक्यानीं ऐकून घ्यावें. एक दोन भेटींतच त्यांनीं याची परीक्षा केली; पण हा मूढमति, याला नानांचा अंत लागतो कसा? शेवटीं फौजदारांचे पापाचे घडे भरले. शंभर अपराध झाले, व नानांचे हातून फौजदाराची वाट लागली. तेथें एक सावकार होता; त्यास लिहितां वाचतां वगैरे कांहीं एक येत नव्हतें. त्यानें एक लिंगाईत वाणी कारकून ठेविला. त्याचें दुकान लोखंडी सामानाचें होतें. कारकुनाच्या मनांत पापबुद्धि येऊन खुद्द यजमानास वाटाण्याची अक्षता लावण्याचें त्यानें मनांत योजलें. एकदां नारळ हातीं दिला ह्मणजे आपणच मालक होऊन बसावें अशी तजवीज त्यानें चालविली. या कृत्यास फौजदारांचें उत्तेजन गैबतीपणामुळें मिळालें. कारकुनानें सर्व देव घेव आपल्या नांवानें चालविली. इतर व्यापारी लोकांशीं अडतीचा व्यवहारही त्यानें

आपल्या नांवें फिरवून आपला तळीराम गार करण्याची तयारी केली व तो संधीची वाट पहात बसला होता.

घांटावर शेतें पिकण्याचा समय आला ह्मणजे ते सुगीचे दिवस फार मौजेचे असतात. गरीब, श्रीमान्, आबालवृद्ध सर्व प्रकारचे लोकांस आनंद करण्यास संधी सांपडते. परोप्रकारचें धान्य कोंवळें असतें तोंपर्यंत भाजून खाण्याची गंमत असते. तें पौष्टिक व मिष्ट असतें आणि त्या दिवसांत विपुल असतें. आप्त, स्नेही, कामदार व बडे गृहस्थ यांस त्याच्या लोक मेजवान्या करतात. सर्व धान्यांमध्यें जोंधळा श्रेष्ठ आहे. त्यांत शाळू ह्मणून एक प्रकार आहे त्याची गोडी अनुपम्य आहे,ती खाणारालाच माहीत. या धान्याच्या हुरड्याची मेजवानी करण्याचा बेत करून या गुलहौसी फौजदारांस रविवारीं या कारकुनानें शहराबाहेर बरेंच दूर काढलें, आणि सदर्हू लिंगाइताच्या साथ्यांनीं त्या व्यापाऱ्याचे दुकानचा माल दुसरे ठिकाणीं सपाट्यानें नेला. व्यापारी फौजदारांकडे रडत गेला; पण ते ठिकाणावर नव्हते तर दाद कशी लागणार? व्यापारी नानांकडे गेला. तेही घरीं नव्हते. पुन्हा सायंकाळीं सर्व हकीकत त्यानें नानांस सांगितली व फौजदाराकडून कांहीं तजवीज होण्याचा संभव नाहीं असें दर्शविलें. नानांनीं तेथील मामलेदारांस एकदम चौकशी करून योग्य तजवीज करण्याविषयीं आज्ञापत्र लिहिलें. मामलेदार, फार सज्जन, पोक्त, विचारी असे होते. त्यांनीं बारकाईनें सर्व गोष्टींची चौकशी करून आपल्या अभिप्रायासह तो सर्व खटला डेप्युटी साहेबांकडे पाठवून दिला. नानांनीं

चौकशी केली व सर्व पुरावा एकत्र जमा केला. गुन्हा फार मोठा असल्यामुळें, व फौजदाराचा पुरस्कर्ता लफ्नन् साहेब यासही नानांच्या कृत्याविषयीं शंका घेण्यास संधी न मिळावी ह्मणून त्यांनीं खटला सेशनांत पाठविला. तेथें न्यायाधीश टकर साहेब होते. चौकशीअंतीं त्यांनीं लिंगाईत कारकुनास व त्याच्या ह्या दुष्ट कृत्यास मदत करणाऱ्या साथ्यांस कडक शिक्षा केली व त्या गरीब बिचाऱ्या व्यापाऱ्याच्या स्वाधीन त्याचा माल केला. इकडे तात्यासाहेब फौजदार लफ्नन् साहेबांकडे जाऊन त्यानें नानांच्या विरुद्ध यथास्थित कान भरले. तेव्हांपासून या साहेबांचा नानांवर फार राग झाला. कलेक्टर झाले तरी आपल्या हाताखालच्या डेप्युटीस आपल्या विचाराविरुद्ध वागा असें त्यांना सांगतां येईना. असो, सेशनकोर्टानें या अद्वितीय फौजदारांस दूर करण्याविषयीं शिफारस केली, व तदनुसार गोष्ट घडून आली.

---

## भाग ७.

### पुण्याची कारकीर्द. ५७ सालच्या बंडाची धामधूम.

थोड्याच दिवसांनीं नानांची नेमणूक (१८५३) पुण्यास झाली. त्यावेळीं तेथें जोन्स नामक कलेक्टर होते. त्यांचे चिटणीस रामचंद्र सखाराम गुप्ते कायस्थ परभू, व दफ्तरदार मोरोबा सदाशीव, हे मुंबईचे पाठारे परभू. चिटणीसांची व नानांची पूर्वीची ओळख होती, तथापि प्रत्येकजण आपल्या मानापमानास जपत असत. चिटणीसांनीं नानांच्या स्वभावाविषयीं आंतून चौकशी चालविली. डेप्युटी

साहेबांच्या कोर्टांत आह्मीं गेलो असतां आपणांस खुर्ची मिळेल किंवा नाहीं, अशी चिटणिसांनीं चौकशी चालविली नानांनीं मामूल वहिवाट कशीकाय होती याची चौकशी करून ठरविलें कीं, त्यांस खुर्ची देण्याचें कांहीं कारण नाहीं. सरकारी काम व खासगी काम यांत भेद आहे असें ह्मणणारे व समजणारे बरेच लोक मिळतील; परंतु त्या भेदान्वयें वागणारे फार विरळा. कारण सत्पुरुष तुकारामबुवांचें एक वाक्य आहे कीं, "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें," याचा या आयुष्यक्रमणामध्यें पदोपदीं अनुभव घेत जावा तसतसा त्याचा खरेपणा अधिकाधिक अनुभवास येतो. नानांच्या घरीं कोणी आला तरी त्याची उठाबस योग्य तऱ्हेनें व्हावयाचीच. परंतु कोर्टापुढें सर्व लोक सारखे. तेथें नानांची वर्तणूक अगदींच भिन्न दिसत असे, ह्मणून त्यांच्या स्वभावाविषयीं लोकांचा समज निराळयाच प्रकारचा झाला होता. कोणी त्यांस भोळ्या व संभाषणप्रिय स्वभावाचे व कोणी कडक, मितभाषणी व तुडस स्वभावाचे मानूं लागले. कोणी त्यांस न्यायमूर्ति, लुच्चांचे काळ, सज्जनांचे पुरस्कर्ते, समजून राहिले. चिटणीसही फार खुनशी, आपला हेतु साधण्याकरितां न्यायान्याय न पाहणारे व खटपटी होते. यांचें मन नानांविषयीं दिवसेंदिवस दूषित होऊं लागलें. तेथील कलेक्टर जोन्स हे भोळ्या, अनुदार व गैबतीस्वभावाचे,. आणि हलक्या नजरेचे व हलक्या कानाचे होते. त्यामुळें चिटणिसांचा कावा साधण्यास अडचण पडली नाहीं. चिटणिसांनीं नानांस खालीं आणण्यास भगीरथ प्रयत्न मांडला. नानांच्या अ-

गोदर डेप्युटीच्या जाग्यावर विनायकराव वासुदेवजी होते. त्यांचें व जोन्स साहेबांचें पटत नसे; आणि त्याला कारण ह्मणाल तर विनायकरावांस हांजी हांजी करणें आवडत नसे. नानांचीही पद्धत तीच, व जात ही तीच. नानांसही रिकामा चंचलपणा करायास नको असे, तें जोन्स साहेबांस विषम होत असे. मोरोबा सदाशिवजी दफ्तरदार नानांचे ज्ञातिगृहस्थ यांस जरी नानांचे अकल्याणाची इच्छा नव्हती तरी ते नानांस "अं:, हें काय कालचें पोर आहे" असें समजत असत. आणि नानांची सदरील वर्तणूक त्या दफ्तरदारांस उद्धट वाटे. नानांनीं कारणावांचून दफ्तरदार व कलेक्टर यांच्या भेटीस जाण्याची वहिवाट ठेविली नव्हती. स्पायर ह्मणून एक फौजदार व कॅप्टन् केंबल ह्मणून एक पोलीस सुपरिंटेंडंट होता. फौजदार ह्मणजे कलेक्टरच्या नाकचा बाल. हा फौजदार मोठा हुशार, खटपटी, महत्वाकांक्षी व फार लुब्रा असे. त्याच्या मनाप्रमाणें एकाद्या खटल्याची त्यानें मांडणी करावी व नानांपुढें असा डौल घालावा कीं नानांनीं त्याच्या मर्जीप्रमाणेंच निकाल करावा, पण तसें कधींच होत नसे. उघडच आहे, त्यानें आपला डाव वरिष्ठ माजिस्ट्रेटांपुढें अपिलांत साधल्यास साधून घ्यावा. कॅ० केंबल फार भोळा होता, तो फौजदाराच्या अगदीं मुठींत असे. नानांचा सूड घेण्याचा या मंडळीच्या हातीं एकच मार्ग होता. नानांनीं खटल्यांचे निकाल केले ह्मणजे त्यांवर अपिलांत माजिस्ट्रेटानें उलट ठराव करावा; मग त्यांत न्यायान्यायाकडे लक्ष नाहीं, असा क्रम बरेच दिवस

चालला. फौजदारप्रभृति मंडळीचा हेतु इतकाच कीं, लोकांत नानांची नाचक्की व्हावी. वाईटाचा परिणाम वाईटच. कलेक्टराचे अन्यायांचा लोकांमध्यें फार गवगवा झाला. वर्तमानपत्रांतून एकसारखी चर्चा चालली. कलेक्टराच्या कोर्टांत खटल्यामध्यें अन्याय झाला कीं, पुण्याच्या वर्तमानपत्रांत खरमरीत लेख आलाच. शेवटीं माजिस्ट्रेटाकडून एका बाईच्या अपिलाचे कागद गाहाळ झाले व ती बाई सहा महिने तुरंगांत कुजत राहिली. वर्तमानपत्रांनीं त्या बापडीचा खटला हातीं धरला. सरकारची नजर या लेखाकडे गेली. पुण्याच्या सर्व फौजदारीकोर्टाचें काम अव्यवस्थित व बेकायदेशीररीतीनें चाललें आहे, अशी सरकारची खात्री झाली. अशी अनेक गोष्टींत घाण पडली आहे, व ही पुष्कळ दिवसांची फौजदारीकामांत होणारी भयंकर हयगय सरकारास दिसूं लागली. सरकारानें कमिशन नेमण्याचा विचार प्रगट केला. तेव्हां त्या सर्व मंडळाचे मनांत खाऊं लागलें. कलेक्टर व त्यांचे अनुयायी हे मनांत असें ह्मणूं लागले कीं, आतां नानांची भली खोड मोडेल, पण न जाणों, आपणही आंत सांपडूं कीं काय नकळे, कारण "तुरी बरोबर बरड" असें नाहीं झालें ह्मणजे पुरे. कमिशनर कोणी तरी यूरोपियनच असणार, तो कांहीं आपल्या जातीकडे पहाणार नाहीं? आपलें काय गेलें त्यांत? कांहीं का होईना.

दफ्तरदारः—रामचंद्रपंत! नाना नोकरीला मुकण्याचा संभव दिसतो. त्यानें अन्नास महाग व्हावें अशी आमची इच्छा नाहीं.

चिटणीसः—रावसाहेब ह्मणतात, तें सारें खरें; पण "करावें तसें भोगावें," त्यांत आमचेकडे काय बोल?

द०:—"वड्याचं तेल वांग्यावर निघावें" अशी तर तुमची इच्छा नाहीं; मग त्यांत वाईट वाटून काय उपयोग?

चि०:—कलेक्टर आमच्या पक्षाचे आहेत, ह्मणून बरें आहे.

द०:—त्यांत पक्ष कसचा. नानांचें व आमचें कांहीं वैर नाहीं, व एकाद्याच्या अन्नांत माती कालवावी अशीही आमची इच्छा नाहीं. असो. आतां काय होईल तें खरें. ईश्वर करो व थोडक्यावर निभावो ह्मणजे झालें.

चि०:—रावसाहेब! आतां असें कां ह्मणतां. येऊन घेतली खरी. आतां मागें सरून काय उपयोग. होईल तितकें करून मजबूत पुरावा केला पाहिजे.

द०:—खरें हो चिटणीस, पण खोटा तर तयार करावयाचा नाहीं ना?

इकडे नानांची दिलगिरी तर झाली नव्हती; परंतु चिंतातुर अंतःकरणानें रात्रंदिवस चैन पडत नसे. एकतर आपल्या वरिष्ठांनीं आपल्याशीं वैषम्य धरिलें. त्यांच्याशीं गोडी ठेवावी तर अन्याय करून त्यांची मर्जी संपादावी लागती, तेंही मनांत व जनांत अप्रशस्तच. असो. 'सत्यमेव जयते' मग आपल्याला धास्ती कशाला! प्रतिस्पर्धी आपले वरिष्ठ अम्मलदार, तशांत ते यूरोपियन व न्यायाधीशही यूरोपियन. मग काय! अशा कचाटांत आपला निभाव लागतो कसा? असो. ह-

रीची मर्जी. "मृदंगास मार दोन्हीकडून" तशांतली अवस्था. कलेक्टरांचे मनाप्रमाणें वागावें तर अन्याय होतो. बरें, सरकार ह्मणणार बेकायदेशीर आज्ञा कलेक्टरांची झाली ह्मणून स्वतंत्र न्यायाधिशानें तुह्मी ऐकावी कां! "इकडे आड नि तिकडे विहीर" सत्यच काय हात देईल तो खरा. अशा विवंचनेंत उभय पक्ष पडले. या ओरडीची सरकार दाद काय घेतें, याकडे वर्तमानपत्रें काकदृष्टीनें पाहूं लागलीं; इतक्यांत जार्ज इन्व्हेरॅरिटी साहेब सरकारचें आज्ञापत्र घेऊन त्या फौजदारी कामाच्या चिवड्याची चौकशी करण्याकरितां पुण्यास येऊन थडकले.

नाना ह्मणजे मोठे मानी गृहस्थ. त्यांचे स्नेहीमंडळीनें त्यांस सुचविलें कीं, आपण इन्व्हेरॅरिटी साहेबांस भेटण्यास जावें; परंतु त्यांनीं असा विचार केला कीं, जर आपण त्यांस भेटण्यास गेलों तर विनाकारण लोकांत नाचक्की होईल; तशांत त्यांनीं भेट दिली तर बरी, नाहीं तर त्या अपमानासारखें दुसरें मरण नाहीं. तर भेटीस जाणेंच प्रशस्त नाहीं.

उदारशिक्षणानें नानांचें मन शांत, विचारी व विद्याव्यासंगपरायण झालें होतें, हें वाचकांच्या लक्षांत असलेंच. त्यांचें एक विचारणीय उदाहरण आहे. इकडे कमिशनाकडून चौकशी चालली असतां, नाना आपणांस खऱ्या इंग्रजी मनुष्याचा समागम असावा या शोधांत होते. पूनाकॅम्पमध्यें कोणी एक गौरकाय गृहस्थ असत, यांच्यापासून त्या लोकांची रीतभात व प्रचारांतील संभाषणाचे रिवाज नाना शिकत असत व ते गृहस्थ आस्थेनें नानांची

मार्गप्रतिक्षा करीत रोज बसत. संध्याकाळीं सरकारी काम संपल्यानंतर रोज जाऊन कांहीं तरी व्यासंग या गृहस्था-समवेत करावा, हे गृहस्थ शिक्षकाच्या कामांत फार निपुण असल्यामुळें त्यांच्यापाशीं शिकण्याकरितां जात असत असें नाहीं, परंतु ते स्वतः 'इंग्लिशमन्' असल्यामुळें खरी इंग्रजी पद्धत कोणती इतकें त्यांच्याकडून संपादन करतां येई. तात्पर्य, विद्वान् मनुष्य सज्जन गृहस्थाशीं जसें साहचर्य स्वीकारतो त्याप्रमाणें या उभयतांचें काम चालत असे. कमिशनाच्या धामधुमींतही हा खासगी मनोरंजक व्यवसाय बंद पडला नव्हता. खासगी काम नानासाहे-बांस अति उत्तम रीतीनें निराळें ठेवतां येत असे त्याचें हें एक विलक्षण उदाहरण नव्हे काय?

नाना आपल्या उत्पन्नाचा कांहीं नियमित भाग पुस्तकें खरेदी करण्यांत घालीत. असा क्रम बरेच वर्षेपर्यंत चालल्यामुळें नानातऱ्हेचीं अनेक भाषेंतील पुस्तकें त्यांच्या संग्रहास जमलीं. पुढें या पुस्तकालयाची मोड-तोडच माझ्या दृष्टीस पडली, व उत्तरोत्तर त्याचा अगदींच ऱ्हास होत गेला, हें पाहून माझ्या तर काय, परंतु कोणा-च्याही मनास दुःख झाल्यावांचून रहाणार नाहीं. यां-तील पुस्तकें ज्यांच्या हातीं लागलीं त्यांनींच बळकाविलीं. भिंतीला टांगण्याचे अनेक नकाशे, भूगोल, खगोल, संस्कृत, पोर्च्युगीज, आरबी, उर्दु, फारशी, लॅटिन्, ग्रीक, मराठी वगैरे भाषांतील तऱ्हेतऱ्हेचे मोठमोठ्या किंमतीचे उपलब्ध कोश यांच्या संग्रहीं असत, ते सरकारी व सा-र्वजनिक पुस्तकालयांत मिळणें मुष्कील असतात. इंग्रजी

भाषेंतील कायदेप्रकरणाचे कोश निराळे, शिल्पशास्त्राचे निराळे, रसायनशास्त्राचे निराळे होते. हे माजिस्ट्रेटचें काम करीत असल्यामुळें कायद्याचीं पुस्तकें जीं मोठ्या भरभसटीच्या वकिलांच्या पुस्तकालयांत किंमतिविशेषामुळें सांपडणार नाहींत तीं पुस्तकें यांच्या घरीं सांपडावयाचीं. असो, जसजसें नानांचें वय होत गेलें तसतसें अमोल्य पुस्तकसंग्रहाकडील लक्ष कमी कमी होत चाललें. बरें, कित्येक वर्षांच्या झरवण्यानें हा जमलेला ग्रंथसमूह याची चीज, गौरव आणि कौतुक करणारा मागाहून कोणी निर्माण करणें ईश्वराचे मनांत आलें नाहीं अथवा असें रत्न फार दिवस इहलोकीं ठेवणें त्या जगन्नियंत्या सर्वन्यायी परमेश्वरास प्रशस्त कां दिसलें नाहीं कोण जाणे. !!!

पुण्यास या वेळीं लफनन् साहेब सेशनजज्ज होते. यांच्या बंगल्यांत इनव्हेरॅरिटी कमिशनर साहेब रहात असत, व लफनन् साहेबांचें व नानांचें बरें नसे, हें सोलापुरच्या हकीगतीवरून वाचकांच्या लक्षांत असेलच. इनव्हेरॅरिटी साहेब हे हुशार, विचारी, पापभीरू, न्यायप्रिय, विद्वान्, तरतरीत व करडे अंमलदार होते. हे त्यांचे गुण सरकार जाणून होतें, व ह्मणूनच या घोंटाळ्याच्या प्रकरणाची चौकशी करण्याचें काम यांजकडे सोंपविलें होतें असें दिसतें. या गृहस्थांनीं बारकाईनें लेखी दफ्तरीं पुरावा सांपडला तो पहाण्यास आळस केला नाहीं. जे कागदपत्र कधीं पाहिले जातील असें कोणाच्याही मनांत येणार नाहीं ते कागद पाहून आपली बरोबर समजूत पाडून घेण्यास ते फार झटत असत. कचेरींतील

भलताच मनुष्य टेंकून त्याजपाशीं गुप्तपणें तपास काढण्यामध्यें त्यांचा मोठा हक्क असे. यामुळें हे कोणतें दफ्तर तपासतील व कोणता कागद मागतील व कोणत्या मनुष्यास केव्हां काय प्रश्न करतील याचा कचेरींतील कलेक्टरापासून तों अगदीं हलक्या शिपायापर्यंत कोणासच अंदाज करतां येत नसे. त्यांच्या चौकशी करण्याच्या पद्धतीपुढें सर्वांच्या अकला गुंग होऊन गेल्या. चौकशी संपल्यावर रिपोर्ट प्रसिद्ध होईपर्यंत कलेक्टरपक्षांकडील लोक सुखोपभोग घेत होते. पुढील परिणामावर लक्ष पोंचून त्याचें मनुष्य एकदां चिंतन करूं लागला, ह्मणजे त्या परिणामाचें सुख किंवा दुःख अगोदरच प्रत्यक्ष भोगूं लागतो. प्रत्यक्ष दिपवाळीपेक्षां तिच्या अगोदरचे दिवस अधिक सुखावह असतात हा सर्वांस अनुभव असेलच. ह्मणून कोणतीही गोष्ट घडून येण्याच्या पूर्वीचे दिवस सुखाचे किंवा दुःखाचे फारच असतात. कांहीं दिवसांनीं कमिशनरांचा लेख सरकाराकडे गेला व त्याजवर सरकारचा शेरा आला. कलेक्टरांस सहा महिने लोंबत रहावें लागलें. फौजदार, त्यांचे शिरस्तेदार, पोलीस सुपरिंटेंडंट यांस कामावरून बरतर्फ केलें. लोकांची काय घमेंडी होती आणि त्याचा परिणाम काय झाला तो पहा. कारण, "चिंती परा नि येई घरा." त्यांतलेंच हें झालें.

पुण्यांत हसबनीस नामक नामांकित कोंकणस्थ ब्राह्मण आहेत. त्यांच्या कुटुंबांत ईश्वरेच्छेनें कोणी पुरुष संसारशकट ओढण्यास नाहींसा झाला. हें घराणें फार दिवसां-

पासून श्रीमान् इनामदार आहे. त्यांच्यामध्यें कांहीं भाऊबंदकीचा तंटा उपस्थित झाला. कोर्टांत त्याची व्यवस्था पहाण्याचें काम बापू दीक्षित व आणखी सहा असामी यांच्याकडे होतें. हातीं मिळाल्यास परधनदाराभिलाष करण्याची इच्छा कोणास होणार नाहीं, असे लोक फारच थोडे. त्या घरांतील स्त्रियांस भुलथाप देऊन निघेल तेवढा पैसा काढावा अशी दीक्षित मंडळीस पापबुद्धि उत्पन्न झाली. वेळोवेळीं त्या बायकांपासून पैसा घेण्याची बहुतकरून नेहमींचीच वहिवाट असे. कज्या सदर अदालतीपर्यंत आला. इंग्रजी कोर्टांतून कज्याचा निकाल एकाच पिढींत होईल असा नेम नाहीं. ज्या मालमत्तेविषयीं भांडण चाललें असतें तिच्या किंमतीहूनही किंबहुना अधिक खर्च लागून कज्या आटपत नाहीं अशीं उदाहरणें बोलण्यांत तरी आहेतच, ह्मणून मागतील तसा पैसा त्या बाया देत गेल्या. एक हिंदुलोकांच्या बायका अशिक्षित, पण सुशिक्षित ज्या लोकांच्या बायका आहेत, त्यांच्यामध्येंही पुरुषांपेक्षां स्त्रियांपासून पैसा काढणें फार सोपें, मग तो चांगल्या किंवा वाईट कामाकरितां असो. धर्मप्रकरणीं कामाकरितां अथवा कोणत्याही सत्कृत्याकरितां पैसा जमा करावयाचा असल्यास ख्रिस्तीराष्ट्रांतून मिशनरी लोकांस स्त्रियांचें मन वळविण्यास सोपें पडतें हें सर्वांस ठाऊकच आहे. बापू दीक्षितादिकरून मंडळीनें या बायांपासून पैसे पाहिजेत तसे काढून घेतले; पण त्याचा पुढें व्यवस्थितपणें खर्च दाखविणें त्यांजकडून घडेना. ते एक मोठी थोरली रक्कम कोडताचे जज्ज लिजेट

व ग्रँट साहेब यांस लांच दिला, ह्मणून सांगू लागले. बाईलाही कोणी चढीं देणार भेटले; आणि त्यानीं त्यांच्याकडून दीक्षित वगैरे मंडळीवर फिर्याद ठोकविली. लिजेट व ग्रँट साहेबांवर दोषारोप केलेला पाहून सरकारांतही त्या खटल्याची वाच्यता झाली.

सरकारानें ती गोष्ट मनावर धरून दीक्षितप्रभृतिमंडळ पांचांपेक्षां जास्त होतें त्यावर संगनमतानें बाईस फसविल्याबद्दल आरोप ठेवून खटला सरकारतर्फे चालविण्याचा ठराव केला. अंडरसन् साहेब त्यावेळीं सरकारचे मुख्य चिटणीस होते. नानांची हुशारी, कोणतेंही काम लक्ष्यपूर्वक मनापासून झटून करण्याचा सांप्रदाय हे गुण त्यांस माहीत होते. त्यांनीं नानांची नेमणूक हा खटला तयार करण्याच्या कामावर केली. विद्याखात्याचे या इलाख्यांत नांवाजलेले माजी डायरेक्टर हावर्ड साहेब यांस त्या खटल्यामध्यें बॅरिष्टर नेमिलें होतें. हावर्ड साहेबांनीं डायरेक्टरचें काम सोडल्यानंतर बॅरिस्टरीच्या कामांत फार दिवस जाऊन चांगल्या उदयास येण्यासारखे ते राहिले नाहींत. बाकी, यूरोपखंडांतील विद्वज्जनसमूहांमधील एक रत्न या इलाख्याच्या वांटणीस आलें होतें. या खटल्यामध्यें नानांस सर्व पुरावा जमा करून सर्व कच्ची हकीगत हावर्ड साहेबांस समजावून द्यावी लागत असे. यामुळें दोघांचें संघटण फार झालें होतें. हा पुरावा जमा करण्याचें काम फार बिकट होतें. बापू दीक्षित विलक्षण खटपटी गृहस्थ असत. पुण्यामध्यें त्या वेळेच्या जुन्या लोकांत अकलेमध्यें यांचा हात धरणारा मनुष्य विरळा.

आपला कावा साधण्याकरितां कोणतेंही अनुचित काम करण्यास हे चुकणारे नव्हते. तशांत पैशाची मदत पाहिजे तशी, मग काय विचारावें? "द्रव्येण सर्वे वशाः" एकासारखे एक दीक्षितमंडळींत सात असामी होते. हीं सात डोकीं एका बाजूस व नाना एका बाजूस. सात डोक्यांच्या अकलेपुढें टक्कर देण्यास पुरें पडलें पाहिजे. असा भगीरथ प्रयत्न नानांस करणें जरूर पडलें. जर कां या कामांत यश आलें नाहीं तर सरकारची मर्जी खप्पा होणार. अशा अडचणीच्या कामांत नानांनीं माघार घेतली नाहीं, यास अनेक कारणें होतीं. एक तर "तीर्थं नि स्वार्थं." आपल्या परिश्रमास यश आल्यास त्या गरीब अनाथ अबलेस प्रबळ लुच्चांची खोड मोडण्यामध्यें शक्त्यनुसार मदत केलेली अनाठायीं जाणार नाहीं. नानांचा अंगस्वभाव झटून काम करणें हा आणि त्यांत कठीण कामामध्यें ह्मणजे नानांला अधिकच हौस येत असे. "वहात्या गंगेंत हात" धुणार नाहीं तो अमानुष कृतीचाच गृहस्थ समजावयाचा. गणेश वासुदेव जोशी व त्यांचे बंधु चिंतामण वासुदेव जोशी हे त्या बाईचे कोणी आप्त होते. त्यांची गांठ घेऊन त्यांच्याकडून कांहीं मदत होईल किंवा नाहीं याचा अंदाज नानांनीं काढला. गणेश वासुदेव जोशी यांची स्वदेशप्रीति, धूर्तता, हुशारी पुण्यांतील लोकांच्याचशी काय, पण हिंदुस्थानांतील इंग्रजी शिकलेल्या लोकांच्या तरी मनावर ठसाच उठवून गेली आहे, यांत कांहीं संदेह नाहीं. पुण्यांतील प्रस्तुत सार्वजनिक सभेचे हेच जनक होत, व ती सभा इतक्या उद-

यास आणण्याचा मोठा भाग जोशी यांनीं केलेल्या अश्रांत श्रमामुळें त्यांच्याकडेसच जातो. या जोशीद्वयाच्या साहाय्यानें पाहिजे तितका पुरावा नानांनीं आपल्या हाताखालीं घातला. आणि वेळोवेळीं बॅरिस्टर हावर्ड साहेब यांस कळवीत गेले. या खटल्याची चौकशी करण्याकरितां न्यायाधीश वुईलियम फ्रेअर मुद्दाम नेमले होते. सर बारटल् फ्रेअर त्यावेळचे मुंबईचे गव्हरनर यांचे हे न्यायाधीश बंधु. खटल्याची चौकशी पुण्यांत चालली होती. यांच्यापुढें खटला चालत असतां हावर्ड साहेबांस ताप येऊन त्यांच्यानें कोर्टांत येववत नाहीं असें झालें. ताप आल्यामुळें कोर्टांत येण्यास आपली असमर्थता दर्शवून हावर्ड साहेबांनीं खटला तहकूब ठेवण्याकरितां न्यायाधीशांस विनंतिपत्र पाठविलें, पण न्यायाधीशांनीं ती विनंति अमान्य केली; त्यावेळीं प्रतिपक्ष्यांकडील साक्षींची उलटतपासणी करणें न करणें साहेबमजकूर नानांच्या अक्कलहुशारीवर व त्यांच्या मागच्या पुढच्या धोरणांवर खात्रीनें सोंपवून घरीं राहिले. या कामांत सर्व आरोपींना शिक्षा झाली. अंडरसन् साहेबांनीं सरकारतर्फे एक नानांस पत्र लिहिलें. नानांनीं या खटल्यामध्यें अपराध्यांस शासन होण्यासाठीं पराकाष्ठेची मेहनत केली. या त्यांच्या चातुर्याच्या बाहुल्याचा गौरव सरकार विशेषेंकरून करीत आहे, असें कळविलें. या नानांच्या अकटोविकट श्रमांचे अंशतः उतराई होण्यासाठीं 'फूल नाहीं फुलाची पांकळी' समजून सरकारानें पांचशें रुपये नानांस देण्यास कलेक्टरांस हुकूम दिला. नानांचा अश्रांत उद्योग, उत्साह

इतकेंच नव्हे, पण यांचा सारासार विचार आणि बुद्धि-कौशल्य यांमुळेंच बहुतांशीं या खटल्यांत जय आला असें प्रांजलबुद्धीनें हावर्ड साहेबांनीं कबूल करून सरकारास लेखी कळविलें आहे.

सन १८९७–९८ सालची हकीगत अद्याप लोकांच्या मनावर जागृत असेल. यावेळीं नाना पुण्यास डेप्यूटी माजिस्ट्रेटाचें काम करीत असत. मुख्य माजिस्ट्रेट डंकन डेव्हिडसन् साहेब होते. राजापासून रंकापर्यंत सर्व साधारण लोकांचीं मनें अगदीं अस्वस्थ झालेलीं असत. रोज कांहींना कांहींतरी बंडाप्रकरणीं नवी बातमी लोकांच्या तोंडीं असावयाची, थोरांच्या तोंडीं तेंच पोरांच्या. रात्र पडत चालली कीं दोन चार घरच्या मुलांनीं ठिकठिकाणीं मिळून वेड्यावांकड्या खऱ्याखोट्या गप्पा ताशीत बसावें. बुधवारच्या वाड्यासमोर रस्त्यावर भिक्षुक मंडळी जमली ह्मणजे पहिली गोष्ट बंडाची. कां कृष्णं भटजी, काल रा० रा० अ० वाड्यांत भाकऱ्यांची गोष्ट बोलत होते ती काय? भाकऱ्यांचा पेंड या गांवाहून त्या गांवीं चालला आहे. प्रत्येक गांवीं पांच भाकऱ्या आंत भरीस घालितात. त्या भाकऱ्या कोणाकडून आल्या, व जायाच्या कोठें याची कांहींच दाद नाहीं. कोणी ह्मणतात कीं, भाकऱ्यांच्या पोटांत पत्रें घालून एकमेकांस बंडवाले बातम्या कळवितात. अहो सदाशिवभटजी, अलीकडे सर्व पोष्टांतील पत्रें फाडून पहातात. जर कांहीं विपरीत आढळलें तर मग सांपडतील त्यांचे बारा वाजलेच ह्मणून समजा. त्यांचीं पाळेंमुळें खणून टाकतील.

पहिला—अलीकडे जिल्होजिल्हीं तोफेच्या तोंडीं देण्याचा तडाका चालला आहे ह्मणून ऐकितों.

दु०—आपल्या शहरांत कलेक्टरच्या हातीं नाना मोरोजी ह्मणजे 'पिशाच्याचे हातीं कोलती.'

काशिनाथपंत! असें कां ह्मणतां? त्या बापड्यानें तुमचें काय वाईट केलें?

तसें नव्हे हो दादा, पण पहा पोष्टांतून येतात तीं कोणत्याही भाषेंतलीं पत्रें असोत, हा आपला वाचून कलेक्टरास समजावतो. अहो! हा मारवाडी, हिंदुस्थानी शिकला तरी केव्हां? मारवाडीपत्र वाचणें ह्मणजे लहान काम नव्हे. तें पत्र ह्मणजे पांच चार भाषांचें कडबोळें असतें. तशांत मोडी ह्मणजे मुंबईच्या परभांस विषतुल्य.

पुण्यांतील रंगाऱ्याचा त्रास यांनीं मोडला ह्मणून वाटतें त्यांना नांवें ठेवितां. अहो रावसाहेब, पुण्यांतील रुपयाचे सोळा साक्षी कोणी मोडले?

खरें हो तें सारें, पण मी बंडाच्या संबंधानें ह्मणतों.

काय ह्मणतां! त्या भाकऱ्यांच्या चौकशींत जर कलेक्टरास भलतेंच समजावलें असतें, तर गरीब बिचारे तोफेच्याच तोंडीं गेले असते. इतर ठिकाणीं देहांत शिक्षेचीं उदाहरणें आपल्या वाचण्यांत आजपर्यंत किती आलीं आहेत. पुण्यांतील एकादें सांगूं शकाल? लष्करी कायदा अंमलांत आणण्याचा अधिकार कलेक्टरास मिळाला आहे, आणि महाकाळीसारख्या प्रचंड तोफा प्रत्येक तिठ्यावर सज्ज होऊन बसल्याच आहेत. त्यांचे मंत्री सज्जन किंवा दुर्जन असतील त्याप्रमाणें युरोपिअन

लोक वागणार. आपण त्यांस "पिशाच्याचे हातीं कोलती" ह्मटलें त्याचें मला नवल वाटलें. ते युरोपिअन लोकांस मदत करतात, एवढाच काय तो कटाक्ष दिसतो; पण तो अगदीं पोकळ आक्षेप दिसतो. नाना त्यांच्याच नौकरीस आहेत; तर आणखी कोणत्या रीतीनें वागतील. आपण इतपत तरी वागलों असतों किंवा कसें याचा वानवाच आहे. अशी निःपक्षपातबुद्धि राहणें कर्म कठीण आहे. "आपलें तेवढें बापडें नि दुसऱ्याचें तें कारटें." अशीच बहुतेकांची अवस्था आहे. हें आपण पदोपदीं पहातों.

असो, पण इतका तुह्मांला कैवार घेण्याचें काय कारण?

आह्मांला त्याचा राग नाहीं व लोभ नाहीं. आह्मांला त्यांच्याशीं फारच सोईरगत करायची आहे. मी ब्राह्मण आणि तो परभू. चला आतांशा लायब्ररीमध्यें येऊन कांहीं वाचन होत नाहीं. बंडाचा विषय निघाला ह्मणजे येथेंच बंड होण्याची वेळ येते. कितीएक लोकांची सत्याभिरुचीही नष्ट होते. आपल्यांतूनच कोणी एखादा कलेक्टराजवळ रस पाघळील आणि रावसाहेब, रावबहादुर होण्याची संधी साधूं पाहील. उद्यांपासून हा विषय निघाला कीं, "मूग खाल्ले पाहिजेत." नाहीं तर "पराचा कावळा" होण्याचा संभव आहे.

अमदाबाद, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, मुंबई वगैरे ठिकाणीं "लांडगा करडूं" न्यायानें पुष्कळ बिचारे तोफेच्या तोंडीं जाऊन साधारण लोकांमध्यें दहशत घालण्यास उपयोगीं पडले.

हिंदुस्थानांतील सर्व युरोपिअन लोकांचीं मनें अगदीं

उद्विग्न झालीं होतीं. रात्रीं त्यांस स्वस्थ झोंप नाहींशी झाली. "असे ध्यानीं तें दिसे स्वप्नीं." पुष्टशरीरी वैरागी पाहिला कीं त्यांस नानासाहेबच असेल अशी शंका येई. त्यांत आणखी कोणी आपमतलबी फौजदार किंवा ओकक्कत शिरस्तेदार सांपडल्यास त्यास साहेबांचें मन कमावलेलें शेतच सांपडे. मग कुबुद्धीस, दुष्टवासनेस व अनेक विकल्पांस अंकुर येण्यास उशीर नको. अतिनिकट आप्तवियोगामुळें आपण स्मशानांत गेलों असतां, पारमार्थिक पुस्तकें अधिक चांगलीं समजतात. इहलोकसंबंधी क्षणभंगुरता आपल्या मनावर अधिक चांगली वठते. इतर जिल्ह्यांतून महाकाळीस नराहुतीची समृद्धि झाली, त्याचें कारण आधींच युरोपिअन लोकांचीं मनें अगदीं भयाभीत झालीं होतीं. ठिकठिकाणीं युरोपिअन लोकांची वस्ती होती, तेथें निदान रात्रीचे तरी बायकामुलें घेऊन सर्वजण एका मजबूतशा बंगल्यांत एतद्देशीय नोकर करवतील तितके दूर करून निजावयास जात; परंतु हे सर्व भीतिजन्य प्रकार कर्तुमकर्तुम् कामदार कलेक्टरसाहेबांच्या वर्तनावर व सांगण्यावर अवलंबून असत. सर्वप्रकारच्या बंदोबस्ताचें काम ह्मटलें ह्मणजे माजिस्ट्रेटाचे हातीं. पोलीस व इतर गांवचे हुनेरी लोक सांगतील तेंच कलेक्टरांस श्रुतिवाक्य होई. अस्थिरबुद्धि, हलक्या कानाचा, कोत्या मनाचा, आणि रज्जुदर्शनानेंच सर्प ह्मणून ठणकर उडी मारणारा माजिस्ट्रेट कलेक्टर असल्यामुळें निम्मेपेक्षां अधिक भयप्रद स्थितीस कारण झालें होतें, असें पुण्याच्या स्थितीवरून वाचकांचे

सहज लक्षांत येईल. पुण्यामध्यें त्या वेळीं कलेक्टर व माजिस्ट्रेट डेव्हिडसन् होते, हें वाचकांस सांगून चुकलों आहों. हे गृहस्थ शांत, विचारी, नेटिव्ह लोक ह्मणजे सर्व बेभरंशाचे, असें मानणारांपैकीं नव्हते. या मनुष्यास मनुष्याची पारख चांगली करितां येत होती. पुण्यामध्यें ह्मणजे कुत्सितबुद्धि लोक कमी होते आणि चित्त व्यग्र करून धास्ती उत्पन्न करणाऱ्या गोष्टी कांनीं थोड्या येत असत असें नाहीं, परंतु अशा गोष्टींचा विचार एकटा कलेक्टर करीत नसे. आपल्या हाताखालचे सूज्ञ कामदार जवळ घेऊन खलबत चालत असे. त्यांमध्यें मुख्य नाना असत. नानांनीं या गोष्टींत कांहीं हांशील नाहीं असें ह्मटलें कीं, डेव्हिडसन् साहेब निर्धास्त रहात. डेव्हिडसनानें आपल्या सर्व युरोपिअन मंडळीस धीर देत असावें, रात्रीं एकत्र जमण्याचें कारण नाहीं, वगैरे गोष्टींविषयीं त्यांची वारंवार समजूत घालीत असावें, पोलीसच्या लोकांनीं वेड्यावांकड्या फुगवून गोष्टी सांगितल्या कीं, त्यांतील तथ्यांश काढण्याकरितां त्या कामावर नानांची योजना व्हावयाचीच.

एके दिवशीं, कलेक्टराच्या कानीं लायब्ररींत लोक बंडाच्या बातम्या बोलत असतात, कांहीं नवीन तयार करीत असतात, तेथें नानाविध लोक जमतात, ते गांवांत पाहिजे तशा गप्पा सांगतात, आणि हें पुणें ह्मणजे पूर्वीच्या मराठ्यांची राजधानी, इकडे अद्याप सभोंवार कडवे लोक आहेत. हा सर्व दारूखाना आहे; याजमध्यें अशा दीक्षित लोकांनीं कंड्या उठवून ठिणग्या

पाडल्या ह्मणजे महाप्रळय होण्यास निमिषमात्रही वेळ नको. या इंग्रज लोकांच्या पैशानें या लोकांना विद्यादान दिल्याबद्दल हे हिंदू लोक कसे उतराई होतात पहा! “खाल्लयाघरचे वांसे मोडणारे” लोक हे. अशी कथा एका वेड्या कोंकराप्रमाणें ख्रिस्ती कळपांत जाऊन मिळालेल्या वेड्या पिरानें कलेक्टराजवळ सांगितली. हें डेव्हिडसन् साहेबांनीं निमूटपणें सर्व गीत ऐकून घेतलें. पण मध्यंतरीं इंग्रज सरकारच्या पैशानें असे शब्द एतद्देशीय ख्रिस्तभक्तानें तोंडाबाहेर काढले, तेव्हां इंग्रज सरकारनें कोठून आपल्या वडिलांकडून पैसा आणला होता? अशीं अक्षरें डेव्हिडसन्च्या तोंडांतून आलेलीं ऐकून त्यांस हें भाषण रुचत नाहींसें वाटून त्या बाट्यानें आपलें वाक्पांडित्य आटपतें धरिलें. नेहमींप्रमाणें ही गोष्ट नानांच्या कानीं घालून त्यांस चौकशी करावयास सांगितलें. तेथें कोण कोण नेहमीं येणारे लोक आहेत व ते कोणकोणत्या प्रकारचे लोक आहेत ह्याची नानांनीं बारकाईनें चौकशी करून आपण खातरी करून घेतली, आणि आपल्या अभिप्रायाचें दृढीकरण होतें किंवा त्यामध्यें विपर्यास येतो हें पहाण्याकरितां आपले खातरीचे स्नेही शांत स्वभावाचे गृहस्थ असत, त्यांस कधीं कधीं लायब्रीमध्यें पाठवून तेथील लोकांशीं अगदीं मिसळून कोणत्याप्रकारचे लोक जमतात व त्यांमध्यें कांहीं दारूखान्यास हळूच बत्ती लावणारे लोक आहेत किंवा कसें हें पाहण्यास सांगितलें. आपल्या स्नेह्यांच्या करतबगारीविषयीं, हुशारीविषयीं आणि खातरीलायक काम करण्याच्या

संप्रदायाविषयीं नानांचा अभिप्राय फार चांगला होता. सदरील स्नेह्यांनींही या कामांत फार मन घालून बारकाईनें चौकशी केली. कारण, "फट् ह्मणतां ब्रह्महत्या." आपला अभिप्राय विपरीत पडल्यास कदाचित् गरीब निरपराधी लोकांचा छळ होण्याचा विशेष संभव त्यावेळीं तरी फार होता. हे स्नेही भास्करराव चौबळ होत. असो, धास्ती वाटण्यासारखें कांहींच घडून आलें नाहीं. नानांचा अभिप्राय या गृहस्थांच्या मताशीं जमला व डेव्हिडसन साहेबांस निर्धास्त रहा, त्यांत कांहीं अर्थ नाहीं, लायब्ररीमध्यें टवाळ लोक येतात ते सारे लोणकढ्या गप्पा मारणारे असतात. त्यांत विचार करण्यासारखा जीव नाहीं. या जोरावर कलेक्टर साहेबानीं सर्व युरोपिअन लोकांस पुण्यामध्यें शांत ठेविलें होतें. सर्व जिल्ह्यांमध्यें जिकडे तिकडे त्यांस स्थीरता राखण्यास आली, त्यास मुख्य कारण नाना होते, असें अनेक वेळां कलेक्टरांनीं प्रांजलबुद्धीनें कबूल केलें आहे. लेखी व तोंडीं सरकारापाशीं आणि इतर लोकांमध्यें हा उल्लेख करण्यास या सरळमार्गी उघड्या मनाच्या गृहस्थास कोणत्याही प्रकारचा संदेह आला नाहीं. डेव्हिडसन कलेक्टरानें बंडाच्या सालाविषयीं नानांस एक पत्र कांहीं दिवसांनीं विलायतेहून लिहिलें; त्याचा आह्मीं वाचकांस उतारा देतों. त्यावरून या गृहस्थाचें सौजन्य लक्षांत येईल.

"१८५५ पासून १८६२ पर्यंत मी पुण्यास कलेक्टर असतां तुह्मी माझ्या हाताखालीं हुजूर डेप्युटी होतां. ज्या गृहस्थांस पुण्याची लोकवस्ती कशी आहे हें माहीत आहे, व या शहराजवळ सर्व हिंदुस्थानांत नांवाजलेल्या

लश्करी ठिकाणांपैकीं एक ठिकाण आहे, हें ज्यांच्या ध्यानांत आहे, त्यांना तुमच्या हुद्याचें जोखीम, अडचणी व जबाबदारी किती होती याचें खरें स्वरूप मनांत आणितां येईल. तशांत वर्षामध्यें बहुतेक वेळ कलेक्टर साहेब जिल्ह्यामध्यें आठ महिने फिरत असत, तेव्हां शहरच्या बंदोबस्ताचें सर्व काम शिलकी तुह्मी मुख्य माजिस्ट्रेट यांसच पहावें लागे. सर्व गोष्टी तुमच्या तुह्मांसच पहाव्या लागत असत. पूर्वोक्त अडचणी आणि आपली जबाबदारी ९७–९८ सालीं बंडामध्यें कशी शतगुणित वाढून आपली पांचावर धारण बसली; त्याचप्रमाणें अशा प्रसंगीं शांतपणानें, चातुर्यानें, धूर्ततेनें तुह्मीं तत्संबंधी माहिती कशी मिळविली, त्यांतून खडे एक बाजूस व दाणे एक बाजूस करण्याच्या कामांत तुह्मांस यश आलें, याची साक्ष देण्यास मी कमर बांधून तयार आहें. संशयावरून मध्यंतरीं पकडलेलीं पत्रें वाचण्याची माथाफोड करून, भाषांतर करण्यामध्यें तुमचा उपयोग अपरंपार झाला. तसल्या वेळच्या आणीबाणीच्या प्रसंगांतून शांतता राखून पुणें जिल्हा पार पडला. बहुतांशीं याचें कारण असें कीं, तुह्मीं व तुमच्या हाताखालीं ज्यांची तुह्मीं योजना केली होती त्यांनीं इलाज योजिले, तेणेंकरून कुविचारी ग्रामपुंडांचीं कारस्थानें तात्काळ उजेडास आल्यावांचून रहाणार नाहींत असें ते पक्कें जाणून होते. आपल्या इकडे फांशीं चढविण्याचे व तोफेच्या तोंडीं देण्याचे प्रसंग मुळींच आले नाहींत, ह्याचेंही पुण्य तुमच्याच नांवीं लिहिलें पाहिजे. मजविषयीं ह्मणाल तर, तुह्मी माझ्या हाताखालीं नायब (डेप्युटी) माजिस्ट्रे-

टाचे हुद्यावर होतां, ही एक गोष्ट त्यावेळीं माझ्या परम सुखास कारणीभूत होत असे. किंबहुना त्यावेळीं माझ्या एक डोळ्याऐवजीं तुह्मी होतां असें कल्पण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. याबद्दल सरकारानें तुह्मांस देतां येईल तेवढें मोठें पेनशन् दिलें असें ऐकून मला फार संतोष होईल.

आपला

**डंकन डेव्हिडसन"**

आमच्या मतें नानांचे पुण्यावर बंडाच्या सालचे महदुपकार आहेत. नानांच्या ह्मणण्याप्रमाणें तेथेंही त्यांनीं आपलें कर्तव्य मात्र बजावलें. त्या कामाबद्दल सरकार त्यांस पगार देत होतें. पण इतर ठिकाणच्या अधिकाऱ्यांसही सरकार पगार देत होतें, तरी कामाच्या कर्तबगारीमध्यें जमीनअस्मानाचा फरक दिसून आला. इतर जिल्ह्यांस जर असा एकएक नाना व डेव्हिडसन मिळता तर काय हिंदुस्थानचें सुदैव!! या नानांच्या उपकारांबद्दल पुणेकर कोणत्या तरी प्रकारें उतराई झाले काय? जनांत नाहीं पण मनांत तरी पुणेकरांनीं नानांचा पुतळा करून ठेविला आहे काय? हर हर!!! अनुपकार नानांच्या हातून होते तर कोणी विसरता ना.

दक्षणेच्या ब्राह्मणांवर कोणी लबाडीचा आरोप आणून बरेंच मोठें काहूर रचलेलें होतें. बिचारीं भटें हवालदील होऊन गेलीं होतीं. नानांपुढें ह्मणजे काळापुढें जावयाचें असें त्या अनाथांस वाटत होतें. पण नाना खऱ्याचा दास व खोट्याचा काळ. तें सर्व ब्रह्मवृंद उजळ तोंडानें, उघड माथ्यानें व हंसत परत गेलें.

न्यायाधीश या नात्यानें पाहिलें तर नानांचें लक्ष विशेषें-करून पक्षकारास न्याय मिळण्याकडे असे. दोन पक्षकारांपैकीं गरीबाईमुळें ज्यास वकिलाची मदत घेववत नाहीं, त्याचा खरेपणा गरीबाईमुळें डुबत असल्यास, नानांनीं त्याच्या पक्षास मदत करावी असा त्यांचा संप्रदाय असे. यांच्या-पाशीं कोणी सल्ला विचारावयास आला तर त्यास पोक्त विचारच असेल तो यांच्याकडून मिळावयाचा. विचारणा-राची सर्व अडचण समजून घेऊन तिचा मनःपूर्वक विचार करून मंथनार्क त्यास द्यावयास या गृहस्थांनीं कधींही आ-ळस करूं नये, असा यांचा अंगस्वभावच होऊन गेला होता.

एक ब्राह्मण भिक्षुक असे. तथापि वार्धक्यामुळें याची भिक्षुकी फार चांगली चालत नसे. त्याचें एक वडिलोपार्जित घर होतें. त्यामध्यें एका खोलींत आ-पण निर्वाह करून बाकी घर त्यानें भाड्यानें दिलें होतें. आपली बहुतेक उपजीविका त्या भाड्यावर तो करीत असे. सकाळपासून माध्यान्हकाळपर्यंत स्नानसंध्यादि ब्रह्मकर्म करून पुराणादि कथाकीर्तनें श्रवणांत अन्य वेळ क्रमण करावा. या त्याच्या सोज्वळ नित्यक्रमांत व्यत्यय येऊन भट्टजीचा जीव मोठ्या फिकिरींत पडला होता. त्याच्या घरामध्यें भाडोत्री मिळाले ते कांहीं नाटकीमं-डळी होती. त्यांच्याकडून वेळच्या वेळीं भाडें येत नसे व घरामध्यें वेळीं अवेळीं धिबिडगा घालीत असल्यामुळें या वेदमूर्तींच्या आह्निकासही व्यत्यय येऊं लागला. त्यानें कांहीं दिवस त्यांस सामोपचाराच्या गोष्टी सांगून पाहिल्या, पण निष्फळ. भाड्याचें देऊं दिलाऊं फार होऊं लागलें

व त्याचा उपाय हरला. घर खालीं करून जा ह्मणून सांगितलें, पण ते जातना. "आधीं पोटोबा नि मग विठोबा" भाडें थकल्यावर उपासमारीची वेळ आली. दिवाणी कोर्टांत फिर्याद करावी तर खर्चास पैसा नाहीं, व आजन्मांत फिर्याद करावयाची ह्मणजे काय, हें स्वप्नींही नाहीं. करावें काय? या विवंचनेंत भट्टजी पडले. एके दिवशीं पुराण आटपल्यानंतर कांहीं वृद्ध सहचरांबरोबर बोलत असतां, एका गृहस्थानें या त्रस्त जाहलेल्या ब्राह्मणास नानांकडे जाण्यास सांगितलें. नाना मोरोजी ह्मणजे कृतांत काळ. असा कडक न्यायाधीश पुण्यामध्यें कधीं आला नव्हता. अशी कीर्ति गरीब ब्राह्मणानें ऐकिली होती. आपली गरीबाची भेट होणार कशी? दरवाजावर 'मतजाव' असेल. नाना जितके कडक न्यायाधीश तितकेच सज्जन आहेत, आपला परामर्श घेतील असें पुष्कळ लोकांनीं सांगितल्यावरून भट्टजींनीं जाऊन त्यांजपाशीं रड गाण्याचा निश्चय केला. भट्टजी दुसऱ्या दिवशीं रात्रीं सात वाजतां गेले. नानांनीं त्यांची सर्व हकीगत ऐकून, यांत कांहीं फौजदारी प्रकरण दिसत नाहीं, हें दिवाणी कोर्टाचें काम आहे, आपण मुनसबांकडे फिर्याद करावी. हें सरळ उत्तर नानांनीं दिलें, पण त्या भटजींची गरीबी, त्यांचें सौजन्य, एकमार्गीपणा, विद्वत्ता, व नाटकी लोकांचा जुलूम मनांत बिंबून नानांसही कांहीं सुचेनासें झालें.

जातेवेळीं दोन पावलें पोंचविलेंसें दाखवून ह्मणाले, आपल्यासारख्या पुण्यपुरुषाच्या पायांची धूळ आमच्याकडे कशानें पडणार! असा लाभ आह्मांस कधीं कधीं

होत असावा. नानांच्या लक्षांत त्या ब्राह्मणाचा बहुश्रुतपणा तेव्हांच आला. या ब्राह्मणाची पीडा दूर कशी करावी या विवंचनेंत कांहीं दिवस गेले. यांचे शिरस्तेदार भास्करराव चौबळ यांजपाशीं नानांनीं ही गोष्ट काढिली, आणि ह्मणाले, झाल्यास आपण नाटकी लोकांस घालविण्यास मदत करावी पण कांहीं युक्ती सुचत नाहीं. असें ऐकतांच भास्करराव ह्मणतात, मालकास आपल्या घराची पाहिजे तेव्हां जमीन करण्यास हक्क आहे, व ती जमीन करण्यास त्याला किती दिवस लागतील त्याचा नेम नाहीं. इतकें सुचवितांच नानांस फार आनंद वाटला व त्या क्षणींच त्या ब्राह्मणास बोलवायास पाठविलें. आल्यावर त्यास आपल्या घराची जमीन करण्यास सांगितलें. ह्मणजे ते नाटकी सहजच घराबाहेर जातील. ते पुन्हां येणार नाहींत. आल्यास तुह्मांस फौजदारींत फिर्याद करण्यास अधिकार झाला. मग आपण मामलेदारांकडे फिर्याद द्यावी. भट्टजींनीं तसें केलें आणि नाटक्यांच्या पीडेपासून मुक्त झाले. गरीबावस्थेंतून उदयास आलेल्या लोकांची गरीबांवर कृपादृष्टी असतेच असा नियम सर्वथैव बांधतां येत नाहीं. अशीं कांहीं ढळढळीत उदाहरणें आढळतात कीं, उद्दामपणा, असभ्यता, कार्पण्य व साधारणपणें मनाची द्राष्टता हे अवगुण त्यांच्यामध्यें अधिक व्यक्त असतात. दारिद्र्याचीं व्यंगें त्यांच्या मधून दूर न होतां श्रीमंतीचे अवगुणास ते नकळत आमंत्रण करीत असतात. असो, प्रस्तुत चरित्रविषयास सदरील वर्णन अंशतः सुद्धां लागू पडत नाहीं, हें वाचकांना सांगणें नलगे.

पुण्यामध्यें असतां नानांशीं एका भिक्षुक गृहस्थांचा फार स्नेह जमला. या वेदमूर्तींनीं नानांच्या घरीं नित्य जात असावें. फुरसुतीअंतीं नानांनीं यांजपाशीं अघळपघळ बोलण्याची वहिवाट ठेविली होती. नाना यांना अगदीं निरुपद्रवी, प्रामाणिक, बहुश्रुत व पूर्वींच्या चालीचे फार सोंवळे वृद्ध ब्राह्मण ह्मणून एकपक्षीं पूज्य मानीत असत. नाना यांना "बाबा" ह्मणत व ते नानांना नेहमीं जुन्या भिक्षुकांच्या चालीप्रमाणें एकेऱ्या शब्दानें उद्देशून बोलत.

कर्मधर्मसंयोग, एके दिवशीं या भिक्षुकांची साक्ष नानांच्या कोर्टापुढें होती. भट्टजींस त्याच दिवशीं क्षणाचें आमंत्रण होतें. रीतीप्रमाणें खटला उभा रहातांच शिपायानें भट्टजींचें नांव पुकारिलें. भट्टजी गैरहजर असल्यामुळें कोर्टाचें काम पुढें सुरू झालें. एक वाजतां सुमारें भट्टजी ढेंकरा देत व डावा हात पोटावरून फिरवीत आले. लोकांनीं त्यांस घाबरविलें. तथापि ते सोंवळें भांडें हातांत घेऊन कोर्टापुढें गेले व कोर्टास उद्देशून बोलतातः— अरे नाना! माझ्याच साक्षीनें इतकें काय तुझें काम बंद पडलें? अ-य्या, अ-य्या, अशा ढेंकरा देऊन ह्मणाले मी आज सांवत्सरिक श्राद्धास गेलों होतों. हहहह!! मला थोडा उशीर झाला. असें हंसून ह्मणाले.

कोर्टाचा हुकूम मोडला व बेअदबी केली ह्मणून तुह्मांला कोर्टानें पांच रुपये दंड केला आहे असें नानांनीं सांगितलें. तत्क्षणींच पोलीस शिपायानें भट्टजीच्या खांद्यावर हात ठेवला व दंड दिल्याशिवाय त्यांस तो जाऊं देईना. पहाऱ्यामध्यें भट्टजींस बसावें लागलें. मजला आज आठ आणे

दक्षणा आली आहे ती पाहिजे तर घे नि मला जाऊं दे. शिपाई कसला त्यांना सोडणार! त्या सोज्वळ ब्राह्मणास कोर्ट उठेपर्यंत एक प्रकारच्या कारागृहांत बसावें लागलें.

कोणी एक गृहस्थ आले व त्या भटजींच्या वतीनें दंड भरला, तेव्हां भटजी घरीं गेले. तो दंड कोणी भरला, याची भटजींस बरेच दिवस शंका होती, पण तो नानांनींच भरण्याकरितां पाठवून दिला, असें समजलें. पुढें नानांचें व भटजींचें बोलणें याविषयीं बरेंच झालें पण आह्मांस त्याचें फारसें महत्व वाटत नसल्यामुळें वाचकांस कंटाळवीत नाहीं.

---

## भाग ८.

### खानदेशची कारकीर्द.

पुण्याहून नानांची बदली खानदेशांत झाली. या ठिकाणीं कलेक्टर अशबरनर साहेब होते. ह्याच गृहस्थांनीं पुढें कांहींवेळ मुंबईचे गव्हर्नराचा अधिकार चालविला. हे गृहस्थ सरळमार्गी, आपल्या मनाची एक प्रकारची समजूत झाली असतां तीच धरून तदनुरूप वर्तन करण्यास मागें न कचरणारे होते, परंतु यांच्या घुशीपुढें दुर्दैवानें किंवा सुदैवानें जे येत, त्यांचा समूळ नाश किंवा कोटकल्याण होत असे, असा वर्तमानपत्रांचा अभिप्राय आहे. एक मासल्ेवाईक उदाहरण वाचल्याचें आमच्या लक्षांत आहे. तें असें कीं, यांनीं रेव्हिन्यु कमिशनर असतां एका नव्वद रुपयांच्या पोलीसकामदारास शिक्षा करावी असें एका क्षुल्लक अपराधावरून त्यांस वाटल्यामुळें त्यांनीं त्याच्या

पगारावरून पूज्य काढून बाकी पगाराचा त्यास शिपाई बनविला. वर्तमानपत्रांनीं या कृत्याबद्दल फार ओरड केली, पण घुशीपुढें कोणाचें चालेना. यांच्या हातून न्यायाचा अन्याय होत नसे, 'तरी पराचा कावळा खरा.'

नानांची अव्याहत सचोटीची वृत्ती पाहून, अशबरनर साहेबांची यांच्यावर मर्जी बसली. यांनीं केलेल्या कामांत त्यांस शंका येत नसे. इंदूर संस्थानांत अफू चांगली मिळत असून तेथें त्यावर सरकारचा फार कर नसल्यामुळें, इंग्रज सरकारच्या अमलांत येतांच त्याची किंमत विलक्षण वाढते. अर्थांत इंग्रज सरकार त्या मालावर काकदृष्टीनें पहात असतें. या मालाबद्दल स्वतंत्र कायदा आहे. तदनुरूप कोणाही मनुष्यास इंग्रज सरकारास कायदेशीर कर दिल्यावांचून तो नेतां आणतां येत नाहीं. असें असतां एक लष्करी खात्यांतील ॲडजूटंट जमादारानें इंदुराहून धुळयास अफूची पेटी नकळत फायदेशीर पडली ह्मणून आणली. हा जमादार जातीचा महार होता. त्या रेजिमेंटाच्या मुख्य वगैरे साहेबांची त्याच्यावर कमाल मर्जी असे. 'समर्थाचे घरचें श्वान, त्यास सर्वही देती मान' हा जमादार वजनदार युरोपिअन लोकांचा नाकचा बाल होऊन बसला होता. यास्तव त्यास असें वाटलें कीं, आपण कोणतेंही अनुचित काम केलें तरी महदाश्रयाच्या छताखालीं आपणास ताप होणार नाहीं. या चढवलेल्या जमादारापासून त्याच्या हाताखालच्या लोकांस फार त्रास होत असे. ते जरी तोंडावर "हां जी!" करीत, तरी पाठीमागें त्याला पाण्यांत पाहत असत. त्यांस ही अफूची हकीकत माहीत होती. त्यां-

पैकीं एकानें पोलिसास ही वर्दी दिली. पोलिसास ती आंतून बातमी लागतांच, त्यांनीं त्या जमादाराची उचलबांगडी केली. या खटल्याकडे सर्वांचे डोळे लागले. कारण, मुद्देमाल जमादारापाशीं सांपडला. तर अशा उत्तम पुराव्यावरून अपराध्यास शिक्षा होणार, पण हा तेथील बड्या युरोपिअन लोकांचा लाडका व माजिस्ट्रेट नेटिव्ह. कोर्टांत मोठमोठीं युरोपिअन लोकांचीं धेंडें आलीं ह्मणजे माजिस्ट्रेट दिपून जातील. अशबरनर साहेब गांवगन्ना स्वारीमध्यें गेले होते. खटला चालला असतां लष्करी खात्यांतील अपराध्याचे बडे युरोपिअन पुरस्कर्ते येऊन तटस्थ बसत असत. शेवटीं नानांनीं त्यांस न भितां यास शिक्षा ठोठाविली. अपील तर झालें, व अपराधी सुटला. मुद्देमाल सांपडला यापरता आणखी उत्तम पुरावा तो कोणता पाहिजे होता? या मालाची व अपराध्याची पोलिसानें सांगड घालून दिली, त्यापासून या जमादाराच्यानें मुक्त होववेना. शेवटीं वरिष्ठ कोडतामध्यें सदरहू जमादाराचे पालक साहेबाचें नातें व स्नेह होता, त्या जोरानें त्या अपराध्यास ती सांगड झुगारून देतां आली कीं काय कोण जाणें! अशबरनर साहेबांचीही आरोपिताच्या अपराधाविषयीं खातरी झाल्यावरून त्यांनीं सदर अदालतीस हा अन्याय आहे असें लिहून मागून फार खटपट केली, परंतु अपराधी सुटला तरी हरकत नाहीं, निरपराध्यास मात्र शिक्षा होतां कामा नये, अशी न्यायमूर्तींची दृष्टी असली पाहिजे. या तत्वानुरूप ह्मणा किंवा कसेंही असो, सदर अदालतीनें ही गोष्ट मनावर धरली नाहीं.

विद्वान्, सज्जन, सन्मार्गी गृहस्थ असले कीं, नाना त्यांचे स्नेही व्हावयाचेच. जनार्दन वासुदेवजी त्या वेळीं धुळ्यास प्रिन्सिपल सदरअमीन होते. या गृहस्थांच्या सौजन्याविषयीं सांगावें तेवढें थोडेंच होईल. येथें यांच्याविषयीं इतकेंच सांगणें पुरे कीं, ते हायकोडताचे जज्ज होऊन नंतर फार वर्षें पेनशन ( बैठा पगार ) भोगीत होते. "समान शीले व्यसनेषु सख्यं" यांचा व नानांचा स्नेह जमण्यास विद्वत्ता, सन्मार्गक्रमण, हींच मुख्य कारणें. दोघांचाही एकच व्यासंग. उभयतांस लोकांमध्यें आपणच पुढचे पुढें नाचून आपला शहाणपणा मिरविण्याचा तिटकारा असे. नेहमीं, वर्तमानपत्रांत कांहीं तरी लिहित असणें, किंवा लोकांपुढें बोलण्याची संधी केव्हां सांपडेल ह्मणून वाट पाहत बसणें, व लहानमोठ्या लोकसमूहापुढें कसे तरी चार शब्द बोलणें, अथवा होईल तितकी काटकसर करून वेळ काढणें, व तो वाचनाकडे खर्च करणें, असे विद्याव्यासंगाचे तीन प्रकार आहेत. तिहींचे तीन गुण. लेखनाचे संवयीनें मनुष्य सर्व कामांत बारकाईनें सूक्ष्म गोष्टी पहाणारा होतो. लोकसमूहापुढें वारंवार बोलण्याच्या सांप्रदायानें मनुष्यास समयसूचकता, धिटाई व विनोदीपणा येतो. तसेंच वाचनानें मनुष्याचें मन विचित्र ज्ञानानें ओतप्रोत भरून जातें. वाचनावर या उभयतांचा विशेष भर असल्यामुळें ते झाकलेलीं माणकें राहिले. उभयतांनींही लोकांमधील बखेडे मोडण्याचा पत्कर घेतला होता. नानाविध प्रकारचे लोक यांच्या पुढें येत असत. त्या प्रत्येकाच्या मनोविकारांचें, सुकृतीचें व दुष्कृतीचें

वजन करण्याकरितां यांना धारवाडी कांटाच हातीं धरण्याचा प्रसंग वारंवार येत असे. बुद्धीची कुशाग्रता आणि ज्ञानभांडाराचें स्थैर्य हे गुण उभयतांमध्यें लोकांच्या दृष्टीस पडत असत.

येथें गरुडघराणें हें फार नामांकित आहे. लक्ष्मणराव (तात्यासाहेब) गरुड, हे फार सज्जन, वजनदार व लोकप्रिय गृहस्थ नानांचे परम स्नेही होते. शामराव ऊर्फ बापूसाहेब, वामनराव ऊर्फ आण्णासाहेब गरुड इंदूरचे दिवाण, गोविंदराव ऊर्फ रावसाहेब, हे त्यांचे बंधू. या घराण्यांतील पुरुषांचा समागम नानांस झाला. तो पुढें उत्तरोत्तर पुढल्या पिढीमधील पुरुषांपर्यंत पोहोंचला, असें वाचकांच्या लक्षांत येईल.

---

## भाग ९.

## सुरतेची कारकीर्द.

नानांची बदली सुरतेस झाली; त्या वेळीं रॉबर्टन साहेब तेथें कलेक्टर, माजिस्ट्रेट होते. यांच्याविषयीं विशेष वर्णन करण्यासारखें कांहीं नाहीं. सद्गृहस्थांमध्यें यांची गणना करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. कारण, कोत्या समजाचीं किंवा अप्रशस्त कामें यांच्या हातून नानांच्या कारकीर्दींत तेथें झालीं नाहींत. तथापि यांना अजागळ अशीही संज्ञा देतां येत नाहीं. यांच्या अंगीं कर्तबगारी हा गुण अगदीं अव्यक्त नव्हता. या इलाख्यामध्यें कांहीं नामांकित गृहस्थ होऊन गेले त्यांत यांस मोडतां कामा नये. यांच्या मागून सुरतेस होपसाहेब नानांच्या वेळीं आले

राबर्टसन्‌मध्यें काहीं गुण होते अशी कल्पना केली तरी ते "मांज्यापुढें आयता" याप्रमाणें, होपसाहेबांपुढें लोकांस दिसूं लागले.

सुरतेस मीरसय्यद् अलमखान् ह्मणून मोठ्या घराण्यांतील मुसलमान गृहस्थ असत. यांच्या घराण्यास नबाब अशी आख्या होती. या गृहस्थांचे वेळीं त्यांची जहागीर वांध्यांत पडली होती. त्यांनीं सरकाराकडे पुष्कळ वेळां अर्ज केले पण त्यांच्या श्रमाचें व वित्तव्ययाचें कांहीं फळ आलें नाहीं. या नबाबांचे तीर्थरूप पुणें जिल्ह्यांतील बेल्याचे जहागीरदार. हे गृहस्थ बाणेबाज मुसलमान. हजार पांचशें विद्वान् गृहस्थांमध्यें पहिल्या प्रतीचे विद्वान्. पूर्ववयामध्यें सुद्धां यांचें वर्तन निर्लेप असल्यामुळें सहाजिकच वृद्धापकाळीं ते व्यसनरहित तारुण्याच्या फळाचा अनुभव घेत होते. शरीराचा बांधा उंच, सदृढ व अशा शरीरास मानसिक व शारीरिक सतत व्यायाम असल्यामुळें दोन्हीप्रकारें सुदृढता, चापल्य, निखालस वृत्ति आणि स्वधर्मावर श्रद्धा हे गुण त्यांच्यामध्यें प्रथमदर्शींच संभाषणामध्यें व्यक्त होत. नानांचा या गृहस्थांशीं साधारण कारणावरून ऋणानुबंध जमला. नाना पुण्यास होते तोंपर्यंत यांच्या वारंवार भेटी होत असत. उभयतां फारशी व आरबी भाषेमध्यें निपुण असत. ह्या दोन्ही भाषा ह्मणजे ज्ञानभांडारेंच आहेत. नानांनीं नबाबांचे भाषारत्नभांडाराचा दरवाजा खुला केलेला पाहिला ह्मणजे त्यामध्यें जिकडे तिकडे अमोलिक रत्नें दृष्टीस पडत. ह्मणून नानांस नबाबांच्या समागमाची आस्था

होती. नानांच्या भांडाराची व्यक्तिशः बरोबरी नबाबांच्या रत्नांशीं होत नसे. तरी नानांच्या खजिन्यांतील मोहरांची गणती नबाबांस करवत नसे. दिवसेंदिवस ही संख्या वाढती नबाबांच्या नजरेस येऊं लागल्यापासून ते अगदीं गांगरून जात असत. ह्या वडिलोपार्जित स्नेहाचा नबाबांच्या मुलास उपयोग झाला.

मिरसय्यद यांस सुरतेस तेथील नबाबघराण्यानें घरजांवई केलें होतें. सबब त्यांचें रहाणें नेहमीं सुरतेसच असे. सासुरवाडचें उत्पन्न बेल्याच्या उत्पन्नापेक्षां दसपट असे. बेलें येथील त्यांची जहागीर तहांहयात चालावयाची असें इनामकमिशनरनें ठरविल्याप्रमाणें तें इनाम वडिलांच्या मागें सरकारानें जप्त केलें. सरकारांतून आपली वडिलोपार्जित जहागीर परत मिळण्याची यांनीं बहुतेक आशा सोडलीच होतीं; परंतु नानांबरोबर एके दिवशीं वडिलांच्या व आपल्या गत झालेल्या इनामाच्या गोष्टी बोलत असतां, नानांनीं त्यांच्या जहागीरीचे कागदपत्र फावल्या वेळांत अवलोकन करण्याचें मनांत आणिलें. इहलोकीं मनुष्यमात्र प्रेम ठेवितात, अशा वस्तु हातच्या निखालस जात तों तद्विषयींचें प्रेम कमी होत नसतें, बहुशा तें त्या जातां जातां अधिक वाढतें, असा मनुष्यधर्म आहे. त्या वस्तूंचें उपभोग-राहित्य आपणांस न व्हावें ह्मणून असा हरप्रयत्न करीत असतात. एखादी जिवलग वस्तु गत झाली व आपल्या हातून त्याची निरवानिरव करून आलों; आतां पुन्हां ती वस्तु दृष्टिगोचर होणें ह्मणजे सशास शिंग दिसणें अथवा वाळवेच्या आंगीं ते-

लाच्या द्रवाचा भास होण्यासारखें आहे, असें आपणांस खास माहित आहे, तरी आपलें मन ती जिवलग वस्तु आपल्याजवळ पुनरागमन करणार आहे, असे तर्क करीत असतें. अशीं उदाहरणें संसारामध्यें पदोपदीं आढळतात. तर नबाबांनीं आपलें नष्ट जाहलेलें ऐश्वर्य आपल्यास पुन्हा मिळावें, या आशेनें सर्व कागदपत्र नानांस दाखविले, यांत आश्चर्य तें काय? त्रिदोष झाला तरी पांढरी घोंगडी आणण्यास न सांगतां वैद्य हेमगर्भाची मात्रा आणून, तिचे तीन वळसे देण्यास सांगतो. त्याप्रमाणें नानांनीं तो कागदाचा सर्व डोंगर वाचून पाहण्याचा दृढनिश्चय केला. व किंचित् आशेचें चिन्ह दृष्टीस पडलें, तर मात्रेचा एक वळसा देऊन पहावा असा विचार ठरविला.

वाघाच्या तोंडांतून शेळीचें पिलूं सोडविण्याचा आपण यत्न करूं पाहत आहों. यत्न करणार आपण, फळदाता परमेश्वर; असें नबाबांस सांगून एक दोन खात्रीचे गृहस्थ आपल्या हातीं ठेवण्यास नबाबांस सुचविलें. बाबा जुवेकर ह्मणून कोणी ब्राह्मण गृहस्थ यांच्या घरीं जात येत असत. इंग्रज सरकारच्या ताब्यांत हे महालकरी होते. त्यावेळीं यांस हुशार महालकऱ्यांमध्यें गणित असत. यांच्यावर कांहीं कचाट येऊन हे चाकरीवरून दूर झाले होते. प्रस्तुत यांस कांहींतरी कामाची अपेक्षाच होती. त्यांस नबाबांकडून कांहीं बक्षीस कबूल करवून ठेविलें, व चिंतो वासुदेव जोशी पुणेकर यांच्या धूर्तपणाविषयीं, खटपटीविषयीं आणि हुशारीविषयीं व मेहनतीविषयीं

नानांस बापू दीक्षितांच्या खटल्यांत चांगली माहिती झाली होती, हें वाचकांस सरतच असेल. त्यांसही नबाबांकडून आश्वासन देऊन आपल्या कामीं लावून घेतलें. हे कागद त्रिगुणात्मक असल्यामुळें वाचण्याचें कामही कांहीं नानांस करावें लागत असे. इंग्रजी व फारशी लिपींतील कागद स्वतः नानांनींच वाचावे. मोडीमधील कागद या उभय साथ्यांनीं वाचून नानांस गोषवारा सांगावा. महत्वाचा कागद वाटल्यास तोही नानांनींच वाचावा! नंतर त्या सर्व वाचलेल्या कागदांतून कोणता किती आपल्या कामीं पडेल, याजविषयीं वाटाघाट होऊन त्या दोघांनीं नानांपाशीं उहापोह करावा. याप्रमाणें हळूहळू हें काम बरेच दिवस चाललें होतें. या उभय साथ्यांपैकीं दरमहाचा पगार कोणालाच नव्हता. या कामांत यश आल्यास यांस बक्षीस मात्र ठरविलें होतें. "तूर्त दान महापुण्य" या न्यायानें नबाबाचे अर्जाचा निकाल लागेपर्यंत वाट पहावी; यश आल्यास आपणांस बक्षीस मिळणार, नाहींतर "वाटाण्याची अक्षत," असा विचार करून अस्थिरबुद्धि बाबा जुवेकर यांनीं हें काम लवकर सोडून दिलें. "ओल" आहे असें जोंपर्यंत मनुष्यास वाटत असतें तोंपर्यंत तो त्याची पाठ सोडीत नाहीं. परंतु "पोल" असें समजतांच प्राणिमात्राच्या हातून पदार्थ आपोआप गळतांना आढळतात, तसें या कामांत जुवेकर यांस "ओल" दिसलें नसेल. असो. नानांनीं हें काम हातीं घेतलें तें स्वार्थबुद्धीनें नव्हतें. मनुष्यमात्र जें जें कांहीं कृत्य करितो त्यांत कांहींतरी स्वार्थ असतोच. स्वार्थ नसेल तर मनुष्याच्या

हातून कोणतेंही कृत्य घडणें अशक्य आहे, ही गोष्ट खरी आहे; पण साधारण जनरूढीमध्यें परोपकाराचीं कृत्यें लोक करितात, त्या अर्थानें पाहिलें असतां नबाबांपासून आपल्यास कांहीं द्रव्यप्राप्ति व्हावी, असा नानांचा हेतु नव्हता. आपला व बेलेकर नबाब यांचा फार स्नेह, हें स्मरून त्यांच्या चिरंजीवाचें काम त्यांनीं हातीं धरिलें होतें. आपल्या मित्राच्या मुलांस (ते दुर्जन असले तरी) पूर्व स्मरून होईल तेवढें साह्य करावयाची नानांला बुद्धि असे, असें अनेक उदाहरणांवरून वाचकांच्या उत्तरोत्तर लक्ष्यांत येईल. तीक्ष्ण धारेचें शस्त्र लहान मुलांच्या हातांमध्यें मिळालें तर जी वस्तु समोर दिसेल तीवर प्रयोग करून पाहण्यास तें मूल उत्सुक असतें, तद्वत् नानांस आपल्या कुशाग्र बुद्धीचें शस्त्र पुढें येईल त्या प्रत्येक गोष्टीवर चालवून पाहण्याची संवय लागली होती. जितका जितका या शस्त्राचा अधिक उपयोग, तितकी तितकी या हत्याराची धार अधिकाधिक प्रखर होत जाते. ज्या मानानें प्रयोग करण्याचा पदार्थ अधिक कठीण त्या मानानें त्यावर शस्त्रक्रिया करावी लागते, आणि क्रियेच्या आधिक्यानुरूप कर्त्याच्या मनाची, विचित्र वृत्तीची एकाग्रता होणें भाग पडते व होते. एकाग्रतेप्रमाणें सुख किंवा आनंद. जितका ज्या पदार्थापासून आनंद, तितकी त्या पदार्थाची आवड. नाना या कामांत निमग्न होऊन गेले. कामच असें कठिण होतें. शेवटीं अर्ज लिहून झाला. सरकारास पाठविला. जहागीर सुटली.

नबाबांकडून कांहीं बक्षिस मिळेल या हेतूनें काम हा-

तींच घेतलें नव्हतें, त्याचीमग मार्गप्रतीक्षा करीत बसण्याचें कारणच नाहीं. या कामाबद्दल ह्मणून कांहीं नबाबांस देतां येईना. काय द्यावें याचा अंदाजही करितां येईना. लोकरीत्या निरपेक्षबुद्धीनें काम केलें, त्याची किंमत शतगुणित वाढली. दुसरें कारण, नबाबांस माशानें गिळलेलें रत्न पुन्हा मिळालें तें अधिक मौल्यवान् वाटूं लागलें. नानांच्या बक्षिसाची गोष्ट तशीच नबाबांच्या मनांत भिजत पडली.

राबर्टसन् कलेक्टर सुरतेस असतां त्यांच्या हातून बरी किंवा वाईट, लक्ष्यांत ठेवण्यासारखी किंवा ज्या गोष्टीच्या परिणामावर सार्वजनिक हितानहित फारसें आहे, असें कांहीं घडून आलें नाहीं. यांच्या स्वभावावरून, बुद्धिमत्तेवरून, अथवा अशाप्रकारच्या कोणत्याही अलौकिक गुणांवरून या गृहस्थाचें या ठिकाणीं विशेष वर्णन करणें अवश्य वाटत नाहीं, असें या भागाच्या आरंभींच सांगितलें आहे. परंतु नानांच्या कारकीर्दींत एक प्रचंड पुरुष यांच्या मागून आला; याच्याविषयीं जर दोन गोष्टी सांगितल्या नाहींत तर अन्याय झाला असें वाचकांस वाटल्यावांचून राहणार नाहीं.

सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेमध्यें पास होऊन जे लोक हिंदुस्थानामध्यें राज्यशकट हांकण्यास येतात, त्यांमध्यें सर्व लोक बुद्धिमत्तेनें साधारण लोकांपेक्षां अधिक असतात. ह्या परीक्षेसाठीं तयारी केलेल्या उमेदवारांमधून सरकारास पाहिजे असतील तेवढे निवडून घेतात. ह्मणजे आलेल्या उमेदवारांपैकीं अनुक्रमानें उत्तम तेवढे पसंत

करितात. तर अशा चाळणीनें चाळलेल्या माणसांमध्यें, एखादा मतिमंद, आलस्यपटु, उद्योगहीन आणि इंग्रज सरकारच्या अनेक गुणावगुणात्मक राज्यव्यवस्थेच्या अष्टदिशांकडून आलेल्या लक्षावधी धाग्यांची गुंतागुंत सोडविण्यास कंटाळणारा खडा राहतच नाहीं, किंवा राहिल्याचें एखादेंही उदाहरण ऐकिवांत नाहीं. तशी यांच्या सौजन्याविषयीं, सुनीतीविषयीं, समदृष्टीविषयीं आणि त्यांच्या प्रजाहितनिष्ठेविषयीं त्यांचे हितचिंतक व जिवलग मित्रही त्यांच्या वतीनें इतके खातरीनें प्रतिपादन करतील असें वाटत नाहीं. हे गुण शाळेंत शिकवितां येणार नाहींत व अशा गुणाधिक्यार्थ कागदावर परीक्षाही घेतां येणार नाहीं. या कामांत सरकार प्रत्येक दगड उलथापालथ करून पाहत आहे! किती श्रमसाफल्य होतें, तें पहात सर्व लोक बसलेच आहेत. या उंच वर्गांतील सरकारी कामगारांमध्यें उत्तम, लोकप्रिय, नीतिमान् लोकांचीं उदाहरणें मुळींच आढळत नाहींत, असें मात्र कोणीं समजूं नये. या प्रचंडबुद्धीच्या लोकसमूहामध्यें कांहींतरी अलौकिक अवधानी माणसें होऊन गेलीं आहेत, येत आहेत, व येतील, अशी आशा आहे. सुरत येथें नवीन कलेक्टर् व माजिस्ट्रेट यांची गणना या प्रचंड पुरुषवर्गांत करितात; आह्मींच असें नव्हे पण प्रस्तुत सर्व जाणते लोकांचाही अभिप्राय असाच आहे. हे गृहस्थ टिफिन करण्यास जर बसले असले, आणि कोणी त्यांस भेटावयास आला, तर जेवतांना भेटल्यानें त्यांचा अवमान होईल, असें जर नसेल तर हा उद्योगी पुरुष भेटण्यास कमी करीत नसे.

वेळीं त्यास पुष्कळ लोक निरनिराळ्या कामांकरितां
यास आले, तर कामाच्या गौप्यतेमुळें कांहीं नड न-
स सर्वांची एकदम भेट तो घेत असे. सर्वांबरोबर बो-
असतां त्यास उचित दिसलें कीं, आपण ह्या कामीं
लिहिलें पाहिजे, तर लागलाच त्यानें कागद घ्यावा
एकीकडे निरनिराळ्या विषयांवर भिन्न भिन्न व्य-
ीं बोलत बसला असतां चिठ्या लिहीत असाव्या,
न बोलतां पाठीमागें शिपायाच्या स्वाधीन करीत
वें. चिठी कोणास लिहिली आहे, तो मनुष्य राहतो
वगैरे माहिती शिपायानें पाहिजे तशी मिळवावी. या-
ं सकाळचे ‘पांच वाजल्यापासून रात्रीं बारा वाजे-
एकसारखें कामावर घुसलेलें असावें. गुजराथ
त याचा वेळ बराच गेला, ह्मणून गुजराथी भाषा
यास चांगली येत होती असें नाहीं; आणखी अनेक
यास येत असत. गुजराथी भाषेमध्यें तर शाळा-
ची क्रमिक पुस्तकमाला याच्याच नांवची अद्याप
आहे. युरोपिअन लोकांपैकीं एतद्देशीय भाषेमध्यें
लिहिले आहेत असे गृहस्थ फार थोडेच सांपडतील.
ाख्यामध्यें सरकारी जमाखर्च ठेवण्याचे नमुने टी०
होप साहेबानेंच केलेले चालतात. पाहील त्या
मध्यें या प्रचंड पुरुषाचें डोकें शिरणार नाहीं, व त्यांत
घातलें नाहीं अशी गोष्ट मनांतसुद्धां आणायला
या जगड्व्याळ उद्योग करणाऱ्या पुरुषाचें लक्ष
सारें आपल्या देशाचें व तिकडील लोकांचें हित
ोईल याजकडे सदैव असे. एतद्देशीय लोकांची कींव

यास कधीं आली असें त्याच्या कृतीवरून तरी ह्मणतां येत नाहीं. हाताखालचीं एतद्देशीय चाकरमाणसें लहानापासून थोरापर्यंत याच्याजवळ नौकरी ह्मणजे "सुळावरची पोळी" असें समजत असत. चुका झाल्यास निर्दय शिक्षा येऊन बसणार, बक्षिसाचा मात्र वानवा. बक्षिसाला कधीं प्रसंगच यायचा नाहीं.

एके दिवशीं या साहेबांचा घोडेवाला घोड्यासह स्थलांतर करीत होता, आणि घोड्याचा पाय सरून दगडावर घांसपटला. ठाणकावर जातांच साहेबांच्या नजरेस ती गोष्ट आली. साहेबांनीं तावडतोब डेप्युटी माजिस्ट्रेटास ( नानांस ) एक चिठी खरडली. लिहितात कीं, आमच्या घोडेवाल्यानें आपल्या कामांत अशी अशी हयगय केली आहे, याच्यावर खटला करून यास शिक्षा करावी. चिठी वाचून तर नानांस सखेद आश्चर्य वाटलें. अशा बुद्धिमान् पुरुषानें अशी चिठी लिहिणें ह्मणजे न्याय-कोर्टें कशीं चालतात याची मनांत खरी कल्पनाच नसावी अगर आपल्या हाताखालचे न्यायाधीश ह्मणजे विचार-शून्य, न्याय बनविण्याचीं साधनीभूत हत्यारें, असें मानीत असावें. पहिली कल्पना असंभवनीय दिसते. विद्वत्ता आणि अज्ञान एकसमयावच्छेदेंकरून असणें हा भास तरी कसा होईल? दुसरा प्रकार ह्मणजे नीति, सद्वर्तन, आणि न्यायबुद्धि यांचा या पुरुषामध्यें लोप मानला पाहिजे. हा आभास विद्वत्तेशीं असंबद्ध नाहीं. असो. राजकीय, राष्ट्रीय व स्वकीय हितानहितामुळें मनुष्याच्या वर्तनावर, विचारावर आणि हिंमतीवर कसे परिणाम होतात पहा.

यास नीतिवर्धकक्रमिक पुस्तकें काय करितील? नानांनीं या चिठीकडे लक्ष्य न देतां घोड्याचा पाय चालतांना सरला तर घोडेवाल्याचा अपराध नाहीं, व त्यास कोर्टानें शिक्षा ठरवावी हें योग्य नाहीं, असा ठराव करून त्यास सोडून दिला. साहेब मजकुरांस हें नानांचें वर्तन आवडलें नाहीं, व असा आपल्या समजाप्रमाणें चालणारा माजिस्ट्रेट त्या दिवसापासून मर्जीतून उतरला. स्वातंत्र्यप्रिय माणसें या साहेबांस आवडत नसत, असें दिसतें. तथापि या पुरुषाच्या महान् गुणांविषयीं नानांचा अभिप्राय शेवटपर्यंत बदलला नाहीं असें दिसतें. नानांच्या घरांत होपसाहेबांची तसबीर दिवाणखान्यांत सदरेवर टांगलेली आहे. वेळोवेळीं प्रसंगविशेषें या पुरुषाच्या कर्तुमकर्तुं सामर्थ्याविषयीं, पराक्रमाविषयीं व धाडशीपणाविषयीं मोठ्या निखालसपणानें नाना बोलत असत. होपसाहेबांस हा निखालसपणें बोलणारा व चालणारा माजिस्ट्रेट मनापासून आवडत नसे. कालगतीनें राज्यव्यवस्थेचें झाड वाढत गेलें त्याप्रमाणें ह्या दोघां होकायंत्रशलाकेच्या दोन टोंकांप्रमाणें वागणाऱ्या पुरुषांची फुटाफूट झाली.

---

## भाग १०.

मुंबईची कारकीर्द. इ० स० १८६७ सालीं मुंबईच्या तिसऱ्या माजिस्ट्रेटाची जागा खालीं झाली. ह्या जागेबद्दल नानांनीं पूर्वीं बरेच वेळां अर्ज केला, पण सरकारानें तितक्या वेळां त्यांचा अर्ज मनास आणला नाहीं. सरका-

रच्या मनांतून ही जागा आपल्यास द्यावयाची नाहीं, ह्मणून अर्ज न करितां नाना स्वस्थ राहिले. परंतु त्यावेळीं या जाग्यावर नानांची नेमणूक झाली. ही अनपेक्षित बढती नानांस मिळाल्यावर त्यांच्या मनावर कांहीं एक तऱ्हेवाईक तरंग उठूं लागले. आतां आपल्या पुढें महान विद्वान् वकील, ॲडव्होकेट, आणि बॅरिस्टर येऊन उभे राहणार. त्यांचे बोलण्याचा इंगितार्थ आपणास बराबर समजला पाहिजे. दिनवृत्तांत रोज प्रसिद्ध करणारीं वर्तमानपत्रें युरोपांतील नामांकित विद्वज्जनांनीं हातीं धरलेलीं आहेत. ते तर काकदृष्टीनें व्यंगें पाहत बसलेच असतील. तर अशा सहस्रनेत्रजनसमूह पुरुषाच्या कसोटीस उतरून व हायकोर्टाच्या पडोशीला बसून आपला आजपर्यंत संपादन केलेला लौकिक काय टिकाव धरणार याविषयीं मन उचंबळया खाऊं लागलें. "तवईपेक्षां आवई कठीण," खऱ्या शिपायास रणवाद्यश्रवणानें भीति उत्पन्न न होतां स्फुरण येत असतें, व तंबुऱ्याचा आवाज ऐकतांच गवई लोक आपल्याशींच गुंगूं लागतात; त्याप्रमाणें आमच्या न्यायपटूंस केवळ वीरश्रीच आली. मुंबापुरीमध्यें माजिस्ट्रेटाचे कामास नानांनीं सुरुवात केली.

मनुष्यजीवनाच्या आवश्यक वस्तू कोणत्या, ह्या प्रश्नाचें उत्तर देणें फार कठीण आहे, असें विचारांतीं सर्वांचे लक्षांत येईल. अगदीं रानटी स्थितीमध्यें राहणाऱ्या लोकांना ज्या उपभोग्य वस्तू मिळाल्या ह्मणजे त्यांचें यथास्थित उपजीवन होतें, तेवढ्यानेंच सुधारलेल्या नगरवासीजनांचें चालणार नाहीं. दहा वीस वर्षांमागें

खेड्यापाड्यांतील लोकांना चहा, काफी, ह्मणजे काय पदार्थ आहे आणि मनुष्यास त्याची कशासाठीं गरज लागते, याचा मोठा अचंबा वाटत असे. पण अलीकडे शहरोशहरीं लोकांस विशेषतः परद्वीपस्थ लोकांचा मानसिक किंवा शारीरिक समागम ज्यांना विशेष झाला आहे, अशा लोकांस ते दोन पदार्थ बहुतेकांशीं प्राणरक्षकच होऊन बसले आहेत. अशा अनेक उदाहरणांवरून दिसून येतें कीं, संवय कालगतीनें दृढ झाली ह्मणजे ती मनुष्याच्या आंगचा स्वाभाविक धर्म होऊन जाते. मग ते संवयीचे पदार्थ त्या मनुष्यास न मिळाल्यास त्यास चैन पडेनासें होतें. कितीएक वेळां त्या माणसाची प्रकृति बिघडण्यास संवयी ह्या कारण होतात. नानांचे याप्रकारचे कांहीं अंगभूत धर्म होऊन बसले होते. जसें रोज जेवलेंच पाहिजे तसें रोज चहा काफी घेतलीच पाहिजे, रोज कांहीं तरी वाचनामध्यें वेळ घालविलाच पाहिजे. या वाचनाची दिशा ऐहिक असे, कधीं पारमार्थिक असे. प्रसंगोपात फौजदारी कायदेप्रकरण त्या वाचनाचा मुख्य बिंदु असे. बहुतेक वाचनवर्तुल या बिंदूसभोंवतीं घिरट्या घालीत असे. तत्संबंधीं प्रत्येक हायकोर्टाचे ठराव, मुंबईचीं टाईम्स, नेटिवओपिनिअन, इंदुप्रकाश, विविधज्ञानविस्तार वगैरे इंग्रजी मराठी वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें, त्रैमासिकें आणि नवीन नवीन प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें यांस नानांच्या घरीं आश्रय मिळत असे. लोकांमध्यें मिसळण्याचें शील नसल्यामुळें, लायब्ऱ्या, सभा, वगैरे लोकसमूहाचीं ठिकाणें, टळतील तेवढीं टाळण्याचा यांचा

हेतु असे, ह्मणून त्यांची वाचनतृषानिवारणार्थ या सर्व वाचनसाधनाची खरेदीच ते बरेच दिवस करीत आले. अशा वाचनानें प्रगल्भदशेस आलेल्या पुरुषापासून अविचारी न्याय झाल्याचें पाहण्यांत नाहीं व ऐकिवांतही नाहीं. तथापि अविचारी लोकांमध्यें या नेकीच्या पुरुषाविषयींही कांहीं प्रकारचे आक्षेप घेत असत. असें होण्यास कारणें काय तीं आह्मीच आमच्या स्वतःच्या माहितीप्रमाणें येथें देतों. पहिला आक्षेप असा कीं, ते अफूचा अंमल करीत असत. या दुधानें धुपलेल्या पुरुषास भोजनोत्तर सुपारीही खाण्याचें व्यसन नाहीं. व्यसन असें मानल्यास हे कधीं कधीं दिवसांतून एक दोन वेळां तपकीर ओढीत असत.

व्यसनानि सन्ति बहुशो । व्यसनद्वयमेव केवलं व्यसनं ॥
विद्याभ्यसनं व्यसनं अथवा हरिपादसेवनं व्यसनं ॥ १ ॥

यांपैकीं या पुरुषास विद्याभ्यसनाचें मात्र व्यसन होतें खरें. विद्याव्यासंगामुळें व आपल्याशींच विचार करीत बसण्याच्या संवयीमुळें हा कांहीं भ्रमिष्ट गृहस्थ आहे, असें लोकांस वाटे. तोंडावर स्पष्ट बोलून कोणाचें मन दुखवावें, असें त्यांचें शील नव्हतें, ह्मणून कोणीं कांहीं सांगितलें तरी तें ऐकून शांतपणें घ्यावयाचें. तो सांगेल तें न रुचल्यास त्यास अस्पष्ट उत्तर द्यावयाचें. त्याचे अर्थ करूं गेल्यास दोन्हीं तऱ्हांनीं व्हावे. पुण्यासही अडाणी लोकांमध्यें नानांवर हा चमत्कारिक आरोप असे. तोच आरोप मुंबईमध्येंही कोठें कोठें कानीं पडत असे. मितभाषणीस्वभाव असल्यामुळें बाह्य चर्येवर दृष्टी ठेवून अनुमान करणारे लोक यांस अंमल करणारे

न्यायाधीश असें ह्मणत व अलीकडच्या मन्वंतरांत, अंमल ह्मटला ह्मणजे सुरापान; पण काय चमत्कार यांस कोणी त्या बाईचा समागम आहे असें न ह्मणतां हे अफूच्या लहरींत असतात असें ह्मणत. अफूचा अंमल फार शांत, ह्मणजे, येणेंकरून मनुष्य दुसऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस बेफाम झालेला येत नाहीं. फार अथवा वायफळ बोलणें या अंमलामध्यें दृष्टीस पडत नाहीं; इतकेंच नव्हे, पण स्वभावतः संभाषणप्रिय मनुष्यही अफूच्या अनुषंगानें मौन्यगामी, स्वानंदी, व प्रसंगवशात् विशेष तुडस, तामसी व शब्दांपेक्षां आपली मुद्रा पालटून रोष दाखविणारा असतो. सुरापानानें तसें होत नाहीं. अस्पष्ट वर्णोच्चार, लाल डोळे व निरस तोंड हे जे सुरापानाचे दोष ते अविद्वान्, क्रूर, अनियमित वर्तनाच्या माणसांमध्यें आढळतात. विद्याच ज्याचें व्यसन, गहनविचार ज्याचें जीवन, व अखंड उद्योग ज्याचा परमानंद अशा पुरुषाचे ठिकाणीं जरी मौन, गांभीर्य, स्वानंद, असदुक्तीचा तिटकारा हे गुण कांहीं विपरीत दिसून येत, तथापि अडाण्याशिवाय कोणी यांना, अफूची धुंदी खचित ह्मणणार नाहीं. तोंडावाटे ब्र न काढतां पक्षकारांची तक्रार शांतपणें ऐकत बसणारा न्यायाधीश केवळ वकिलांच्या अप्रशस्त व अनुचित मार्गावलंबनाबद्दल कठोर, व बचेरी करण्यासारखे शब्द बोलत असला, तर तो वकिलांस तुडस व तामसी वाटला यांत नवल तें काय? सन्मार्गवर्ती पुरुषास खोटें अगदीं सोसेनासें होतें. तो दोष लोकांमध्यें, तशांत समंजस

लोकांमध्यें पाहाण्यांत आल्यावर, राग येतो. वकिलांचे आडमार्ग नानांस मोठ्या खुबीनें उघडकीस आणतां येत असत, तर आडमार्गी वकील त्यांस तिरसट ह्मणतील हें उघडच आहे. मुंबईतील लुच्चे, लफंगे, टोळीबाज, व सर्व प्रकारच्या बद्‌माश लोकांमध्यें नाना मोरोजी हें सामान्य नाम होऊन गेलें होतें, व तें अद्याप कोठें कोठें आपल्या विशेषत्वास सोडचिठी दिलेलें आढळतें. नाना मोरोजी ह्मणजे 'वाईट लोकांचा काळ.' 'खूब समजून ऐस बच्चाजी' तुला एकदां नाना मोरोजी दाखवितों.' 'साहेब नाना मोरोजी,' 'कोटांतला नाना मोरोजी.' 'अरे, जा, जा, कोटांतल्या नाना मोरोजीपुढें तीन वेळ गेलों, त्याला दाद दिली नाहीं; तूं मला गिरगांवच्या नाना मोरोजीची भीती घालतोस काय ?' असे उद्गार सदरील प्रकारच्या लोकांच्या तोंडीं नाना कामावर असतां कानीं पडत यांत नवल नाहीं. पण त्यांनीं पेनशन घेतल्यावर क्वचित् अद्यापही ऐकूं येतात.

एखाद्या कुलीन गृहिणीवर आग पाखडणें असल्यास, तिला व्यभिचारिणी ह्मणून कंडी उठवतात. कोणी सद्‌गृहस्थ डोळ्यांत सलत असल्यास, तो स्वगृहांतील आप्तवर्गीणीशीं लंपट आहे असें पिकवितात. त्याचप्रमाणें कडक, न्यायी, सरकारी कामगाराचा बद्‌लौकिक करणें असल्यास, त्यावर लांचाच्या आरोपाचें पाशुपतास्त्र सोडून द्यावें. अशीं अनेक उदाहरणें वाचकांच्या पहाण्यांत व ऐकण्यांत आलीं असतील. परंतु नानांवर अशा प्रकारचा दोषारोप कोणाच्यानें करवला नाहीं. या कामांत नानांचें निर्लेपत्व सोलापूर, पुणें, खानदेश वगैरे ठिकाणीं अद्याप गाताहेत.

पुण्यामध्यें असतांना भाऊ साहेब तांबे, बडोद्याचे माजी नायब दिवाण यांच्या उपस्त्रीतर्फे नानांनीं ठराव केला; त्यावर अपील झालें व त्यामध्यें वेस्ट्राप साहेब, मुंबई हायकोडताचे माजी मुख्य न्यायाधीश सर मायकेल वेस्ट्राप यांस बॉरिस्टर केलें होतें. या बॉरिस्टरांकडे रा० फकीर बाळकृष्णजी, नानांचे ज्ञातिगृहस्थ व स्नेही यांचें कामा-निमित्त फार जाणें येणें असे. हे गृहस्थ बॉरिस्टराजवळ असतां या अपीलाची समजावणी करणारांनीं या श्रीमान् घराण्यांतील बटिकेच्या तर्फे निकाल करण्याचें 'लांच' हें एक कारण सांगण्याबरोबर, साहेब मजकूर त्यांस ह्मणाले, असली भलतीच गोष्ट बोलूं नका. नाना लांच खाणारा न्यायाधीश नव्हे अशी आमची खात्री आहे व हा आरोप ज्या कोणास नानांची माहिती आहे त्यास खरा वाटणार नाहीं. याप्रमाणें परदेशी व एतद्देशीय लोकांमध्यें नानांच्या निखालसपणाविषयीं फार भरंवसा असे.

न्यायकोर्टांत बसले असतां कायद्याप्रमाणें इनसाफ करणें हा नानांचे आंगीं गुण इतर सर्व न्यायाधीशांप्रमाणें होताच, तथापि 'कामांत काम नि रामांत राम' करावयास साधेल तेवढें हे करीत असत. आमच्या या वरील ह्मण-ण्याचा स्पष्टार्थ व्हावा एतदर्थ एक दोन प्रत्यक्ष पाहिलेलीं उदाहरणें वाचकांस सादर करितों. सायंकाळीं गुजरीच्या वेळीं फणसवाडीच्या नाक्यावर केराची पेटी आहे, त्या ठिकाणीं मागच्या बाजूस कोंपऱ्यावर गटार बरेंच खोल आहे तेथें गाड्यांची व लोकांची फार गर्दी झाल्यामुळें पेटीजवळ उभें राहणें भाग पडलें. या ठिकाणीं दुतर्फा

अगदीं हलक्या विश्वयोषितांच्या रांगा असतात. प्रथमदर्शनीं नाक्यावर फूलवाले माळी दीड हात परिघाच्या वाटोळ्या टोपल्या बगलेमध्यें घेऊन उभे असतात ते एका हातानें फुलांची लांब माळ येणाराजाणाराच्या तोंडापुढें करून ह्मणत आहेत 'शेट घेऊन जा.' जोडे घेऊन मोची गिऱ्हाइकाच्या गराड्यामध्यें चत्राया करताहेत व साखरयाबली ह्मणत दोन तीन असामी बसलेच असतात. इतक्यांत दोहोंकडून गाड्या येत असाव्या. मग त्या फजितीस पारावार नाहीं. सभ्य मनुष्यास त्या माळ्यांची रांग व नाटकांच्या जाहिराती वाचण्याकरितां मानेचा कांटा खुडे होईपर्यंत उभे राहाणारे खुशालचंद लोकांचा थवा पार पडून येईपर्यंत त्याची पांचावर धारण बसते. पुढें मधून चालावें तर गाड्या, बाजूस सरावें तर गटारसमागम बरा ह्मणविणारा विश्वयोषितांचा समुदाय, कोणी अभद्र वाक्यमंडित, कोणी झाडूची चवरी आपले शिरोभागाच्या वर उचलून उंबऱ्यावर मारण्यामध्यें, जाणाराच्या वांट्यास तदंश मस्तकीं धारण करणें भाग येतें कीं काय अशी धास्ती पडते. या संधीस "बैल, बैल" हे शब्द कानीं पडले, इतक्यांत गटारामध्यें कांहीं हालतेंसें दृष्टीस पडलें. ओणवून पाहतों तों कोणी मनुष्य कण्हतेंसें ऐकूं आलें. त्याला कांहीं मदत मिळाल्यावर एक वृद्ध बाई बाहेर आली. तिला उभें राहण्यासही तकवा नव्हती. डोळ्यांवाटे अश्रुपात चालला होता. अस्पष्ट शब्दांनीं विलाप चालले होते. नखशिखांत मळमूत्रादी अपवित्र पाण्यानें स्नान झालें होतें. आधीं दुःखामुळें व वार्धक्यानें अगदीं खोल ठिका-

णांतून शब्द येत होता. तशांत पाठीचा कणा धनुष्याकार होऊन इतर लोकांना पाहणें तिच्या डोळ्यांनीं सोडलेंसें वाटे, किंवा आपला आतां आवडता मित्र काल जमिनी-वर कोठें तरी पडलेला सांपडेल या हेतूनेंच कीं काय शोधीत चालली आहेशी त्यावेळीं ती दिसत होती. हें चित्र प्रेक्षकांचें त्हदय दोन मिनिटें भेदीत आहे, इतक्यांत १–२–३–४–५ याप्रमाणें २५ मनुष्यें त्या बाईच्या सभोंवतीं जमलीं. व आपआपल्यापरी स्वसमाधानाक-रितां नानाप्रकारचे प्रश्न करूं लागलीं. इतक्यांत १ सुमारें ३५ वर्षांच्या उमरीचा पांढरा पोषाख केलेला पारशी त्या गर्दींत घुसला. तो ह्मणतो, अरे काय झाला? अरे काय झाला? कशाला बोंम पाडते? मतारी? काय झाला? "बैलानें ढकललें रे बाबा." इतक्यांत पोलीस शिपाई आले, व या बाईला कोणीं वर काढिली वगैरे गोष्टींची चौकशी करूं लागले. त्यावरून तो पारशी पांढऱ्या पोली-सांपैकीं असावा असें वाटलें. बाईस वर काढणारा मनुष्य पुढें आला नाहीं. बैल नेणारास पकडून आणला. सर्व लटं-बर चौकीवर घेऊन गेले. बैलवाल्याचें नांव लिहून घेऊन कोर्टांत माजिस्ट्रेटापुढें हजर होण्यास ताकीद दिली. त्या बैलानें रस्त्यावर पांच चार मनुष्यांस इजा केली होती. बैलवाल्याचा अपराध काय ठरतो? त्यास शिक्षा काय होते? बैलवाल्याच्या हातून नाइलाजास्तव मुकें जनावर सुटून लोकांना त्रास झाला खरा. वृद्ध बाईस कांहीं दिवस भिक्षा मागण्यासही जाण्यास सामर्थ्य राहिलें नाहीं. तिची अवस्था पाहून कोणाचें मन द्रवणार नाहीं? दुसऱ्या

दिवशीं शनिवार होता. ११ वाजतां कोर्टांत खटला उभा राहिला. नानांच्याही मनांत बाईची शोचनीय स्थिति मूर्तिमंत राहिलीसें दिसलें. पोलिसानें बैलवाल्यास कांहीं तरी शिक्षा व्हावी ह्मणून यत्न चालविला होता. त्यानें घडलेल्या गोष्टी सर्व कबूल केल्या. पण बैल बुजाला, माझा इलाज नाहींसा झाला, आह्मीं दोघांनीं त्यास धरिला होता. बैलवाला अगदीं खातरीनें समजत होता कीं, आपल्यास दंड खचित होणार. नानांस तर मोठी पंचाईत पडली असेल; अन्याय न होतां बाईचेंही कल्याण झालें पाहिजे. नानांनीं बाईस प्रश्न केलाः—तुझी बैलवाल्यावर काय फिर्याद आहे? इकडे बगाः—मी फणसवाडीच्या नाक्यावरूनशानी जात होतों, आणि बगा मी अगदीं गरीब, माझा योक तो योक— "तुझी फिर्याद कायती बैलवाल्यास कळविली काय"? कानाशीं ओरडून दुभाष्यानें माजिस्ट्रेटांचें ह्मणणें बाईस कळविलें. नानांनीं बाईची समजूत करण्यास बैलवाल्यास सांगितलें; उभयतांही कोर्टाबाहेर गेलीं. पोलिसानें माजिस्ट्रेटाचा हेतु तेव्हांच ताडला. बैलवाल्यानें बाईच्या हातावर चार रुपये ठेविले आणि सांगितलें कीं, माझी फिर्याद कांहीं नाहीं असें ह्मण. त्याप्रमाणें मी भिकारी आहें, माझी फिर्याद कांहीं नाहीं असें कोर्टास तिनें सांगितलें. पहा, काय धूर्तता न्यायाधीशाची! अन्याय तर नाहीं, बाईचें तर काम झालें. नाना कडक न्यायाधीश खरे, तरी गरीबांसाठीं त्यांचें सदय अंतःकरण असे. लुच्चांचे मात्र ते काळ होते.

एक वेळ अशी गोष्ट झाली कीं, एक मुसलमानी ध-

मांची तरुणी, मोलमजुरी करून उदरनिर्वाह करणारी खरी, तरी रूपवती आहें असें मनांत बाळगणारी व अशा समजुतीनुरूप ठाकठिकी करून नटणारी स्त्री नवऱ्यावर फिर्याद करण्याकरितां कोर्टांत आली. न्यायाधीशापुढें येतेवेळीं तिच्या बरोबर एक सजातीय मनुष्य होता. तो फार तरतरीत, खटपटी, बोलका आणि त्याच्या वर्तनावरून तिच्या नातेवाईकांपेक्षांही तिच्याशीं अति सलगी करतांना दिसला. तिचें ह्मणणें होतें कीं नवरा मला जाच करितो. त्यानें माझे पोटाची तजवीज करावी. व मी वेगळी राहणार. माजिस्ट्रेट ह्म०:—तुला नवऱ्यापासून काय जाच होतो? तो तुला मारितो काय? तरुणी ह्म०:—मारीत नाहीं; पण मला खायापियाला बरोबर देत नाहीं. माजिस्ट्रेट ह्म०:—बरोबर ह्मणजे? पाहिजे तितकें कीं सुग्रास? तरुणी ह्म०:—कधीं कधीं माझी उपासमार करतो. माजिस्ट्रेट ह्म०:—आपण पोटभर खातो काय? तरुणी ह्म०:— तें मला काय कळे. दुसरे कोठें जाऊन खात असेल. माजि० ह्म०:—एकूण त्याचें कोठें दुसरें ठिकाण तरी आहेना? तरुणी ह्म०:—( लाजल्याचें ढोंग करून डोकीवरचा पदर सरसावते व तोंड मुरडते. उत्तर देत नाहीं, कांहीं वेळानें डोळे पुसते. ) माजि० ह्म०:—बरें असो. तुझा नवरा काय धंदा करितो? तरुणी ह्म०:—बंदरामध्यें गलबतावर काम करितो. काम नसेल तेव्हां घरींच बसतो. माजि० ह्म०:— तर मग तुझा नवरा गरीब आहे? आणि तुझ्याबरोबर आलेल्या मनुष्यावरून वाटतें कीं, तुझ्या माहेरचीं सुखी आहेत, तरुणी

ह्म०:— नाहीं. माझें माहेर येथें नाहीं. माझें माहेर मालवणास आहे. ते मला विचारीत नाहींत. हुसेन मला कोर्ट दाखविण्याकरितां मजबरोबर आला, तो आमचा शेजारी आहे. पोलिसचे शिपाई, त्यांत मुंबईचें पोलीस ह्मणजे जितकें लोक जुलमी ह्मणून ओरड करितात तितकेंच त्यांच्या चांगल्या गुणांविषयीं वर्णन केल्यावांचून राहवत नाहीं. तूं आपला अर्ज काय तो लिहून घेऊन ये असा माजिस्ट्रेटांनीं हुकूम केल्याबरोबर पोलिसास माजिस्ट्रेटांचा कल या खटल्याविषयीं बरा नाहीं असा तर्क करितां आला. ती बाई मागें होतांच पोलिसचे शिपाई तिच्या साथ्याच्या पाठीस लागले. त्याला फार त्रास दिला. तथापि तो तसाच टेंक देऊन, नाना कोर्टांतून उठतपर्यंत बाहेर उभा राहिला होता. साडेपांच वाजतां नानांच्या समोर जिन्याच्या तोंडांत उभा राहून कांहीं आपले हाल व विपत्ति सांगावी ह्मणून हुसेनानें यत्न केला; पण पोलिसानें तो सफळ होऊं दिला नाहीं, किंवा नानांनींच तिकडे कानाडोळा केला असें ह्मणणें भाग पडतें. तो जिन्याच्या तोंडांत साहेब, साहेब, करून पुढें होणार, इतक्यांत एका शिपायानें त्यास मागें ओढून नानांच्या पाठीशीं बरेच मुष्टिमोदक दिले. त्याची हेळणा व विटंबना मांडिली. न्यायाधीश गाडीमध्यें बसावयास गेले तेव्हां, इमारतीपासून गाडीच्या तोंडापर्यंत तो न्यायाधीशापुढें आपली रड गात आला, असें पाहून, एक मुसलमान शिपाई तेथें होता त्यानें त्यास मागें ओढतांना फार हांबकला. त्यावेळीं तो साहेब मला शिपायांनीं मारिलें, सोडवा,

सोडवा, असे विलाप काढूं लागला, तें नानांनीं ऐकिलें. कारण, इलाजच नाहीं. नाना ह्म०:— हवालदार, या अर्जदाराचें काय ह्मणणें आहे तें पहा. त्यास मदत करा. गाडी चालू होते इतक्यांत शिपायांनीं त्याची टर मांडण्यास आरंभ केला. या गोष्टी इतक्या जवळ नजरेपुढें, ऐकूं येण्याजोग्या, चालल्या असतां अशा धूर्त काकदृष्टी न्यायाधीशांस कशा समजल्या नसतील, याचा मोठा अचंबा पडला. इतक्यांत एक ओळखीचा शिपाई येऊन रामराम करितो, आणि ह्मणतो कां साहेब, आज तुह्मी इकडे कोठें? उ०:— इकडेसच आलों होतों, जरा वेळ होता तों कोर्टाची मौज पाहत बसलों. पण काय हवालदार? "दिव्याखालीं अंधार असतो." तुमच्या लोकांनीं न्यायाधीशांच्या समोर त्या मुसलमान फिर्यादीस किती त्रास दिला? उ०:— तो सकाळीं एक फांकडी बायको घेऊन आला होता तो? उ०:—होय, होय, तो फिर्यादी असतां त्याला इतका त्रास, मग चांगल्या मनुष्यानें फिर्याद करायाला येऊं नये वाटतें? नाहीं साहेब, आह्मी तर देखदेखत कुत्रींच, तथापि चांगला तो कोठें गेला तरी चांगलाच आणि वाईट तो वाईट. तो सकाळचा मुसलमान हुसेन बहुत वेळ कोर्टांत आला आहे. त्या बाईला तो तिच्या नवऱ्यापासून काढणार आहे; अशा लुच्चास आणखी कसा वागवावा? हवालदार ह्म०:— अहो त्याचा याच कामांत जन्म गेला, नाहीं तर बाईला तिच्या नवऱ्यावर समान मिळालें असतें; पण तो आतां कंटाळेल आणि कोर्टांत येणार नाहीं. उ०:— तुमच्या

पोलिसाची आणि न्यायाधीशांचीही धन्य आहे. अहो, आह्मी पोलीस ह्मणजे साधलें तर न्यायाधीशाचेही दिवसा ढवळ्या डोळ्यांत धूळ टाकायाला चुकणार नाहीं. पण नानांपुढें आह्मीं हात टेंकले आहेत. अहो! ते आपले पडलेना? आणि येथेंच लहानाचे थोर झालेले. आमच्या सर्व हिकमती त्यांस ठाऊक. नानांच्या पुढें मनुष्य आला, आणि नानांनीं त्याचें खरें स्वरूप ओळखलें नाहीं, किंवा त्यानें एखादी बनावट गोष्ट सांगितली, ती सजून गेली, असें कधीं व्हावयाचें नाहीं. हाच आतांचा मुसलमान साहेबापुढें जाता, तर, त्याचें काय झालें असतें? बरें साहेब, रामराम, फार दिवशीं गांठ पडली बरें, रामराम.

अशा गोष्टी अनेक आहेत; त्यांचें हें अंशतः दिग्दर्शन आहे. मुंबईचीं माजिस्ट्रेट कोर्टें, सालकाज कोर्टें, यांतील बारीकसारीक काम ह्मणजे केवळ गोंधळ आहे असें ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं, बारीकसारीक काम ह्मणजे ज्या कामांत वकील नाहींत तीं. अगदीं अपरिचित मनुष्य या न्यायकोर्टांत जाऊन मौज पाहूं लागला तर त्यास खरीच मौज व अचंबा वाटेल. असलीं किरकोळ कामें येथें दोन प्रकारचीं आहेत; तीं दोन वाजेपर्यंत आटपण्याची वहिवाट आहे. इलाख्यांतील कोर्टामध्यें शिरस्तेदार तसा येथें एक दुभाषी असतो. आरोपितांचा किंवा फिर्यादीचा व्यवहार न्यायाधीश–प्रतिबिंबित दुभाष्याशीं मात्र होतो, असें परक्याला दिसतें; कारण, दारूबाज, भाड्याकरितां गाड्या हांकणारे, उपजीवनास कांहीं आधार नाहीं असे लोक अवेळीं संशय घेण्या-

सारख्या ठिकाणीं आढळलेले पोलीस रात्रींचे पकडून सकाळीं कोर्टांत हजर करितात. अशा लोकांची ११ वाजतां न्यायाधीशापुढें गर्दी असावयाचीच. रोज एका पद्धतीचे अपराधी येत असल्यामुळें, न्यायाधीशांचेही प्रश्न ठरींव होतात. दुभाष्याला शेवटीं ते प्रश्न पाठही होतात. मग कामाच्या हौसेमुळें ह्मणा, किंवा डोकीव-रील ओझें खांद्यावर आणण्याच्या इराद्यानें ह्मणा, ते न्यायाधीशाच्या मनांतील प्रश्न अगोदरच करितात, आणि उत्तरें घेतात. न्यायाधीशास त्या गोष्टीचा वीटच आला असतो. वारंवार चर्वितचर्वण झाल्यामुळें त्यांत चव नाहींशी होते. अथवा हुंकारानें अगर मानेच्या पसंती-दर्शक हेलकाव्यानें त्या दुभाष्यास पुढें चालण्यास उत्तेजन येतें. मुक्ति किंवा शिक्षोद्धार कानीं येतांच शिपाई त्या मनुष्यास त्या अश्लाव्य स्थलावरून खालीं ओढतो. शपथेच्या मंत्रांतील बहुतेक शब्द तो दुभाष्याच उच्चारितो व साक्षी थोडे उच्चारून बाकीच्यांबद्दल रुकार देऊन संपवितो. काल सकाळीं आठ वाजतां भुलेश्वरच्या रस्त्यावर लघवीस बसलासना? अथवा आपली गाडी सोडून गेला होता-सना? रस्त्यावर फटाकड्या मारल्यासना? उत्तर अर्धें मुर्धें बाहेर येत आहे तोंच, जा. तुला कोर्टानें चार आणे दंड केला आहे. शेवटला शब्द व शिपायाचा हात अप-राध्याच्या मानेवर अशीं एकसमयावच्छेदेंकरून होतात. हा दुभाष्याचा प्रकार खटल्यामध्यें दोन्ही पक्षांकडील वकील असल्याशिवाय नानांपुढें नसे. कारण इतर न्यायाधीशांमध्यें दोन प्रकारचा उणेपणा बहुतांशीं दृष्टीस पडत असे. एक

तर भाषांची अडचण आणि दुसरी श्रम करण्याचा आळस; ह्या उणेपणा यांच्यामध्यें नसल्यामुळें राजापासून रंकापर्यंत कसाही मनुष्य येवो, तो खुद्द नानांच्या तीक्ष्ण कसोटीस लागल्यावांचून जायचा नाहीं.

एक अगदीं गरीब मनुष्य नानांच्या घरीं गेला; नानांपाशीं याचें कांहीं काम होतें. परंतु त्यास कोर्ट ह्मणजे काय तें तावत्कालपर्यंत माहीत नव्हतें. तशांत मुंबईच्या कोर्टांत त्यांत फौजदारी कोर्टामध्यें तर हलक्या लोकांची गर्दी फार असते. त्या गरीबाचें काम घरीं होण्याजोगें नव्हतें, त्यास कोर्टामध्यें नानांनीं बोलाविलें; त्या गरीबास मोठी पंचाईत पडली. कोर्टापर्यंत गेलों तरी, नानासाहेब न्यायपीठावर बसलेले असणार, त्यांचेपर्यंत आपली दाद लागते कशी? या विवंचनेंत होता. दुसऱ्या दिवशीं कोर्टाच्या पायऱ्यांशीं गेला, आणि विचार करितो आपणास कोणीं पुसल्याशिवाय वर आलों ह्मणून रागें तर भरणार नाहीं ना? एक शिपाई तेथें आल्याबरोबर त्यास ओसर देऊन "नानासाहेबांकडे जाऊं काय हो" असें त्यानें त्यास विचारिलें. शिपाई उत्तर दिल्याशिवाय चालता झाला. दुसरा एक मनुष्य भेटला, त्यालाही तोच प्रश्न केला, त्यानें त्यास खुशाल जा ह्मणून सांगितलें. लपत लपत वर जात असतां जिन्यावरून एकदम लोक आले, त्यांत त्याची हबेलंडी उडाली. न्यायाधीश बसले होते त्या दिवाणखान्याच्या दरवाज्यांत गेला. तों तेथें इतकी गर्दी होती कीं, दरवाज्यांतच किती वेळ उभें राहावें लागेल ते नकळे, असें त्यास वाटलें. न्यायाधीशापुढें एक महत्वाचा खटला सुरू

झाला होता. उभय पक्षांकडील वकील, बॉरिस्टर उभे राहून भांडत होते. इतक्यांत एक पट्टेवाला त्या मनुष्यापाशीं येऊन ह्मणतो शेट! तुह्मांला सायबांनीं आंत बसवून ठेवण्यास सांगितलें आहे; असें ह्मणतांच याचे मनांत डच् झालें. भीक नको पण कुत्रें आवर" असें झालें. शिपाई ह्मणतो चला माझ्या मगार. साहेबांसूनीं तुमची ह्मायती हाय. तेव्हां त्या गरीबास धीर आला. पण तो आश्चर्यानें चकित झाला कीं वकिलाची धुमश्चक्री कडाक्यानें त्यांच्या पुढें चालली असतांही दीनवाणी मी गरीब मनुष्य दरवाज्यांत उभा असतां माझ्याकडे नानांची नजर गेली, आणि त्यांच्या सूचनेवरून व्यवस्था लागली कशी. या पुरुषाची दक्षता आणि विशेषेंकरून गरीब लोकांकडे लक्ष अवर्णनीय असे. न्यायाधीशाचें काम करीत असतां मोठ्या मोठ्या लोकांसही नानांची भेट घेण्यास फार प्रयास पडत असत, परंतु सज्जनगरीबांस यांची भेट पाहिजे तेव्हां होई.

एक शाळापंतोजी यांच्या घरीं मुलें पढविण्यास येत असे. एक दिवस काम आटपून जातांना ठेवल्या जाग्यावर पाहतो, तों त्याचा जोडा सांपडेना. घरामध्यें मुलांची समृद्धि, कोणी एकानें खेळतां खेळतां पंतोजीच्या पादुकांचें घरामध्यें स्थलांतर केलें होतें. गड्यामाणसांपाशीं चौकशी करून पंतोजीबुवा निराश होऊन अनवाणी गेले. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं गुरुजी नानांच्या निजायाचे खोलींत अध्यापन करीत असतां नाना आंत आले आणि पलंगाखालून पंतोजीचे स्वहस्तें चरणसंपुष्ट काढून हीच काय तुमची काल सांडलेली वस्तु? असें ह्मणून पुढें केले, आणि ह्मण-

तात, तुमचा जोडा आपाशाई आहे, फार पसंत आहे, पुण्याहून आणलात वाटतें. आमच्या घरांत जोडा कोणी-कडेही नेण्यास प्रत्यवाय नाहीं. संभाळा, नाहींसा होईल. वर आणीत जा. किती बारीक लक्ष्य हें, किती सरळ स्वभाव. पंतोजी गेला गोंधळून, काय बोलावें तें त्यास सुचेनासें झालें. पंतोजीच्या जोड्याची एवढी काळजी!

याच मुलांकरितां गुरुस्थानीं नेमलेल्या पुरुषानें अनुभव घेतलेल्या एक दोन गोष्टी सांगून नानांनीं साधारण मानवधर्माचा शोध करून तदनुसार आपलें वर्तन कसें ठेविलें होतें हें आह्मी पुढील गोष्टींवरून दाखविणार आहों. त्या गोष्टी जरी वाचकांस प्रथमदर्शनीं क्षुल्लक वाटल्या, तरी विचाराअंतीं त्या त्यांच्या गुणांचें पूर्णपणें स्पष्टीकरण करतात असें त्यांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. अगदीं अवश्य वाटल्यावांचून धर्मसंबंधीं किंवा सार्वजनिक कामाचा व्यर्थ ऊहापोह व वाटाघाट करीत बसण्याच्या जागीं जावयाचें नाहीं, असा नानांचा स्वभाव असे, तरी स्नेहास अनुसरून कधींकाळीं नियम मोडावा लागे. अगर आपल्या जाण्यानें वस्तुतः कांहीं तरी सत्कृत्य होण्याचा संभव असल्यास नाना जात. उगाच बडबड करून "नळी फुंकिली सोनारें नि इकडून तिकडे गेलें वारें" असें करण्यास त्यांचें मन घेत नसे.

मुंबईमध्यें मोठे मोठे ख्रिस्ती मिशनरी लोकांमध्यें यांचें जाणें येणें असे, व त्यांतील ज्यांशीं यांचा विशेषें-करून स्नेहभाव असे, त्यांच्यामध्यें नानांच्या सद्वर्तना-वरून पूज्यबुद्धि परस्पर जागृत असे, असें दिसून येतें. सदरील वर्गांतून एकानें यांस मुद्दाम आमंत्रण केलें कीं, एक

परस्थ विख्यात वक्ता मिशनरी कोणी आला आहे, याचें व्याख्यान रात्रौ ८ वाजतां होणार आहे, तर आपण जरूर यावें. या नेमल्या वेळापूर्वी, नाना घरच्या पंतोजीस ह्मणतात, कां मास्तर, आज जनरलअसेंब्लीमध्यें व्याख्यान कोणाचें आहे? मास्तर ह्म० मला कांहीं त्याविषयीं माहिती नाहीं. वक्ता मोठा नामांकित आहे, चला जाऊं. उभयतां तेथें गेले, आणि व्याख्यान आटपल्यावर नानांच्या युरोपियन स्नेह्यांपाशीं अर्थातच संभाषण सुरू झालें. तें त्या विषयसंबंधींच होतें. केवळ आपल्याबरोबर आणलेल्या पंतोजीस एकलकोंड्यासारखें वाटूं नये ह्मणून मध्यंतरीं नाना त्या गरीब मास्तरास कांहीं तरी प्रश्न करून आपल्या संभाषणांत ओढीत असत. “कां तुह्मांला कसें वाटतें? असेंच नाहीं?” याप्रमाणें घरीं पोंचतपर्यंत क्रम चालला होता. नानांच्या वर्तनावरून त्या युरोपियनास हा कोणी तरी यांच्या बरोबरीचाच गृहस्थ असावा असें वाटे. तदनुसार तोही त्याच्या सहचरास अनुलक्षून कांहीं बोलत असे. किती धूर्तता ही!

सदरील मनुष्य एकवेळ त्यांच्या घरीं लग्नाप्रीत्यर्थ गायनसमारंभ झाला तेव्हां गेला. तों गायनास एक युवती बसली आहे. एक मुख्य स्थान मोकळें टाकून जवळ खुद्द नाना, त्यांच्या जवळ सर मंगळदासपुत्रद्वय व त्याच ओळींत कांहीं त्यांचे ज्ञातिगृहस्थ बसले होते. दिवाणखान्याच्या दोहीं बाजूस इतर लोक, ह्मणजे उजव्या बाजूस बडेबडे व्यापारी व डाव्या बाजूस स्वज्ञातींतील

तरुण गृहस्थ व मुलें. अशा बैठकीमध्यें बसण्यास जागा शोधून काढण्यास नानांच्या मुलांच्या मास्तरांस कठीण पडेल हें दिवाणखान्याच्या तोंडाशीं गरीब पंतोजीस पाहतांच ह्या धूर्त पुरुषानें ताडिलें आणि ह्मणतातः— या, इकडे. पं० येथेंच बसतों, येथें जागा आहे. ना० नाहीं, नाहीं, इकडे या, काम आहे. पंतोजीस आपल्या हातानें अगदीं आपल्या शेजारीं बसविलें. नानांचें असें वर्तन पाहून, लोकांनीं सहजच उत्थापन दिलें. "समर्थाचे घरचें श्वान, त्यास सर्वही देती मान." पंतोजीला अद्याप संकोच वाटतो असें नानांनीं पाहिलें; कारण, अगदीं चोरून सर्वांगाची जुडी करून तक्यास स्पर्श झाला न झाला, असा पंतोजीच्या बसण्याचा प्रकार नानांनीं तेव्हांच पाहिला आणि तर्जनीनें खूण करून जवळ बोलावून त्यांच्या कांहीं कानांत गोष्ट सांगितली. सर्वांचें आलेल्या गृहस्थाकडे लक्ष्य लागलें. साहजिकच त्यांच्या मनांत हा कोणी महाविद्वान् गृहस्थ असावा असा समज झाला असेल; कारण पोषाखावरून श्रीमंतीची कल्पना संभवत नव्हती. कानांत काय गोष्ट सांगितली याविषयीं जशी तेथें बसलेल्या मंडळीस वळवळ लागली असेल तद्वतच आमच्या वाचकांसही झालें असेल, असें आह्मांस वाटतें. परंतु "भरली मूठ सव्वा लक्षाची" "भरंवशाचा भोंपळा, फुटला नाहीं तों बरा." तें समजलें ह्मणजे केवळ गरीबीमधील सौजन्यास चुकल्यासारखें वाटूं नये ह्मणून या चतुर पुरुषानें मुद्दाम कांहीं तरी युक्ति योजिली होती असें आढळेल. नाना कानांत

सांगतातः---पहा तुमचें माझें घड्याळ पितळेचें फार तर १९ रुपयांचें असेल; पण त्या बाईचें अलबत नाहीं तरी १०० रुपयांचें सोन्याचें घड्याळ आणि २०० चा शेडा. तुह्मीं इतकीं पुस्तकें उरावर घेऊन वाचलींत त्याचें काय फळ?—मास्तरानें हंसून साजरें केलें. कांहीं वेळानें सर मंगळदासचे ज्येष्ठ चिरंजीवाच्यानें हा आपल्यापेक्षां हलक्या पोषागाचा पण नानांचा अधिक सलगीचा मनुष्य कोण असावा हें समजून घेतल्यावांचून राहवेना. चि० नानासाहेब! ए शुं करे छे? उ० ए तो मारा मास्तर छे, छोकराओ नही शिखे तो हुं शिखुं छुं. दुसऱ्यास मान देण्यामध्यें नानांस भूषण वाटत असे.

नानांचा परिवार फार मोठा. ८ मुलगे व ४ मुली. शिवाय त्या माउलीस आपल्या आप्तांचीं कुटुंबेंही जवळ असावीं असें वाटत असे. घरांत प्रत्येक माणसामागें एक एक गडी व प्रत्येक मुलामागें एक एक पंतोजी; दिवसांतून ९।४ लहान मोठे पंतोजी घरीं खेपा करीतच असत. मास्तरांला पैसा खर्चण्यामध्यें या विद्याभिज्ञ पुरुषाचा हात फार सैल असे; याविषयीं अन्यस्थळीं विस्तार करणें प्रशस्त दिसेल.

न्यायाधीशाचें काम करावयास मनुष्य बसला ह्मणजे आमच्या मतें त्याच्या आंगीं मुख्यत्वेंकरून, मनुष्यस्वभावाचें ज्ञान, इहलौकिक वस्तुस्थितिज्ञान, आणि अति महत्वाचा गुण (न्याय करण्याच्या वेळीं तरी) इहलौकिकपाशाचा व्यतिरेक करण्याचें सामर्थ्य; हे गुण ज्या मानानें न्यायाधीशाचे अंगीं असतील त्या मानानें त्याचे हातून

न्याय व सत्यता मिळण्याचा संभव असतो. बाकी अनेक गुण त्याच्या आंगीं आहेत पण सदरील व्यतिरेक नाहीं तर ते सर्व गुण निष्फळ होतात. व्यतिरेक ह्मणजे आपल्यास या जगापासून निराळें मानणें. तेवढा वेळ तरी आपला या जगाशीं पुढील खटल्यांतून सत्य शोधून काढणें याशिवाय कांहींही संबंध नाहीं असें समजून त्याप्रमाणें उमजणें; हा शेवटला गुण पुष्कळांशीं फक्त थोड्या न्यायाधीशांच्या आंगीं आढळतो. ह्मणजे सर्वच न्यायाधीश आपमतलबी, लांचखाऊ, चोरांचे वऱ्हाडी असतात असें आमचें ह्मणणें आहे असें कोणीं समजूं नये. पुष्कळ लोक विद्वान् व प्रामाणिकही असतात. पण व्यतिरेक नसल्यामुळें अन्याय होण्याचा संभव असतो. जर एखाद्या न्यायाधीशाच्या बुद्धीवर एकेश्वरमतखंडणाचें, अथवा मंडणाचें, बालविवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, जातिभेद, स्वदेशाभिमान, धंदेशिक्षणास उत्तेजन अशा वादग्रस्त विषयांवरील व्यक्तिविशेष मतांचें पडळ आलें असलें तर त्या न्यायाधीशाच्या प्रामाणिकपणानेंही अन्याय होण्याचा संभव असतो, अशीं उदाहरणें शतशः आमच्या वाचकांच्या लक्षांत येत असतील. लार्ड लिटन्कारकीर्दीवर फुलटन् खटल्याच्या दीपप्रकाशानें उजेड पडला तो जातिभेदसमजुतीमुळेंच, हें वाचकांच्या ध्यानांतून गेलें नसेल. तेथें कांहीं अप्रामाणिकपणा असेल असें वाटत नाहीं; पण त्या बाजूचा ज्ञानदिवा विझला ह्मणा किंवा त्यावर व्यक्तिमताचें पडळ तरी आलें खरें. असो. मुंबई मुक्कामीं एक

युरोपियन सिव्हिल कामगार म्युनिसिपल कमिशनर ह्मणून असतो. ही मुंबईमध्यें मोठ्या योग्यतेची जागा आहे. या हुद्यावर कोणी तरी हुशार, सिव्हिलियन, जुना, अनुभवी कामगार सरकार नेमीत असतें. प्रस्तुतकाळीं या जागेवर नांवाजलेल्या तरतरीत सिव्हिलियन त्रिपुटीपैकीं एकाची नेमणूक सरकारानें केली होती. हे कमिशनर आजपर्यंत नागपूर प्रांतीं असत. तेथें या गृहस्थांनीं बुद्धिकौशल्यानें, आंगमेहनतीनें, हातीं धरलेल्या कामाची आस्था बाळगल्यानें व साधारण गरीब लोकांच्या हिताकडे हिय्याप्रदर्शनानें मोठी लोकप्रियता संपादन केली. मुंबईंतील प्रचंड म्युनिसिपालिटीचें काम चालविण्यांत यांनीं आपले वर्तनक्रमांत कोणत्याही रीतीनें फरक पडूं दिला नाहीं. या विचित्र शहराची दागदुजी पाहण्यास अनेक कामगार या कमिशनरच्या हाताखालीं असतात, व तत्संबंधी खटाटोप सर्व त्यांच्याकडूनच होतो. विशेष अडचणीचें काम असल्यास कमिशनरच्या आज्ञेनुरूप त्या कामाची तड लागावयाची अशी वहिवाट आहे, हें सांगणें नलगे. अशाच एका प्रसंगीं सार्वजनिक कामांत सर्व तनमन अक्षयीं खर्च करणारे कमिशनर पेडर साहेब यांस तडजोड करणें प्राप्त आलें. एका घराचें गटार वारंवार तुंबून घाण होत असे, तेथें आपण स्वतः पाहण्यास गेले. त्या गटाराचे मालक हायकोर्टाचे एक वकील होते. हे वकील ह्या स्थळीं कमिशनरांसमागमें हजरच होते. पेडर साहेबांनीं कांहीं एक प्रकारचा बुद्धिवाद या वकिलांस केला, तो वकीलसाहेबांस मानवला नाहीं, व तदनुरूप आपला अभिप्राय त्यांनीं सांगितला. त्याबरोबर साहेब मजकुरांचें

पित्त खवळलें व वकीलसाहेबांस त्यावेळीं तरी खुद्द कमिशनरांचा अर्धचंद्र सहनच करणें आला. प्रतिपक्षी वकीलच ते, तशांत मुंबईचे. दुसऱ्या दिवशीं त्यानीं फौजदारी कोर्टांत कमिशनर साहेबांस ओढलें. नेटिव्ह फिर्यादी आणि नेटिव्ह न्यायाधीश. व एवढा मोठा युरोपियन् सिव्हिलियन्, तशांत फार वजनदार. या गोष्टीचा न्याय कसा होतो ह्मणून उभय पक्षांकडील लोकसमूहाचे डोळे लागले होते. तारीख नेमून प्रतिवादीस समन्स् लागलें. नेमलेल्या दिवशीं कमिशनर हजर झाले नाहींत. नाना मोरोजी उतास येणारा पुरुष नव्हे; समुद्र खरा पण वातविरहित व लाटविरहित. हीं विशेषणें शारीरदृष्टया व मानसिकदृष्टया या पुरुषास शोभतात. शरीरांत वात नव्हता तर सर्व शरीरच वात होतें. लाट नाहीं ह्मणजे पोटाला वळकटी नव्हती. समुद्रास वातानें लाट उठते पण पक्षकारांच्या अनुयायीसमूहगवगव्याच्या वावटळीनें यांच्या मानसिक समुद्रावर कधींच लाट उठत नसे. प्रतिवादी हजर नाहीं सबब दुसरी तारीख पुढें नेमली. दरम्यान एतद्देशीय वर्तमानपत्रांनीं हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत जी एकदम "कुई" केली तेणेंकरून साधारण बुद्धिरूपी उदधीस लाट आल्यावांचून राहिली नसती. कोणी ह्मणे, 'नाना मोरोजी भेकड ह्मातारा आहे, त्यानें प्रतिवादीस आणण्याकरितां पकड समन्स द्यावें होतें.' कोणी ह्मणे त्यास थोडे राहिलेले दिवस गुण्यागोविंदानें काढावयाचे आहेत, तर त्यानें न्यायवांटणीची चटणी केलीसें दिसतें. कोणी ह्मणे, यांच्या पदरीं मुलांचा परिवार मोठा आहे

आणि युरोपियन लोकांजवळ पावपडाव केल्याशिवाय कसें चालेल. अहो तो लोहपिष्ट खाऊं लावणारा न्यायाधीश ह्मणतात तो गोरगरीब काळ्या कातडीच्या लोकांना. 'हत्तीचे खायाचे दांत निराळे व दाखवायचे निराळे.' कांहीं लोकांचे तोंडावाटे तर असे अनुचित उद्गार निघाले कीं, नाना मोरोजी पेडर साहेबांस दुसरी तारीख नेमून भेटावयास गेले होते. जन त्रिविध आहे, त्याच्या तोंडास हात कोणीं लावावा? इंग्रजीमध्यें जनास शतमुखी राक्षस ह्मणतात, तो पाहिजे तिकडून खाऊं लागेल. असो. नेमलेल्या वेळीं पेडर साहेब वकील घेऊन कोर्टांत हजर झाले. वादीच्या ह्मणण्याप्रमाणें प्रतिवादीनें मानेवर हात ठेवला ह्मणून कबूल केलें पण प्रतिवादी ह्मणे, दुसऱ्या हातीं दाढी धरण्याकरितां, व वादी ह्मणे गचांडी देण्याकरितां. कोर्टापुढें ज्या गोष्टी उघडकीस आल्या त्या न्यायशास्त्रांतील 'अपराध' नियमाला सुरेख जुळूं लागल्या, तेव्हां नानांनीं मनांत किंतू न धरितां, वर्तमानपत्रें कुरकुरत होतीं त्यांचेकडे लक्ष न देतां सर्व इहलौकिकसंबंधाचा विवेक करून अपराध्यास शिक्षेचा ठराव सांगितला. १० रुपये दंड केला. कर्णोपकर्णीं मागाहून आमच्या कानीं पेडर साहेबांचे तोंडचे उद्गार आले ते असे कीं, शाबास! असे नेटिवांमध्यें माझे पाहण्यांत थोडे गृहस्थ आले. मीं नानांच्या स्थानीं असतों तर ह्या प्रसंगीं अशीच शिक्षा केली असती. थोर मनाचे लोक असतात त्यांच्या मनाची स्थिति साधारण माणसास अतर्क्य असते.

"ओपेंद्रिओटा" ह्मणून एक इंग्रजी मासिकपुस्तक

प्रसिद्ध होत असे. त्यावेळीं या मासिकपुस्तकाची इंग्रजीभाषाभिज्ञ व मर्मज्ञ लोकांमध्यें फार चहा पडून याचा कर्ता कोणी महाबुद्धिवान् व विद्वान् आहे ही गोष्ट साधारण वाचकांसही माहीत झाली होती. या मासिक पुस्तकाचें पितृत्व एका पोर्टुगीज गृहस्थांकडे होतें. या गृहस्थांविषयीं त्यांच्या लेखावरून ते फार श्रीमान्, फार उत्तम वक्ते, त्यांचें शरीर, पोषाक वगैरे बाह्यस्वरूपानें मनोवेधक, व त्यांजविषयीं सर्वच गोष्टी प्रचंड असतील, असें वाटत होतें. पण अनुभवाअंतीं अगदीं उलट ठरलें, इतकेंच नव्हे; पण इतका कुरूप सांवळा पुरुष आमच्या पाहण्यांत आला नव्हता. बोलतांना लागत असे, ह्मणूनच कीं काय, फारच मितभाषणी. स्वरूपानें सिद्यास लाज आणणारा. पोषागावरून हा कोणी पावभिसकूट विकणारा असावासा दिसे. रोज दुसऱ्या माणसाबरोबर ९ शब्द तरी बोलावयाचा त्याच्यावर प्रसंग येत असे किंवा नाहीं याचा आह्मांस वानवाच वाटतो. घरामध्यें अठरा विश्वे दरिद्रता. परिवार फार मोठा. माध्यान्हकाळीं राक्षसिणी दारांत पीठ कांडीत. यांना पेनशनाचे ४० रुपये मिळत असत. पण ते छापखानेवाल्यास देण्याची वेळ येण्याचे अगोदरच कोणी तरी सावकारास लिहून दिलेले असावयाचे. यांचा व नानांचा परम स्नेह. नानांच्या घरांत मुलांबाळांमध्यें, बायकांमध्यें, चाकरांमध्यें सिल्व्हा साहेब प्यारा असे. नानांच्या घरीं सिल्व्हा साहेबानें तासांचे तास एका कोपऱ्यांत कोठें तरी वाचीत पडलें रहावें. नानांच्या घरीं कांहीं मिष्ट पक्वान्न झालें असेल

त्या दिवशीं सिल्व्हा साहेबास पाहुणचार पहिला. असे प्रसंग फार वेळ येत असत. कधीं कधीं या सज्जन, पण निकृष्टदशेंत पडलेल्या गोंवई साहेबानें आपल्या मुलांमाणसांकरितां शिजलेलें पक्वान्नही आपल्या हातीं घरीं घेऊन जावें. इतका स्नेह होता ह्मणून या उभय विद्वज्जनांचीं खलबतें वारंवार चालत असावीं असें वाचकांच्या मनांत येईल. पण आह्मी दोन वर्षें सतत या पोर्टुगीज व्यक्तीस नानांच्या घरांत पहात असूं; तथापि, हे कोण, येथें येतात कशासाठीं, यांची योग्यता काय, वगैरे गोष्टी समजण्यास किंवा त्यांविषयीं कोणत्याही प्रकारें तर्क करण्यास कांहीं साधन मिळणें दुरापास्त होतें. सिल्व्हा साहेबाच्या वाचनांत कांहीं विलक्षण, वर्णनीय, हास्यास्पद किंवा ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट आढळल्यास, त्यानें त्या कलमावर पेन्सिलीची खूण करून नानांस पाठवून द्यावी; हा प्रकार मात्र आमच्या नजरेस वारंवार येत असे. नानांनीं वाचलेलें पुस्तक किंवा वर्तमानपत्र त्याच्या व्यक्तिविशेषखुणा करण्याच्या ढबीवरून व खुणा केलेल्या कलमाच्या महत्वावरून तेव्हांच परिचयाच्या माणसांस ओळखतां येत. त्या तैलबुद्धी स्नेहीद्वयाच्या केलेल्या खुणा एकमेकांस सहज ओळखतां येत होत्या. या उभय पुरुषांचें रहस्य नाना हायकोर्टांत बदलून आल्यापासून सुरू झालें. "ओपेद्रिओटा" मासिकपुस्तकाची वाखाणणी लोकांमध्यें बरीच होऊं लागली. गव्हरनर साहेब हें पुस्तक नियमानें वाचतात असें लोकांच्या तोंडीं ऐकूं येऊं लागलें. या पुस्तकाचा कर्ता कोण असावा याविषयीं

बहुत वाचकांस जिज्ञासा उत्पन्न झाली. आंतून बारकायीनें ठिकठिकाणीं या गौप्याविषयीं शोध सुरू झाला. याप्रमाणें या लहानशा मासिकपत्रानें वाचनलुब्ध गृहस्थांची मनें उचंबळून टाकिलीं असतां, त्या पत्रांत एक मनोवेधक लेख नानांच्या चांगुलपणाविषयीं आला. त्यांत नानांच्या बुद्धिमत्तेचें, सरळमार्गक्रमणाचें आणि सरकारानें आपल्यावर सोंपलेलें काम तनमन कडेकोट तयारीनें लावून करण्याच्या संवयीचें मूर्तिमंत चित्र उठवून दिलें होतें. एक गुण नानांमध्यें तोच सिलव्हा साहेबांमध्यें. "येन केन प्रकारेण" आपणास प्रसिद्ध करून घेण्याची यांच्यामध्यें खोड नसे. असो. हा वर सांगितलेला लेख गव्हरनरांच्या वाचनांत आला आणि त्याचा योग्य परिणामही झाला.

सर्वांस माहीतच आहे कीं, शेरीफ ह्मणजे एक सयाजीराव असतात. दुसरी कोणतीही सरकारी नौकरी करीत असतां एकाद्यास ही जागा सरकार देऊं शकतें. बहुतांशीं सरकार तरी हा हुद्दा नामांकित, विद्वान्, सज्जन, व आपली अब्रू राखण्यास पैशाच्या टंचाईमुळें अडचण पडते, त्यांसच देतें. एकाद्या मनुष्याची योग्यता तरी सरकारच्या कानीं यावी कशी? ज्याचें त्यानेंच आपलें घोडें पुढें ढकलिलें पाहिजे. लोकांमध्यें मोठमोठीं व्याख्यानें दिलीं पाहिजेत. बड्या लोकांच्या पुढें पुढें नाचलें पाहिजे. जनसमूहांतील मोठेपणा ह्मणजे केवळ भोरप्याचा खेळ आहे. त्यानें जर आपलें आपण ढोलकें वाजविलें नाहीं तर त्याचा खेळ व जें कांहीं असेल तें

कसब पहावयास कोण जमतो. रत्नागिरी जिल्ह्यांतील वृद्धकपि शास्त्रीबावा एका खेडेगांवामध्यें कोंपऱ्यांत पडले होते. हें उकिरड्यांतलें रत्न हिंदुस्थानसरकारचे कायदे करणाऱ्या मंडळींतील सभासद रावसाहेब मंडलिक यांच्या नजरेस पडलें ह्मणून त्यास उपयोगीं पडून त्यांच्या विद्वत्तेची दोरी धरून त्यांनीं बाहेर काढलें, आणि महामहोपाध्याय करविलें. पण आपणच आपल्या गुणप्रदर्शनाचा यत्न करण्यास व आपल्या गुण-बाहुल्याची दवंडी पिटण्यास नाना परांगमुखता दाखवीत असत. गव्हरनराच्या घरीं कोणत्याही समारंभास आमंत्रणचिटी आली असतां नानांनीं जाण्याविषयीं कांकू करावें असा ज्या पुरुषाचा एकांतवासी स्वभाव त्याच्या नांवास सरकाराकडून २६ अक्षरांपैकीं कांहीं तरी जोडण्यास कशीं मिळणार? एकदां नानांच्या गुणांचें यथायोग्य वर्णन 'ओपेंद्रीओटा' मध्यें झालें, तें सरकारच्या नजरेस येऊन गेलें आणि लागलीच शेरीफाची जागा नानांस मिळाली. कोंदणांत बसविलेला कांचेचा खडा जितका चमकतो, तितका हिरा कचऱ्यांत पडला असला तर चमकणार नाहीं, इतकेंच नव्हे पण त्याच्या हिरेपणाविषयींही लोक शंका घेऊं लागतात. कित्येक गृहस्थ नानांच्या विद्वत्तेविषयीं साशंकपणें प्रश्न करतांना आमच्या ऐकण्यांत आहे. पण मुंबईतील फार जुने, अनुभवी युरोपियन बारिस्टर आट्किन्सन् हे आपल्या एका स्नेह्यापाशीं बोलत असतां ह्मणाले कीं, दहा बारिस्टरचें

ज्ञान एके ठिकाणीं केलें तरी नानांच्या कायदेकानूपारंगतेबरोबर होणार नाहीं.

फौजदारी न्यायाधीशाचें काम मुंबई शहरीं याप्रमाणें अव्याहत श्रमानें चाललें असतां आजपर्यंत रजा ह्मणून कशी ती ज्या गृहस्थाच्या नौकरींत माहीत नाहीं, त्यांना हळू हळू आजारी सबबेनें घरीं बसून राहणें भाग पडलें. कर्माची गति मोठी गहन आहे. या दुखण्यांतून या पुरुषाचे पुन्हा जमिनीस पाय लागतील अशी आशाच नव्हती. आधींच शौचाचा अवरोध, आणि तज्जन्य आम वेळोंवेळीं होण्याची यांना खोडच होती, तीच विकोपास गेली. साधारण औषधोपचारानें आटपेना. नानांस गुण पडेना. एक आठवडा गेला, दोन गेले, दिवसेंदिवस रोग जरी दुणावत नव्हता, तरी अन्न तुटल्यामुळें अशक्तता दिवसेंदिवस अधिक भासत चालली होती, ह्मणून वैद्यासही अंतर्यामीं खास भरंवसा वाटेना. बरेच आठवडेपर्यंत नानांचें जीवन पेज होतें. आपण आपला मृत्युलेख करावा असें नानांच्याही मनांत येऊं लागलें, व तत्संबंधी कांहीं प्रकारची जवळच्या लोकांनीं खटपटही केली. पण सुदैवानें त्यांची खटपट फुकट गेली. या दुखण्यामध्यें वैद्याची मदत मुंबईसारख्या शहरांत मिळण्याची अडचण पडेल अशी धास्तीच नको, परंतु यासंबंधानें एक विशेष आनंदाची गोष्ट घडली; ती गाळल्यास अन्याय होईल. डाक्टर अण्णा मोरेश्वर कुंटे यांनीं या प्रसंगीं आंग मोडून व घस सोसून मेहनत केली. नाना बरे होऊन काम पाहूं लागतपर्यंत

अण्णा ह्या रोग्याच्याच खोलींत रात्रंदिवस राहत असत. रोग्याचें खाणेंपिणें औषधपाणी अण्णा प्रत्यक्ष पाहिल्यावांचून जाऊं देत नसत. हें काम नानांच्या चाकरांवर तर नाहींच, पण नानांच्या खुद्द मुलांमुलींवर किंवा बायकोवर ही कुंटे यांनीं सोंपविलें नाहीं. याचें कारण डा० कुंटे विद्यार्थी होते तेव्हांपासून या उभयतांचा स्नेह जमला होता. डा० कुंटे यांच्याशीं ज्या ज्या लोकांचा कोणत्याही कारणावरून संबंध आला असेल त्यांचें मन अंतर्यामीं तरी कबूल करील कीं, अण्णांचा स्वभाव जरा त्यांच्या धंद्याच्या मानानें तिखट, हूड आणि तडतडीत आहे. असा स्वभाव असणें हें अण्णांच्या तीव्र बुद्धीस व विद्याव्यासंगास योग्यच आहे. असा स्वभाव कां बनला याचीं मूळ कारणें काय वगैरे गोष्टींचें विवरण करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि या अलौकिक पुरुषाविषयीं यांच्या धंद्यासंबंधीं आह्मांस एक असें वाटतें कीं, डा० कुंटे यांच्या अंगीं तीव्र बुद्धि, रोगाची तत्क्षणीं खरी परीक्षा करण्याचें सामर्थ्य, इंग्रजी व संस्कृत अर्वाचीन व प्राचीन मूळवैद्यकावरील ग्रंथांचें प्रचंड अवलोकन, योग्य औषधोपचाराची योजना, प्रसंगविशेषीं ती योजना करण्यांत धाडस, हे अलौकिक गुण यांच्यामध्यें आहेत, त्यापेक्षां कमी असते तर साधारण बुद्धीच्या वैद्यांइतकाही यांचा धंदा चालता किंवा नाहीं याचा वानवाच होता. या पूर्वोक्त ढळढळीत गुणांचें अण्णांच्या तडतडीत स्वभावावर झांकण पडतें. अण्णांचा स्वभाव जर मिठ्ठा गोड असता तर दुधांत खडीसाखर पडून डा० कुंटे ह्मणजे

फारच बहुमोलाचें अलभ्य पक्वान्न बनले असते. " भट आहे तों तीथ नाहीं नि तीथ आहे तों भट नाहीं." असें असल्यामुळें हें रत्न गरीबाच्याही वांट्यास कधीं कधीं येत असतें. या स्वभावास सगळ्या फारमाकोपियामध्यें औषध सांपडत नसतें, ह्मणून श्रीमंतास फार कष्टानें व खर्चानें अण्णा लाभत नाहींत असें वारंवार घडत असतें, पण गरीबाच्या घरीं केव्हां केव्हां अण्णा फीशिवाय जातांना आमच्या पाहण्यांत आलें आहे.

अण्णांचा कडक स्वभाव नानांच्या घरांतील सर्व माणसांस माहीत असल्यामुळें या डाक्टरांच्या आज्ञेशिवाय नानांच्या खोलींत कोणी जाण्यास धजत नसे. नानांच्या समाचारास कोणी आल्यास नानांची स्वतः भेट घेऊं न देतां बाहेरच्या बाहेर डाक्टरांनींच त्यांची वारासार करावी. रोग्यास भेटून बोलण्याचेंही श्रम त्यांस न व्हावे ह्मणून या वैद्यराजांनीं स्वतः तजवीज राखिली होती. अण्णांच्या हातास यश आलें.

तदनंतर अण्णांच्या वैद्यक्रियेविषयीं नानांचा असा दृढ ग्रह होऊन बसला होता कीं, अशाच आणीबाणीच्या प्रसंगीं मोठमोठ्या नामांकित युरोपियन किंवा एतद्देशीय वैद्यांचे अभिप्राय अण्णांच्या पुढें पासंगास देखील पुरत नसत. आणखी एका अशाच प्रसंगीं अण्णांनीं नानांच्या घरांत अंतःकरणपूर्वक मेहनत केली, तिचा उल्लेख योग्य स्थळीं यथामार्गानें होईल. अण्णांनीं एक वेळ रोग्यास पाहून दुसऱ्या कोणत्याही वेळीं त्याच रोगाबद्दल अण्णांस आमंत्रण झालें आणि अण्णांनीं येण्यास कांहीं सबब ला-

विली कीं नानांनीं कित्येक वेळ बोलून दाखवावें कीं अण्णा ह्मणतात, मुसळाला अंकूर येतील या आशेनें पाणी घालावयास मींच कशास आलें पाहिजे?

नेटिव लोकांना युरोपियन लोकांचा फौजदारी कामांत न्याय करण्यास अधिकार नाहीं. पण इलाख्यांतील मुख्य शहरांमध्यें हा नियम लागू नाहीं. तरी आजपर्यंतची वहिवाट अशी आहे कीं, या मुख्य शहरांतील जे माजिस्ट्रेट असतील त्यांमध्यें मुख्य माजिस्ट्रेटाची जागा युरोपियन बारिस्टरास द्यावी, नेटिवास देऊं नये. एकदां मुख्य माजिस्ट्रेट कांहीं महिने रजेवर गेले, तेव्हां त्यांच्या जाग्यावर दुसऱ्या नंबराच्या माजिस्ट्रेटाची नेमणूक झाली. नाना मोरोजींचा नंबर तिसरा होता. युरोपियन लोकांना तें आवडलें नाहीं. हायकोर्टांतील मुख्य न्यायाधीश सर मायकेल वेस्ट्राप यांनीं त्या नेमणुकीच्या उलट सरकारास एक खरमरीत लेख लिहिला, त्याचा सर्व गोषवारा येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. तथापि नानांच्या संबंधानें एक अनपेक्षित गोष्ट त्यामध्यें सहज आली, तिच्यावरून नानांची योग्यता फार थोड्या लोकांच्या लक्षांत येत असे असें वाटतें. हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश वृद्ध अनुभवी कपि ह्मणतात कीं, मुंबईसारख्या राजधानीच्या शहरांत फौजदारी काम चालविणाऱ्या न्यायाधीशांमध्यें मुख्य जागा युरोपियनासच असावी अशी फार दिवसांची वहिवाट आहे व ती योग्य आहे. ही जागा एतद्देशीय गृहस्थास दिल्यापासून न्यायाच्या कामांत फार अडचणी येतील, व त्या दूर

करण्याकरितां हायकोर्टास आंत हात फार वेळ घालणें भाग पडेल. सरकारच्या मतें थोडे दिवस बदलीची जागा आहे, तर अशी व्यवस्था केली तरी फारशी हरकत येणार नाहीं. परंतु ज्यापेक्षां इलाख्यांतील सर्व प्रकारच्या न्यायांवर हायकोर्टाची देखरेख कायद्यानें ठेविली आहे, तस्मात् आमच्या अनुभवावरून आह्मी स्पष्ट व निखालसपणानें सांगतों कीं, जर थोडे दिवसांच्या व्यवस्थेकरितां नेटिवाशिवाय सरकाराच्यानें ही जागा कोणास देतां येत नाहीं, तर तिसरे माजिस्ट्रेट नाना मोरोजी यांस देणें, त्यांच्या विद्वत्तेवरून, न्यायकुशाग्रतेवरून, शांतपणावरून तरी योग्य आहे. प्रस्तुत नेमणूक आह्मांस बिलकूल पसंत नाहीं.

पुढें कांहीं दिवसांनीं नानांच्या वयास पंचावन वर्षें भरलीं. सरकारानें नानांस पेनशन द्या अशी सूचना केली. नानांनीं एक वर्षाची मुदत मागितली. मुंबईचे पोलीसकमिशनर सर सौटर हे गव्हरनरांच्या भेटीस गेले असतां, नानांच्या पेनशनाविषयीं गोष्ट निघाली. सौटर साहेब ह्मणतात, आज नाना मोरोजींनीं काम करावयाचें सोडलें तर, आह्मां पोलिसांस जड पडेल. मुंबईच्या बदफैली, चोर, लबाड, लुच्चे, उचले, जुगारीलोकांस नाना मोरोजींचा मोठा दरारा व धाक आहे. नानांनीं पेनशन घेतलें ही बातमी फोकलली कीं या लोकांची पंढरी पिकली व आह्मां पोलिसांची मदत कमी झाल्यामुळें आह्मांस अशा वाईट लोकांच्या हात धुऊन पाठीस लागलें पाहिजे. याप्रमाणें गव्हरनरांच्या कानीं गोष्ट

जातांच नाना एक एक ह्मणतां ह्मणतां ३ वर्षें अधिक **दुर्दैवानें** नौकरीवर राहिले.

या संसाराला सागराची उपमा पूर्वजांनीं दिली आहे ती यथायोग्य आहे. दोहोंला भरतीओहोटी असते. पाणी तरी एकदम फार वाढलें अथवा फार कमी झालें तर पाहणारासही धक्का देतें. नानांचें वैभव, संतति व संपत्ति पाहिली ह्मणजे संतोष वाटे. ३९ वर्षें सरकारची निष्कलंक नौकरी केली तिचेकडे मागें पाहिलें ह्मणजे लोकांस एक प्रकारचा आचंबा वाटावा. नानांसही स्वतः अंतर्यामीं एक प्रकारचा संतोष वाटत असलाच पाहिजे. मनुष्य एकदां आशाबद्ध झाला, ह्मणजे तत्पुष्टिकरणार्थंच सर्व विचार खरे वाटूं लागतात. यांना दुर्दैवानें मिळेल तितकी मुदत मागून चाकरीच करीत रहावें अशी बुद्धि आठवली, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. चीन देशामध्यें एक मनुष्य लहान असतां तुरुंगांत पडला तो चिंव्हान राजाच्या वेळीं सुटण्याची पाळी सुदैवानें अथवा दुर्दैवानें आली. बंधमुक्त होतांच तो कैदी राजापाशीं जाऊन विनंति करतोः—राजा! मी काळ्याचा पांढरा तुरुंगांत झालों. माझ्या ८० वर्षांपैकीं ६० वर्षांहून अधिक कारागृहांत गेलीं, तर मला आतां सुख व्हावें ह्मणून सोडला असशील, पण मला अंधारकोठडीखेरीज अन्यत्र सुखोत्पत्ति होत नाहीं, ह्मणून कृपा करून मला पूर्वस्थळीं ठेवावें. पुराणांतर्गत एका महर्षीस त्रिकाळज्ञानानें आपल्यास पुढील जन्म डुकराचा मिळणार असें समजलें. त्यावरून त्यानें आपल्या शिष्य-

वर्गास आज्ञा केली कीं, माझ्या मरणानंतर अमुक ठिकाणीं एका डुकरीस मोरें पोर होईल तो मी ह्मणून तें पोर तत्क्षणींच मारून टाकावें. गुरूच्या आज्ञेप्रमाणें योग्य वेळीं त्या पोराचा शोध लावून शिष्यवर्ग मारण्यास प्रवृत्त झाले, तों त्या अर्भकग्रामपशूस वाचा फुटून तो ह्मणतो कीं, पूर्वजन्मार्जित स्थितीपेक्षां प्रस्तुत अवस्था अधिक सुखप्रद आहे तर मला मारूं नये. ३६ वर्षें ज्या स्थितींत गेलीं, तीच स्थिति गोड वाटूं लागली.

---

## भाग ११.

## लीलबाईचा खटला.

अशा भूषणप्रद नौकरीच्या शेवटल्या वर्षांत एके दिवशीं ज्याप्रमाणें कलीनें नळाच्या घरांत प्रवेश करावयास अति क्षुल्लक मार्ग साधला त्याप्रमाणेंच ह्मणा, एक वृद्ध गुजराथी भाट्यानें वार्धक्यांत एका युवतीशीं विवाह केला, व तज्जन्य संकटें एकामागून एक कोसळून त्रस्त होऊन माजिस्ट्रेटाकडे दाद मागण्यास नानांच्या कोर्टांत आला, त्यास नानांनीं रीतीप्रमाणें आश्रय दिला, पण त्याच्यावर काळाचा पूर्ण अंमल बसला होता; तो सांसर्गिक रोगाप्रमाणें नानांसही भोंवला.

ज्या या खटल्याच्या निवाड्यावरून ३९ वर्षें नेकीनें सरकारची नौकरी केलेला, मोठा विद्वान्, नांवाजलेला, निःपक्षपाती न्यायाधीश, प्रत्येक वरिष्ठ अंमलदारानें न्यायनैपुण्यामध्यें शिफारस केलेला, वेळोवेळीं सरकारानेंही शाबासक्या व मेहनतीनें मोठमोठीं बिकट कामें केल्या-

बद्दल बक्षिसें दिलेला कामगार एवढ्यावरून इतःपर सरकारच्या मतें अयोग्य ठरला. त्या खटल्याच्या न्यायपीठापुढें आला तसाच गोषवारा देणें वाचकांस अप्रासंगिक वाटणार नाहीं.

सन १८७९ त जुलै महिन्याच्या २९ तारखेस दुष्ट वेळीं निघून नाना मोरोजींच्या पुढें प्रागजीनें शपथेवर लेखी फिर्याद आपल्या बायकोवर व सासवेवर केली. २७०९ रुपयांचे दागिने व कपडे माझ्या घरांतील माझ्या बायकोनें चोरले व सासवेनें तो माल समजून उमजून ठेवून घेतला व माझ्या लग्नाच्या बायकोस कुकर्मास प्रवृत्त करण्याकरितां घरांतून बाहेर काढिली. त्या अर्जामध्यें प्रागजीनें आपल्या बायकोस व सासवेस पकडण्याकरितां व त्या मालाचा शोध लावण्याकरितां वारंटही मागितलें होतें. पुढें ही फिर्यादीची बायको हें पाहून न्यायाधीशानें तिला पकडण्याकरितां वारंट दिलें नाहीं; पण मालाच्या शोधार्थ आणि सासवेस पकडून आणण्याचें वारंट दिलें. दुसऱ्या दिवशीं लीलबाई व बराच माल कोर्टापुढें पकडून आणला व फिर्यादीनें प्रतिवादी व आपला माल ओळखला. २९ तारखेस प्रतिवादीचा जामीन घेऊन न्यायाधीश सोडण्यास कबूल, पण ती बया कोणता व केवढाही जामीन देण्यास कबूल होईना. खटल्याची तारीख आगष्ट ७ नेमली. सदरील नेमलेल्या दिवशीं उभयपक्षांच्या मतें खटला आपसांत मिटवावा असें ठरलें. लीलबाईनें सांगितलें कीं, तसें न झाल्यास आपली वकील करण्याची मर्जी आहे.

ह्मणून आगष्ट ११ तारीख नेमली. ह्या दिवशीं लील-
बाईच्या वतीनें वकील उभा राहून त्यानें मुदत मागितली.
ही मुदत उभयपक्षांस कबूल होती ह्मणून आगष्ट २८
नेमली गेली. या नेमल्या दिवशीं वादीची तपासणी व
उलट तपासणी झाली, व पुढील तारीख ६ सप्टंबर
नेमली. याचें कारण बहुधा लीलबाईच्या वकिलाची
बायको आजारी पडली ह्मणून त्याची विनंति ऐकणें को-
र्टास जरूर वाटलें. फिर्यादीची तपासणी या दिवशीं
झाली, व एका नव्या साक्षीदाराची जबानी घेतली.
या साक्षीनें अर्जदाराची चोरीची हकीकत खरावली, व
खटला १८ सप्टंबरावर टाकला. १८ वे तारखेस पू-
र्वीचा साक्षी पुरा करून आणखी एक उमरसी तेजा याची
जबानी अंशतः झाली. इतक्यांत लीलबाईवरील चो-
रीचा आरोप प्रायः आळ आहे असें न्यायाधीशास वाटूं
लागलें, ह्मणून लीलबाईस नामधारी जामीन घेऊन सो-
डून दिली. फक्त लेखानें मात्र तिला बांधून घेतलें.
आतां खटल्याची तहकुबी २६ सप्टंबरवर झाली. इतः-
पर कोर्टाच्या व पक्षकाराच्या सोईप्रमाणें खटला चाल-
वून ता० १२ नवंबर या शेवटल्या दिवशीं लीलबाईस
दोषमुक्त ठरवून सोडून दिली. वारंटानें पकडून आ-
लेला माल कोर्टांत ठेवून घेतला कीं, एक महिन्याच्या
आंत लीलबाईनें दिवाणी कोर्टांत तो माल आपलासा
ठरवून घ्यावा—नाहीं तर महिन्याचे अखेरीस वादीस
दिला जाईल.

लीलबाईविषयीं थोडका वृत्तांत कोर्टापुढें उघड-

कीस आला तो वाचकांस समजणें जरूर आहे, ह्मणजे वरील ठरावाच्या न्यायान्यायाचा निर्णय करण्यास वाचकांस सोईवार पडेल. लीलबाईची मुलगी पुरी १६–१७ वर्षांची, नवरा मोलमजुरी करून पोटास मिळविणारा व तोही वृद्धांत मोडला जात असे. रोज ३–४ आणे उत्पन्न होत असतील किंवा नाहीं याचा वानवाच होता. तिचा जांवई मद्रास इलाख्यांतील राहणारा, व्यापारी व वयानें सुमारें ६७ वर्षांचा, पण चांगला पैसेवाला. हा गृहस्थ पुत्रेच्छेमुळेंच केवळ लग्नाच्या मोहांत पडला असावा असें दिसतें. लीलबाई व पुरी यांचा कोर्टापुढें बराच दुर्लौकिक आला होता. वारंट बजावणीच्या वेळीं लीलबाईनें युरोपियन पोलिसास ज्या शिव्या हांसडल्या त्या सन्मार्गवर्ती माणसांस कानांनीं देखील ऐकवणार नाहींत. यामुळें सार्वजनिक काम तडीस नेण्याकरितां त्या पोलीसइन्स्पेक्टरांस आंगजोरानें त्या कैकयीस अडकवून ठेवणें भाग पडलें. त्याचप्रमाणें त्या वेसवेचें तोंड कोर्टामध्यें तरी बंद करण्यासाठीं न्यायाधीशास थोडा दंड करणें जरूर वाटलें. "कोळसा उगाळावा तितका काळा" ह्मणून अब्रूदार हिंदु होतां होईल तोंपर्यंत स्वतःचे बायकोवर कोणत्याही कारणावरून न्यायकोर्टांत फिर्याद करावयास जाणार नाहीं. वित्ताचा नाश होऊन अब्रू बचावते आहे तर कोर्ट नको, पण दोहोंचा जर ऱ्हास होऊं पाहतो आहे तर मात्र कोर्टाजवळ दाद मागण्यास नवरा किंवा बायको येते. पण अशा गोष्टी वारंवार घडत नाहींत, लाखांत एखादी. यूरोपस्थ लोकांमध्यें अशा

प्रकारचा समज नसावा असा कोर्टांतून जे अनेक खटले येतात त्यांवरून तर्क होतो. व्यभिचार, मारहाण, वगैरे सबबींवरून श्रीमान् व प्रतिष्ठित परद्वीपस्थांचे फार खटले कोर्टांत आढळतात. हा प्रकार कुलीन उंच वर्गामध्यें हिंदु लोकांत आढळत नाहीं, ही गोष्ट सुद्धां फार थोड्या युरोपियन लोकांस कळते. कोर्टापुढें हिंदूचे खटले आले तरी अति घाणेरडे प्रकार प्रसिद्धीस येतात त्यांहून शतपट पाश्चिमात्यांमध्यें बाहेर येतात. तर हा सारा समजुतीचा फरक आहे. निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें सौंदर्याच्या समजुतीमध्यें फरक आढळतो. कोणास वाटतें, स्त्रीची कटी व पाय बारीक असले ह्मणजे ती सुंदर, कोणी ह्मणतो कपाळ रुंद पाहिजे, कोणी ह्मणतात पोट लांब असावें, कोणास केश लांब आवडतात. मिळून समजुतीचा फरक. त्याचप्रमाणें अब्रू बेअब्रूचा फरक आहे. तो फरक यथास्थित समजला पाहिजे, तरच त्या न्यायाधीशाच्या हातून योग्य न्याय होईल असें समजावें. नाहीं तर हिंदु नवराबायकोचा तंटा आणि युरोपस्थ जोडप्यांच्या समजान्वयें त्यांचा न्याय, ह्मणजे तो अन्यायच असें ह्मणण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? असो.

बदफैली माणसांचे स्नेही दुर्व्यसनी, कुत्सितबुद्धीचे असावयाचे. त्यांच्याकडून सुविचार व सद्वर्तन कोणास प्राप्त होणार! लीलबाईच्या अनुयायांनीं तिला सल्ला दिला कीं, प्रागजीनें खोटी फिर्याद केल्याबद्दल दावा आणावा. त्याप्रमाणें हायकोर्टांतील नामदार मारीएट नांवाच्या न्यायाधीशापुढें हा खटला आला. हा खटला किरकोळी

कामाप्रमाणें चालवून तोंडानेंच नानांस यांनीं दोष दिला. एवढ्या मोठ्या, फार दिवस अनुभवलेल्या माजिस्ट्रेटास दोषी ठरविणें योग्य वाटलें तर, अशा उंच कोर्टाच्या पापभीरू न्यायमूर्ति मारीएटानें केवळ वाग्दंडानें आपल्या हाताखालच्या माजिस्ट्रेटास मारावयाचें नव्हतें. ३९ वर्षांचा नांवाजलेला नोकर मारणेंच सार्वजनिक न्यायपुष्टिकरणार्थ योग्य होतें तर, त्याच्या गैरवर्तनाचें आपल्या हातानें हुबेहुब सुरेख सकारण वर्णन लेखानें करावयाचें होतें. मारीएट साहेबांच्या मुखांतील मुक्ताफळांना शक्त्यनुसार तिखटमीठ लावून "मुंबई ग्याझेटांत" नानांवर मारीएट साहेबांनीं हाणलेली कुऱ्हाड प्रसिद्ध झाली. ती सरकारच्या नजरेस येऊन गानसाहेब सरकारचे मुख्य सेक्रटतार (यांची नानांवर पुण्याच्या कारकीर्दीपासून पूर्वापार वक्रदृष्टि असे) यांजकडून या खटल्याबद्दल नानांचें ह्मणणें काय आहे त्याची मागणी झाली.

सरकारानें नानांचे मुकदम्यास आक्षेप काढले ते येणेंप्रमाणें:—

१ नऊ महिन्यांमागें गोष्ट घडली असल्यामुळें फौजदारी कोर्टांत खटला घेणें रास्त नव्हतें. याची चौकशी दिवाणी कोर्टांत झाली पाहिजे होती. बायकोमनुष्यास वारंटावर कोर्टांत माजिस्ट्रेटानें आणावयाची नव्हती.

२ आपण चौकशी करण्याचें ठरविल्यावर तरी होईल तितका लौकर निकाल करावयाचा होता व इतक्या मुदतीमध्यें फक्त ६ साक्षींची तपासणी झाली.

३ माल सांपडला होता तर आरोपीचा जामीन घेण्याचें कांहीं कारण दिसत नव्हतें.

४ चौकशी लांबणीवर टाकण्याचीं कारणें सरकारास योग्य वाटत नाहींत.

५ चोरीचा माल जाणूनबुजून ठेवल्याचा आरोप शाबीत होत नाहीं असें ठरविणें व आरोपीच्या जवळ सांपडलेला माल अडकवून ठेवून शेवटीं फिर्यादीच्या स्वाधीन करणें या दोन गोष्टींची एकवाक्यता होऊन मेळ बसत नाहीं.

## यांजवर नानांचीं उत्तरें.

१ फौजदारी खटल्याच्या संबंधीं मुदतीचा विचार मुळींच नाहीं, हें कायद्याचें तत्व जो नाकबूल करतो, त्यानें विस्तवावर हात ठेवला तरी भाजत नाहीं, असें ह्मटलें तर मूग खाऊन ऐकून घेतलें पाहिजे.

२ कोणत्याही खटल्याची चौकशी अमुकच मुदतींत संपली पाहिजे असें कोणत्याही कायद्याचें तत्व नाहीं, व तसें करावयास त्याला सांगावें ह्मणजे तूं डोकीनें चालत जा असें सांगणें नव्हे काय?

३ माल सांपडला तरी अपराध्यास शासन नको काय? मग माल सांपडल्याशीं जामीन घेण्या न घेण्याचा काय संबंध बरें? आणि तो तरी सर्व माल सांपडलासा कशावरून?

४ प्रत्येक माणसाचें वाटणें निरनिराळें नाहीं काय?

५ संशयात्मक वर्तनाच्या भिकारी मनुष्याजवळ ऐपती-

पेक्षां फारच जास्त माल सांपडला तर त्याची फौजदारी न्याया-धीशानें दिवाणी कोर्टाकडून निवाडे करून मागूं नये? तर?

असो कायद्याची ज्यास थोडीबहुत माहिती आहे त्या-पाशीं जर या वरील गोष्टीविषयीं वाच्यता करूं लागलों तर तो आह्मांस वेड्यांत काढील, कारण, हातच्या कांकणास आरसा कशास पाहिजे? तर मग असल्या अजागळ मुद्यावर ३९ वर्षें तेंच काम केलेल्या निर्लेप कामदाराला सरकारानें दोष लावला हें कसें, असा वाचकांस साहजिक प्रश्न उद्भवेल. तर आठव्या हेन्रीनें आपल्या मर्जींतल्या कार्डिनल वुलसीची काय दशा केली? पेशव्यांच्या वेळीं हरीपंत फडक्याची काय वाट लागली? ज्या वारन् हेस्टिंग्सनें 'यावत्चंद्रदिवाकरौ' इं-ग्रज लोकांचें कोटकल्याण केलें, त्याचे सरकारानें कसे धिं-डवडे नाचविले? ती हकीगत वाचकांस सांगणें नलगे. या प्रकारचीं इतिहासांतर्गत अनेक उदाहरणें आढळतात. "राजासी जो स्नेही ह्मणे तो एक पढत मूर्ख" या सा-धुवाक्याचा तरी भावार्थ अशा प्रकरचाच आहे. इरा-णच्या सायरस राजानें सोलन तत्ववेत्त्याची गांठ घेतली त्यावेळीं त्या तत्वज्ञान्यानें सायरसची गणना सुखी माण-सांमध्यें केली नाहीं, ह्मणून राजास फार आश्चर्य वाटून मी सुखी नाहीं का? असा प्रश्न केला. मरणाआधीं कोणास सुखी ह्मणतां येत नाहीं असें मुनीकडून उत्तर मिळालें, तें नानांकडे पाहिलें ह्मणजे अक्षरशः खरें वाटतें. हीं सर्व समाधानीचीं कारणें झालीं, पण आह्मांस एक मुख्य कारण वाटतें तें वाचकांस कसें वाटतें तें पाहूं.

नानांचे द्वितीय चिरंजीव विलायतेहून बारिस्टरची परीक्षा पास होऊन आले होते. त्यांनीं मुंबईच्या मुंबईंतच काम करण्याचा विचार केला व कांहीं दिवस काम चाललें. हायकोर्ट, माजिस्ट्रेट कोर्ट व सालकाजकोर्ट इतक्या ठिकाणीं सदाशीव नानांचें काम चालत असे. त्यांत कांहीं खटले नानांपुढेंही असत. कांहीं दिवसांनीं मुख्य माजिस्ट्रेटानें नानांस एकांतीं बाप न्यायाधीशापुढें मुलानें वकिली करणें अप्रशस्त, अशा प्रकारचें बोलणें स्नेहसंबंधानें केलें. घरीं आल्यावर बापानें ती हकीकत मुलाच्या कानीं घातली. मुलानें इंग्लंडांतील कांहीं उदाहरणें व खुद्द मुंबई हायकोर्टांतील कांहीं उदाहरणें नानांस काढून दाखविलीं आणि ह्मणाला, इंग्रजी न्यायपीठांत आणखी अशीं उदाहरणें अनेक सांपडतील, मग तुह्मी माझ्या धंद्याच्या आड कां येतां?

नाना—दादा, आड येतों असें नाहीं. "जन त्रिविध आहे" ते हजार तोंडांनीं बोलणार. त्यांच्या तोंडास हात कोणीं लावावा! लोक पाहिजे तें बोलतील.

दादा—नाना! मी तरी तेंच ह्मणतों. उद्यां मीं आपल्यापुढें काम घेण्याचें बंद केलें ह्मणजे लोक त्याप्रकारें नाहीं का चर्चा करूं लागणार! ह्मणतील एवढे हे विलायतेहून पांच सहा वर्षें न्यायीलोकांचा सहवास करून पोक्त दशा पावले ते असेच का? त्यांना त्यांचेच हक्क कोणते आहेत तेही कळत नाहींत? मग ते लोकांचा पक्ष धरून काय ध्वज लावणार? आणि खरेंच, माझा मीच आपल्या कोर्टांत आलों नाहीं तर ठीकच. नाहीं तर आपण

मला कोणत्या कोणत्या आधारांवर बंद करूं शकाल कोण जाणे. हायकोर्टांत तरी मला बापापुढें काम करूं नको ह्मणून सांगून माझी मानहानि करील काय? तसेंच झालें तर मग मी आहें आणि हायकोर्ट आहे, पाहून घेऊं. निदान आतां मला अशा प्रकारचा कांहीं हुकूम मिळेपर्यंत मी येणें बंद करीत नाहीं.

ना०—दादा, तूं इतका चिडूं नको. तूं 'इंग्लिश बार' चीं सर्व उदाहरणें दाखवितोस तीं सर्व गोऱ्या कातडीच्या लोकांचीं आहेत. काळया लोकांची गोष्ट निराळी.

दा०—निराळी निराळी ती कशी? Do you mean they are so base? Pardon me good papa, if I entirely differ from you. English nation is honest and just. (काय ते इतके अधम आहेत? नाना! क्षमा करा. माझा अभिप्राय अगदीं याच्या उलट आहे. इंग्रजलोक प्रामाणिक व न्यायी आहेत.)

बापलेंकांचा हा संवाद झाल्यानंतर कांहीं काळानें सदरील मेरीएटन्यायाचा प्रकाश पडला. आणि शेवटीं सरकारानें नानांस ताबडतोब पेनशन घेण्यास सांगितलें. नानांस पेनशन दिलें पण त्यामध्यें 'एका दगडानें दोन आंबे पाडले.' नानांनीं रिकामी केलेली माजिस्ट्रेटाची जागा रायनसाहेबांस देतां आली. ही जागा हातीं पडण्यापूर्वीं रायनसाहेब नानांवर डोळा ठेवलेल्या गॉनसाहेबांचे हाताखालीं फार दिवस अगदीं संनिध काम करीत असत.

पेनशन सन १८८० सालांत चालू झालें, ह्मणजे नानांचें उत्पन्न निमे कमी झालें. अफाट कुटुंबाचा कि-

त्येक दिवस चाललेला खर्च एकाएकीं कमी करणें जरा अवघड पडलें. तथापि खर्च कमी करणें हें पहिलें काम नानांनीं मनांत आणून ताबडतोब तडीस नेलें. दोन गाड्यांतून एक ठेवली. कांहीं चाकर कमी केले. कांहीं मास्तरांचें काम आपणच करूं लागले. मुंबईंतील पाठारे परभूज्ञातींतील साधारणतः लोक फार खर्चिक व बहुतेक लोक श्रीमंती थाटानें वागणारे. कितीएक ठिकाणीं तर "श्रीमंती हवा नि सनकांड्यांचा दिवा" अशी स्थिति असते, पण नानांचें अगदीं कोंकणस्थी वाण्याचें वर्तन असे. १० वर्षांचे जुने आंगरखे व पायांतील बूट हे वापरतों असे प्रसंगवशांत त्यांचे स्वतःचे तोंडचे शब्द आमच्या कानीं आलेले आह्मांस आठवतात. व कोंपरावर फाटल्या ठिकाणीं सद्र्यास ठिगळ्या मारून सदरे आह्मीं त्यांच्या आंगांत प्रत्यक्ष पाहिले आहेत. नाना भोजन करून उठल्यानंतर पाहिले तर त्यांचें ताट धुतल्यासारखें निर्मळ असे; बहुतकरून पानावर पदार्थ घेऊन टाकला असें त्यांस आठवत नाहीं असें ते वारंवार ह्मणत. हे गृहस्थ मितव्ययी, मिताहारी व मितभाषणी, नियमित वर्तनाचे, तथापि अमितविचारी पुरुष होते.

---

## भाग १२.

## पेनशन घेतल्यावरचा नित्यक्रम.

सर मंगळदास नथुभाई यांचे एक चिरंजीव वयांत आल्यावर कांहीं कारणावरून बापलेकांमध्यें एक असा प्रश्न निघाला कीं, बापाच्या हयातींत वडिलोपार्जित म-

त्तेचा हिस्सा मुलास मिळावा किंवा नाहीं व तो मिळाल्यास किती? आणि अल्प संपत्ति वडिलोपार्जित असून, तिच्यावर मुलानें आणखी शतपट संपादन केली तर ती मुलाची स्वसंपादित संपत्ति ह्मणावी किंवा वडिलोपार्जित समजावी? अशा प्रकारचे कांहीं प्रश्न निघून, त्यांचा निकाल करून घेण्याकरितां स्थानिक हायकोर्टांत जावें लागलें.

श्रीमंत रा. रा. सर मंगळदास हे स्वकष्टानें व स्वाक्कलहुशारीनें अल्प संपत्तीचें साह्य घेऊन राजे होऊन बसले. हा पुरुष खोल दृष्टीचा व तीव्र बुद्धीचा नुकताच होऊन गेला. मोठा हिय्या करून व्यापारधंदा करणारा आणि एखादें काम हातीं घेतलें ह्मणजे तें तडीस जाई तोंपर्यंत त्यास अश्रांत श्रम करून बिलगणारा, विलक्षण मानी, आणि पाहिल्या मनुष्याची तत्काल परीक्षा करून ध्यानांत ठेवणारा होता. यामुळें सर मंगळदासांच्या पदरची वस्तु किंवा मनुष्य ह्मटलें ह्मणजे निवडक असावयाचें. याच्या खातरीस मनुष्य पटायला फार दिवस लागत व फार थोड्या लोकांची वर्तणूक व हुशारी यांच्या मनास येई.

एकच शहरांत नाना व सर मंगळदास हे दोघे उदयास आले असल्यामुळें उभयतांचा परिचय फार दिवसांपासून होता. पुढें नानांचें जाणेंयेणें त्यांच्या घरीं असेच. नानांस पेनशन घेतल्यापासून विशेष उद्योग नाहीं असें पाहून सर मंगळदास त्यांस आपल्या जवळ बसण्यास बोलावूं लागले. कोणतेंही महत्वाचें काम करावयाचें झाल्यास, नानांच्या नजरेखालून गेल्याशिवाय बहुशा

होत नसे. कोणतेंही काम नानांच्या हवालीं झाल्यावर, त्यांत पूर्ण मन घालून पोक्त विचारानें तें काम तडीस नेण्याचे उपाय योजण्याची संवय सर मंगळदासांच्या मनावर दिवसेंदिवस अधिकाधिक बिंबू लागली, व नानांस सोडणें या बड्या व्यक्तीस बरें वाटेनासें झालें. सर मंगळदासांच्या घरीं रोज नेमलेल्या वेळीं जाऊं लागले, व नेमलेल्या वेळीं परत येऊं लागले. यावरून लोकांचा समज कीं, नाना या श्रीमान् गृहस्थाच्या नोकरीस राहिले. ३९ वर्षें एकसारखी सरकारची नोकरी झाली तरी अद्याप या एकमार्गी वृद्ध कामगारांना नोकरीचा कंटाळा कसा येत नाहीं याचें आश्चर्य वाटे. (Man is the bundle of habits.) मनुष्य ह्मणजे संवईचा संचय. श्रीशंकराचार्य महामुनी महान् तत्ववत्ते यांचें मत आहे कीं, वृत्ति हेंच या देहाचें कारण. नाहीं तर मुक्ति अगदीं सुलभ आहे व समीप आहे. कृति आणि वासना यांची सांगड आहे. अद्वैतवादी तर ह्मणतात, हा सर्व देहवासनेचाच परिणाम होय. ज्या वस्तूचा मनानें किंवा कोणत्याही इंद्रियद्वारा अनुभव घेतला असतो त्या वस्तूचीच वासना उत्पन्न होते. अधिक वासना, अधिक कृति व ही अस्खलित मालिका सुरू झाली ह्मणजे त्यास व्यसन ह्मणतात. फार दिवस नोकरी करीत आलेल्या मनुष्यास व्यापार करावासा वाटत नाहीं, व व्यापाऱ्यास नोकरीचा कंटाळा व तिट्कारा येतो हें साहजिकच आहे. कोणी ह्मणतात मला रोज एकाद्या ग्रंथाचीं दहा पांच पृष्ठें वाचल्याशिवाय चैन पडत नाहीं, कोणास कांहीं वेळ

तरी रोज ईश्वरभजन न केलें तर बरें वाटत नाहीं, कोणास तंबाकू ओढल्या किंवा खाल्याखेरीज शौच होत नाहीं. मुंबई शहरांतील कितीएक व्यक्तींस चाहा "पिल्या" वांचून " झाड्यास सुटत नाहीं." एतावता हा सारा संवईचा ह्मणजे शिक्षणाचाच खेळ नव्हे काय? आमच्या डोक्यावरील परद्वीपस्थ लोक ह्मणतात, हिंदुस्थानच्या लोकांस सार्वजनिक व्यवस्था करितां येत नाहीं, जुटीनें धंदा करवत नाहीं, प्रजेनें एक मत होऊन राजाकडून आपलें अनहित टाळून हित करून घेतां येत नाहीं. या सर्व आक्षेपांचें एकच उत्तर आहे. तें वाचकांस आह्मीं सांगणें नलगे. मग नाना याच नियमास अनुसरले यांत नवल तें कोणतें?

नानांची दिनक्रियेची रीत ह्मटली ह्मणजे, सकाळीं उठून मुखमार्जनादि आन्हिक आटपल्यावर घरांतील लहानमोठ्या मुलांच्या विद्याभ्यासाकडे वेळ घालवावा. कोणी भेटावयास आले तर, त्यांच्याशीं सुखदुःखाच्या गोष्टी योग्यतेनुसार बोलाव्या व घरच्या घरांत संसारसंबंधीं इतर कामांची देखरेख करावी, याप्रमाणें दोनप्रहरपर्यंत कालक्षेप करून भोजनोत्तर सायंकाळीं तीन वाजे तों वर्तमानपत्रें स्वतः वाचावीं व मुलांकडून मराठी व इंग्रजी ऐपतीप्रमाणें वाचवावीं. आणि नंतर श्री० सर मंगळदासांकडून गाडी न्यावयास आली ह्मणजे त्यांच्याकडे जावें तें ७ वाजतां परत घरीं यावें. पुन्हां भोजनोत्तर मुलांस शिकविणें, ऐहिक व पारमार्थिक ग्रंथ इंग्रजी किंवा मराठी अथवा संस्कृत वाचणें, वाचिवणें, किंवा श्रवण करणें

यांत दहा वाजेपर्यंत वेळ घालवावा. दिवसभर प्रामाणिकपणानें, मानसिक अथवा शारीरिक कष्ट करणाऱ्या मनुष्यास अस्खलित झोंपेपासून सुखानुभव मिळतो, हुशारी येते, गलित झालेल्या अंतरबाह्यशक्ति तरतरीत होतात, तें सुख घेण्यास जावें. याप्रमाणें तादृश फेरफार न होतां नित्यक्रम चालला होता.

---

## भाग १३.

## इंदूरची कारकीर्द.

इतक्यांत इंदूरचे होळकर श्रीमंत महाराज तुकोजीराव आपल्यास कोणी तरी दिवाण शोधीत आहेत अशी वर्तमानपत्रांतून खरी खोटी बातमी उठूं लागली. कित्येक वर्तमानपत्रें इंग्रज सरकारच्या अमलांतील बडे कामगारांचीं नांवें पुढें करूं लागलीं. त्यांतून अर्थातच कित्येक नांवें योग्य होतीं व कित्येक वर्तमानपत्रांशीं "येन केन प्रकारेण" त्यांचा संबंध असे ह्मणून पुढें आलीं व कित्येकांचीं नांवें त्यांच्या तोंडपुजेपणामुळें किंबहुना त्यांच्या पाताळयंत्री खटपटीमुळें आलीं. अशा कित्येक गृहस्थांमधून मनुष्य निवडण्याची तरी एक चतुराई होती, व ती आपल्या कैलासवासी महाराजांच्या आंगीं होती हें कोणीही नाकबूल करणार नाहीं. हिंदुस्थानांतील नामांकित संस्थानें आहेत, त्यांत होळकर महाराज तुकोजीरावासारखा धूर्त, धाडसी, विद्वान्, राजकारस्थानी आपला ज्या ज्या लोकांशीं प्रसंग येईल त्या लहान थोरांवर नेहमीं पगडा बसविणारा आणि वेळ सा-

रून नेणारा या उद्योगी राजासारखा आढळणें कठीण. दोन तीन असामींस बोलावून नेलें. त्यांपैकीं एकही मनास आला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं एक साधारण वकील होळकरांकडून नानांकडे आला आणि दिवाणगिरीचीं वस्त्रें स्वीकाराल का ? अशी होळकरांच्या वतीनें चौकशी करूं लागला. आमंत्रण घेऊन आलेल्या गृहस्थांची व नानांची पूर्वी ओळख मुळींच नव्हती, सबब त्यांच्यापाशीं विशेष पाल्हाळ न लावतां त्यांस थोडक्यांत उत्तर असें दिलें कीं:—"आह्मी आजपर्यंत इंग्रजसरकारची नोकरी बरेच दिवस केली. इतःपर अन्यत्र ठिकाणीं थोडक्यासाठीं आपणांस बांधून घेण्याची इच्छा नाहीं." तुकोजी महाराजांचा चिकित्सक स्वभाव, आलेल्या वकिलांस चांगला माहीत होता. ते आपणास आडवेतिडवे प्रश्न करतील आणि त्यांच्या पुढें समर्पक उत्तरें देतांना आपली पांचावर धारण बसेल; त्यापेक्षां नानांचे अक्षरशः थोडेच आहेत ते शब्द टिपून घ्यावे असें मनांत आणून त्यांनीं सदरील वाक्य आपल्या सरणवहींत नोंदलें. हा नकार श्रीमंतांच्या हातीं पडतांच तो कागद त्यांनीं आपल्या खासगी पेटींत ठेवावयास दिला. दरबारच्या मंडळींत नानांनीं जागा नाकारिली, ह्मणून बातमी पसरली. हें वर्तमान ऐकून कितीएकांस आनंद झाला, कांहीं वाईट झालें असें बोलूं लागले. नाना फार कडक न्यायाधीश अशी त्यांची कीर्ति पुणें, सोलापूर वगैरे ठिकाणीं फार झाली होती. ज्या आपमतलबी लोकांस नाना येत नाहींत असें समजलें ते खुशालले, पण

पापभीरू, सत्याचरणी व न्यायप्रिय कांहीं गृहस्थांस तात्कालिक खिन्नता आली. नाना मोरोजींकडून आलेल्या या वरकर्णी नकाराचा तुकोजीमहाराज आठ पंधरा दिवस विचार करीत होते. पुढें एके दिवशीं मुंबईहून जवाहीर विकण्याकरितां एक मारवाडी गेला. त्याचे जवळ महाराज जवाहीर पारखीत असतां नानांच्या गोष्टी निघाल्या. मुलचंद मारवाडी नानांस फार चांगला ओळखीत असे. नानांकडे या नाशिककर मारवाड्याचें फार जाणें येणें असे. हे गृहस्थ मोठे धाडसी व्यापारी असत. बड्या साहेबलोकांमध्यें व एतद्देशीय श्रीमान् गृहस्थांकडे यांचें वळण मोत्यें व जवाहीरविक्रीच्या संबंधानें फार असे. या गृहस्थांस त्यांच्या नांवावरून व तीन शेंड्यांवरून मात्र मारवाडी असें ओळखतां येत असे. नाहीं तर सर्वांशीं पक्के नाशिककर कोंकणस्थ ब्राह्मणच ह्मणणें योग्य दिसेल. त्यांचें तें चक्रीदार ब्राह्मणी तांबडें पागोटें, ढोंपरांवर जुन्या चालीचे पांढरे आंगरखे, कानांत झोंकदार भिकबाळी, पायांत पुणेरी आपाशाई जोडा, व खाकेस तंबाकूची चंची, व नवीन पद्धतीची काठी, याप्रमाणें पोषागाचा थाट पाहिला ह्मणजे, मुलचंदजींच्या पाणीदार डोळ्यांवरून व सुहास्य भाषणावरून हा कोणी खोल बुद्धीचा, धूर्त, चौरस दरबारी गृहस्थ नानाफडणिशी काव्याचा आहे असें प्रथमदर्शनीं परक्यास भासत असे. या मारवाड्यानें आपला डाव साधण्याकरितां ह्मणा किंवा नानांच्या आंगचे अलौकिक खरे गुण जाणल्यावरून ह्मणा, तुकोजीराव महाराजांपुढें

चिनई खडीसाखर पेरली व दर्शविलें कीं, जरी नाना मो-रोजी निरपेक्ष होऊन कालक्रमण करितात असें ह्मणतां तरी माझ्यासारखाच गृहस्थ जाऊन गळीं पडला तर ते आपल्यापाशीं येणार नाहींत असें वाटत नाहीं. मुलचंद! आह्मी तरी नाना हिंमत खचून बसले आहेत असें ह्मणत नाहीं. कारण त्यांच्याकडून आह्मांस उत्तर आहे, तें मोठें कारकुनी बाण्याचें दिसतें. मनुष्य पण फार खोल बुद्धीचा दिसतो खरा. हें पहा त्यांकडून आलेलें उत्तर कसें आहे तें. ते ह्मणतात, "आह्मीं इंग्रज सरकारची नौकरी बरेच दिवस केली" याचा अर्थ आतां मी थकलों असा नव्हे. तर इतके दिवस मोठीं मोठीं जोखमाचीं कामें करून अनुभवलेले आहों. "अन्यत्र ठिकाणीं थोडक्यासाठीं आपणांस बांधून घेण्याची इच्छा नाहीं." याचा भावार्थ आह्मांस असा दिसतो कीं, त्यांस मोठा पगार पाहिजे. 'व बांधून घेण्याची इच्छा नाहीं' ह्मणजे स्वतंत्रतेनें काम करणार. एकंदरींत यांच्या उ-त्तरावरून नकाराविषयीं लोकांत कंडी उठली आहे ती खोटी व निराधार. मुलचंद! विलंब नको. आज निघून जा आणि नानांस घेऊन या. ते येतील अशी आमची या उत्तरावरून खातरी होते. चला तर निघा. खर्चास काय लागेल तें घेऊन जा.

मुलचंदजी नानांस इंदुरीं नेण्यास येऊन ठेपले. नानांनीं शेटजींस एकदम रुकार दिला नाहीं इतकेंच नव्हे पण जाण्याविषयीं जेवढ्या हितकारक गोष्टी शेटजींनीं दाखवाव्या तितक्यांचें नानांनीं तात्काल निरसन करून

टाकावें. होळकर क्षणिकबुद्धीचा आहे, तो केव्हा हा-
तांत नारळ देईल कोण जाणे. आमच्यावर काम सों-
पणार नाहीं. आपण आंत ढवळाढवळ करीत बसणार.
मग आह्मांस लोक नांव ठेवणार, मोठे नांवाजलेले मा-
जिस्ट्रेट गेले, काय ध्वज लावले? तशांत राजे ते. आ-
ह्मांस एखादें अनन्वित कृत्य करण्यास सांगितलें व आह्मीं
नाकारिलें कीं, आह्मांवर खप्पा मर्जी होणार. परमेश्वरानें
अर्धी भाकर दिली आहे, त्यांत संतोष मानावा, नाहीं तर
आणखी कांहीं तरी एखादें किचाट आंगावर आलें तर
काय घ्या.

मु० या भयानें का लपून बसायाचें?

ना० तसेंच केवळ नव्हे; मुलचंदजी! आज आपण
या आतां. मग दुसऱ्या वेळीं याचा विचार करूं.

मु० बरें. तर मग केव्हां येऊं?

नाना० केव्हांही या, मी रिकामाच आहें.

ऐकलेंसना? मुलचंदजी तर इंदुरास जाण्याविषयीं
फार आग्रह करताहेत.

आपल्या घरीं चालून आयतें आलें तें टाका कां?
होळकर क्षणिकबुद्धीचा असला तर आमचें आहे तें तर
घेत नाहीं. झालें तर, मुलांचें कल्याण होईल, नाहीं तर
आहे यापेक्षां वाईट स्थिति होत नाहीं. मग माघार
कां? होळकरानें तुमच्या कामांत ढवळाढवळ केली,
तर लोक तुह्मांस नांवें कां ठेवतील? राजास त्यांनीं ठे-
वावीं. इतकेंही असून लोक बडबडले तर, आपल्याला
काय त्याचें. मूर्ख लोक आह्मांस इंदुरास न जातां

जर दोष देऊं लागले तर आपल्यास त्याचें काडीमात्र दुःख नाहीं. जग त्रिविध आहे, त्याचे तोंडास हात कोणीं लावावा? होळकरची नौकरी पतकरली ह्मणजे अन्यायाचीं कामें करण्याचा करार केला पाहिजे असें नाहीं. त्यांची इतराजी झाली तर त्यांस आपली अर्धी भाकरी काढून घेववत नाहीं. त्यांच्याकडून एक कोरभर मिळेल ती ते देणार नाहींत. नाहीं तर बलाय गेली. आपण ईश्वरास स्मरून वागत असावें. आत्महितासाठीं डोळेझांक करूं नये, मग किचाट आलें तर त्याची काळजी वाहत बसण्यांत काय हांशील? आपलें मन खाईल असें काम मात्र करूं नये. हे आमचे बायकांचे विचार आहेत. आह्मी घरांत बसून गोष्टी सांगणार. पण "टांकीचे घाव खाल्ल्यावांचून देवकळा येत नसते."

नाना०-तर मग हें काम पत्करावें असा आपला सर्वांचा अभिप्राय दिसतो. बरें. दादा काय ह्मणतो तें पाहूं. गजानन! दादा रिकामा असला तर ह्मणावें इकडे येऊन जा.—

ना०—दादा! ती घे खुर्ची; जवळ बैस. यांचें मत इंदुरास जावें असें आहे. तुझें काय ह्मणणें आहे? आपली प्रस्तुत स्थिति लक्षांत आणून उत्तर दे. बाबा वगैरे मान डोलवतील मात्र.

दादा—इंदुरांत हायस्कूल आहे; मुलांच्या शिकण्याची कांहीं अडचण नाहीं, विनाला मात्र येथें रहावें लागेल. मीही येथें राहीन, किंवा तिकडे येईन. कसा विचार ठरेल तसें करूं.

नाना०—ह्मणजे जायचें ही ठरलेली गोष्ट समजून तूं पुढील तजवीज कशी करावी ती सांगतोस. पण मी पहिलीच गोष्ट अद्याप ठरवूं पहात आहें.

दादा०—तुह्मांला तरी active life पाहिजे, ह्मणजे प्रकृति नीट राहील.

नाना०—बरें समजलों. तुह्मां सर्वांचे मतें जावें असेंच ठरतें. तर तसेंच कां होईना.

इंदूर मुक्कामीं पोहोंचल्यावर नानांस वस्त्रें मिळण्यास दहा वीस दिवस मोडले. तुकोजीराव होळकर ह्मणजे संशयाचें घर. पहिल्या भेटीस राजानें आपणास असे अनुभवी व कुटुंबवत्सल गृहस्थ दिवाण मिळाले ह्मणून आनंद प्रदर्शित केला. दुसऱ्या भेटीस ह्मणाले, तुह्मी ह्मातारे फार दिसतां. कांहीं दिवसांनीं त्यानीं एक नानांस असें कोडें घातलें कीं, नाना तेथें राहतील असें कोणास वाटूं नये. "काजी बोले नि दाढी हाले पण राजा बोले नि दळ हाले." एक दिवस तुकोजीराव आपल्या जवळच्या मंडळीस ह्मणतातः—

काय हो, नानासाहेबांनीं इंग्रजसरकारची इतराजी झाल्यामुळें पेनशन घेतलें.

उ० जी सरकार, त्यांना मोठा टपका दिला. कां पंत?

होय, आह्मींही असेंच कांहीं ऐकिलें होतें. त्यांना पेनशन मिळण्याचाही वानवाच होता. कांहीं कमी करून वाटतें मिळतें.

हो०—कोण आहे तो? नव्या दिवाणसाहेबांस बोलावा.

बसा नाना. तुह्मीं इतके लौकर पेनशन कां घेतलें?

नाना०—आमचीं ५५ वर्षे भरून गेलीं.

हो०—तुह्मांला पेनशन कांहीं कमी मिळतें तें कां?

नाना०—नेटिव लोकांत याहून अधिक वेतन कोणास मिळूं नये असा सरकारचा कायदाच आहे.

हो०—तुह्मांला इंग्रज सरकारनें कांहीं टपका देऊन काढलें मग तुह्मी आमच्या काय उपयोगी?

आह्मांस दोष देऊन काढलें ही गोष्ट अगदीं खोटी. इतकेंच नव्हे पण वयाच्या ५५ वर्षांनंतर नौकरीवर ठेवूं नये असा इंग्रज सरकारचा ठराव असतां सरकारानें आमचें काम मनांत आणून मेहरबानीनें आह्मांस तीन वर्षे जास्त ठेवून घेतलें, हें आह्मीं मोठीं मोठीं नेकीनें जोखमाचीं कामें बजावलीं त्याचें फळ होय. सरकारच्या मनांत आह्मांविषयीं कांहीं संदेह आला असल्यास महाराजांनीं आह्मांपाशीं शोध घेण्यापेक्षां सरकारचे इंग्रज सरकार स्नेही आहेत त्यांजपाशीं परस्पर चौकशी करावी हा आह्मांस उत्तम मार्ग दिसतो. तशांत महाराजांच्या आह्मी उपयोगी नसल्यास, आह्मी उदईक मुंबईचें प्रस्थान ठेवितों. परक्यास आपल्या घरीं आणून त्याच्या गुणदोषांचा त्याच्याशींच ऊहापोह करण्याचा घाट घालणें हा सौजन्याचा नमुना आह्मांस कोठें आढळला नव्हता.

हो०—नाना! तुह्मांला आमचें बोलणें इतकें असंह्य होण्याचें कारण नाहीं. "बाळंतिणीच्या वेदना बाळंतिणीसच माहीत, वांझेस सांगून काय उपयोग" "दुरून डोंगर साजरे." राजा हें पद शोभतेंसें दिसतें पण वाहकास

फार टोंचतें. तुह्मी कांहीं दिवस राहणें करा, लौकरच निकाल होईल.

" लोभमूलानि पापानि " पाहिलेंना मुलचंदजी!

आह्मांला अजून कांहीं ह्मणतां येत नाहीं. आपलें नि गिबसाहेबांचें कसें आहे? महाराज तुह्मांविषयीं त्यांजपाशीं चौकशी करतील.

नाना०—तुमच्यापाशीं तरी महाराजांच्या अंतर्यामच्या गोष्टी चालतात. गिबसाहेबांचा आमचा मोठासा स्नेह नाहीं तरी वांकडेंही आहे असें ह्मणण्यास कारण नाहीं. मुंबईहून गेल्यापासून त्यांची आमची भेट नाहीं.

मु०—कांहीं खटपट होण्यासारखी असेल तर पहा.

नाना०—छे, छे, छे, ती गोष्ट बोलूं सुद्धां नका. मीं आजपर्यंत कोणाच्या पायधरण्या केल्या नाहींत.

गिबसाहेबांच्या पत्रावरून होळकर महाराजांचें मन स्थिर झालें. नानांच्या चांगुलपणाविषयीं तुकोजीरावांच्या मनांतील किंतु उडून गेला, आणि वस्त्रें देण्याचा निश्चय व मुहूर्त ठरला. मामूल चालीप्रमाणें समारंभ होऊन नाना काम पाहूं लागले. तुकोजीराव महाराजांनीं आपल्या राज्यांतील जमाबंदी काम कोणत्याही दिवाणावर सोंपविलें नाहीं. हुशार नांवाजलेले लोक कारभारी नेमले पण त्यांच्या हातीं दिवाणी फौजदारी मात्र असे. हे महाराज पैशाच्या कामांत कोणासही पातीत नसत. ह्यांस असें वाटे कीं, आपल्या अकलेपुढें दिवाणाची अक्कल व्यर्थ आहे. इंग्रजी शिकलेले हुशार लोक लेख चांगले लिहितात पण राज्यकारभारप्रकरणीं कारस्था-

नांत त्यांस कांहीं कळत नसतें. तर लांबलचक शोभिवंत इंग्रजी भाषेंत पत्रें लिहून जर आपला कावा या लोकांस साधतां येत नाहीं तर त्यांचें शुष्क शब्दलालित्य घेऊन काय चाटावयाचें? राज्यकारभार पहावयाचा ह्मणजे आपलें राज्य अधिक बळकट होई अशी तजवीज करावयाची. अधिक श्रीमान् झालें कीं अधिक सामर्थ्य आलें. द्रव्यानें सर्व कांहीं होतें. हें तत्व या नवीन पद्धतीच्या लोकांस कळत नाहीं. या लोकांचें धोरण सर्व खऱ्या राज्यशकटधुरीणत्वाच्या अगदीं उलट असतें. तात्पर्य मोठमोठे पगार देऊन या लोकांस ठेविलें तरी यांच्यावर रात्रंदिवस देखरेख आपणांस ठेवणें भाग असतें. मग कसे तरी आपले विचार दुसऱ्यास इंग्रजी भाषेनें कळवितां येतात, असा थोडक्या पगाराचा सांगकाम्या मनुष्य असला तरी आह्मी त्याच्यापासून कारभाऱ्याचें काम घेऊं, नव्हे पण अधिक चांगल्या रीतीनें घेऊं, कारण सांगितलेल्या कामांत असले लोक आपली अक्कल तरी लढविण्याचा प्रयत्न करीत नाहींत. आणि इंग्रज लोकांनीं वाखाणलेल्या लोकांस आढ्यता फार असते. लोकांमध्यें आपल्या नांवाचा डंका पिटून घेण्याची ज्यांना इच्छा फार असे लोक आमचे गाडीवान झाले ह्मणजे आमच्या मनांत पूर्वेकडे जावयाचें असतां, त्यांची ओढ पश्चिमेकडे असते, एतावता गाडीचे मात्र हाल होतात व एकाचेंही अंतर्गत तडीस जात नाहीं.

नानांस सोंपलेल्या कामांत त्यांच्या हातून आळस तर कधींच व्हावयाचा नाहीं, हा त्यांचा अंगस्वभावच ब-

नून गेला होता. त्यांत ज्या कामाबद्दल पगार मिळतो त्या कामाबद्दल यांच्या हातून हेलंठाई होईल हें मनांत सुद्धां आणणें नलगे. या ठिकाणीं प्रातःकाळीं ६ पासून ९ वाजेपर्यंत दिवाणी व मुलकी किरकोळ कामांची सुनावणी होऊन होईल तितका कामाचा रोजचा फडशा होत असे. ११ वाजतां दिवाणसाहेबांची कचेरी मोतिबंगल्यांत भरत असे. या ठिकाणीं अर्जदारांची समक्ष भेट घेऊन प्रत्येकाची हकीकत व तक्रार यथास्थित नाना ऐकून घेत असत. कित्येक दिवाण कागदोपत्रीं पुरावा पाहून निकाल आपल्या मतें यथान्याय करीत असत. पण अशा पद्धतीनें पक्षकाराचें समाधान होत नाहीं. प्रत्येकास वाटतें कीं माझ्या कामाचा मी अधिक चांगला खुलासा करीन, व न्याय मिळवीन आणि न्यायाधीशानेंच त्यांना मोडून काढलें ह्मणजे जरी एकाद्याचा मोड झाला तरी त्यास इतका असंतोष होत नसतो. असो. यानंतर इंग्रजी कामाला सुरुवात होई. हें काम फार नाजूक व विशेष बिकट, कारण हा पत्रव्यवहार होळकर व रेसिडेंट यांच्यामध्यें असावयाचा. एथील पोलिटिकल एजंट यावेळीं सर लिपेल ग्रिफिन होते. या दोन प्रचंड बुद्धिमान् व दुराग्रही पुरुषांमधील पत्रव्यवहार ह्मणजे तेलांत पाणी मिसळून त्याचा अगदीं एक जीव करण्याचा यत्न होय. या उभय मूर्तींची बुद्धि, साहस, दुराग्रहीपणा आणि आपआपल्या हितानहिताविषयीं डोळ्यांत तेल घालून झटण्याचा स्वभाव हा जगास मी सांगेन तितका थोडाच होईल. या दोन्ही पक्षां-

मध्यें बहुतेक कामांत नेहमीं मतविरोध असेच. याची एकवाक्यता करीत असतां महाराज तुकोजीराव यांची मर्जी संभाळणें हें तर पहिलें काम होतें, कारण त्यांनीं आपल्या हितरक्षणार्थ मजला पगार देऊन ठेविलें आहे, तर हें नाना अहर्निशीं मनांत वागवीत असत. ग्रिफिन साहेबांची मर्जी खप्पा झाल्यास एवढा मोठा पगार देऊन कारभारी महाविद्वान्, अनुभवी, शांत स्वभावाचे, तोड-जोडीच्या कामांत निपुण असे पहाण्यांत मग महाराजांची चतुराई ती काय राहिली? सत्यास बाध न येऊं देतां आ-पली वर्तणूक ठेवणें हें तर नानांचें आरंभापासून शील असे. आतां " एकीकडे विहीर नि एकीकडे आड " अशी नानांची स्थिति झाली होती. तथापि तोडजोडीनें, सलोख्यानें व धूर्ततेनें नानांनीं सतत दोन वर्षें काढिलीं. इतकेंच नव्हे पण दोन्ही राक्षसांची मर्जी संपादन करून काढिलीं. एके दिवशीं सर ग्रि० साहेब नानांस ह्मण-तातः—" नाना! एक बाजूस सुसर व एक बाजूस वाघ अशा कचाटींत तूं सांपडला आहेस."

हें इंग्रजी काम आटोपल्यावर दिवाणी व फौजदारी अपिलाचें काम सुरू होत असे. वकिलांच्या तक्रारी ऐकून घेऊन निकाल होत असत. हें दरबारांत काम झाल्यावर घरीं ७।८ वाजल्यापासून १० वाजेपर्यंत पुन्हा मुलकी व दिवाणी कामाची सुरुवात होई.

प्रत्येक आठवड्यांत एक वेळ एजंटसाहेबांकडे जा-ण्याची कारभाऱ्याची वहिवाट असे. कारणपरत्वें महारा-

जांकडे जाऊन बिकट कामांत असतील त्या भानगडीं-बद्दल महाराजांशीं ऊहापोह चालत असे.

नानांची सचोटी व साधेपणा महाराजांस पक्केपणीं मागील चरित्रावरून माहीत असल्यामुळें एखादें अन्यायाचें किंवा आडमार्गाचें काम करावयाचें असल्यास त्या चांडाळचौकडींत कारभाऱ्याची योजना होत नसे. व होतां होईल तोंपर्यंत तें काम नानांच्या नकळत होत असे, यामुळें नानांची एक मोठीच अडचण दूर झाली होती.

महाराजांचे जामात गोविंदराव बुळे (बाबासाहेब) यांची पत्नी वारल्यास फार दिवस झाले. महाराज व बुळेसाहेब या उभय कुटुंबांमध्यें बरेच दिवसांचें वैमनस्य आहे. बुळेसाहेब यांचें सरदार व फार श्रीमान् घराणें आहे. सरकारघराण्याशीं वांकडें असल्यामुळें गोविंदराव शहराबाहेर राहतात. शहरामध्यें स्थावर जिनगी व छावणीमध्यें वास असल्यामुळें सरकाराशीं त्या घराण्याचा वारंवार सामना होण्याचा प्रसंग येत नसे. शेवटीं तुकोजी महाराज होळकर यांच्या मर्जींतल्या एका वामनराव नांवाच्या मनुष्यास घर बांधण्याकरितां शहरच्या हद्दीवर जागा मिळाली. हे वामनराव इंदूरचे डावरे होत. पुण्यांतील प्रसिद्ध कीर्तिवत्सल डावरे हिंदुस्थानच्या लोकांस माहीत झाले होते, त्याच मानानें सदरील वामनराव होळकरसंस्थानांत प्रसिद्धीस आले असें ह्मटलें तरी चालेल. ह्या जमिनीमध्यें कांहीं भाग बुळेसाहेब यांच्या जमिनीचा गेला आणि उभय पक्षांमध्यें वादास कारण उपस्थित

झालें. बुळेसाहेबांनीं दिवाणीकोर्टांत तत्संबंधानें दावा मांडला. होळकरशाईंतील न्यायपीठांनीं सरकारतर्फे निवाडा दिला हें सांगणें नलगे. बुळेसाहेब यांसही त्यांत कांहीं नवल वाटलें नाहीं. रोगी मरणार अशी जरी घरच्या माणसांची व वैद्यबुवांची खात्री असली तरी त्रिदोष झाल्यावर सुद्धां हेमगर्भाच्या मात्रेचे दोन वळसे रोग्यास देण्यास कोणी अनमान करीत नाहींत. या तत्वास अनुसरून ह्मणा किंवा कोणत्याही उद्देशानें असो, बुळेसाहेबांनीं दिवाणसाहेबांकडे अपील केलें. तथापि सरकारतर्फेंच निवाडा व्हावयाचा, अशी त्यांची बहुतांशीं खात्री होती. पुराव्याचें तालमान पहाण्याकरितां नाना तराजू हातांत घेतात तों बुळेसाहेबांचें पारडें जमिनीवरून हालेना. नानांनीं नेहमींच्या सचोटीप्रमाणें तुकोजी महाराजांसारख्या कृतांत काळासही न भितां व आपल्या दिवाणगिरीचा खांब कोरम होईल असें मनांत न आणतां बुळेसाहेबांच्या वतीनें हुकुमनामा दिला. ही वरील गोष्ट धारिष्टाची व निस्पृहपणाची द्योतक आहे याविषयीं कोणाच्या तरी मनांत संशय येईल काय?

तीन मारवाडी सावकारांवर सरकारतर्फे लाखों रुपयांचे दावे करून दिवाणीकोर्टांत फिर्यादी सुरू असतां फिर्यादीच्या समर्थनाकरितां कांहीं खोटे दस्तऐवज झाले असें ऐकूं येत असे. या तीन मारवाड्यांपैकीं एकानें दुसऱ्या एका अफूच्या व्यापाऱ्यास कांहीं अफूच्या गोळ्या विकल्या व तो माल खरेदीदारानें आपल्या ताब्यांत तत्क्षणींच न घेतां मूळ मालकाच्याच घरीं एका खोलींत बंद करून

ठेवला. कांहीं दिवसांनीं घरांतील एका चाकरमाणसानें ती खोली झाडण्याच्या इराद्यानें न समजून उघडली; ही बातमी खरेदीदाराच्या कानीं गेली. खरेदीदारास महाराजांनीं आपल्या पाठीशीं घातलें आणि खरेदीदाराकडून त्या दिवाणी खटल्यांतल्या सावकारावर फौजदारींत फिर्याद करविली. त्या सावकारावर काहूर उचलून असा आव घातला कीं यामध्यें त्याला गेलाबाजार दोन वर्षांची तरी कैद व्हावी. यामध्यें महाराजांचा हेतु इतकाच असावा कीं, या भयंकर फौजदारीची धास्ती पडून त्या सावकारानें आपल्या दिवाणी खटल्यांत महाराजांची मनासारखी समजूत करावी. राजा आणि प्रजा यांमध्यें वाद पडला ह्मणजे यश कोणीकडे जावें? "राजा बोले दळ हाले, काजी बोले दाढी हाले." सावकारास शिक्षा तर होणार खरी "राजानें मारलें नि पावसानें भिजवलें" दाद कोण घेणार? पण "उघड्या डोळ्यांनीं जीव जात नाहीं." मरतां मरतां तरी हातपाय हालवून मरावें, ह्मणून त्या हताश सावकारानें दिवाणसाहेबांकडे शिक्षा होण्यापूर्वीच अर्ज केला. सावकारास तर खातरीच होती कीं, "गुळाचा नैवेद्य नि गुळाचा गणपती" अशी आपल्या खटल्याची अवस्था होणार. ही बातमी महाराजांस कळतांच दिवाणसाहेबांस यांनीं बोलावणें पाठविलें. मराठी दरबारच्या रीतीप्रमाणें कोणत्याही पदवीचा मनुष्य श्रीमंतांच्या भेटीस गेला असतां राजास योग्य अशा अंतरावर उभें राहून, तोंडावर वस्त्र धरून बोलण्याची चाल आहे, व महाराजही या पद्धतीपलीकडे कोणाशीं सलगी कर-

तांना त्या दिवसपर्यंत ऐकिवांत आलें नव्हतें. नानांचा मुजरा आटपून कांहीं अंतरावर नेहमींच्या रिवाजाप्रमाणें ते बसले असतां महाराज ह्मणतात, नाना! येथें या, असे जवळ बसा. बसल्यावर आपल्या हातांतला फुलांचा गजरा नानांच्या हातीं देऊन ह्मणतात, तुमच्याकडे त्या मारवाड्यानें अर्ज केला आहे? त्या लुच्चांची आतां चांगलीच खोड मोडली पाहिजे.

नानाः—या खटल्यांत कांहीं फौजदारी बाब दिसत नाहीं.

महाराजः—दगाबाजी केली असतां, त्यांत फौजदारी नाहीं ह्मणतां?

नानाः—दगा कांहीं झाला नाहीं, व करण्याचा हेतु कोणत्याही प्रकारें दिसून येत नाहीं. हेतु होता अशी क्षणभर कल्पना केली तरी चाकराच्या कृत्याबद्दल धन्यास अपराधी कसा धरतां येईल? धन्याच्या सांगण्यावरून नोकरानें खोली उघडली अशाबद्दलही कांहीं पुरावा दिसून येत नाहीं.

महाराजः—असा कसा तुमचा न्याय? शिक्षा द्यावयाची मनांत आल्यावर कायद्याच्या धोरणाचें जडप मग बसवून द्यावें. तुह्मी तर फौजदारी कायद्यांत पारंगत आहां. तुमच्या सारखें जडप बसविणें फार थोड्या माणसांना साधेल.

नानांस हें बोलणें न रुचल्यामुळें ते कांहींच उत्तर देतना. राजकीय पुरुष घोरकर्मी असतात, अशी मात्र पक्की खात्री झाली. अन्य विषयावर आणखी कांहीं

वेळ उभयतांचें संभाषण होऊन नाना घरीं गेले. त्या दिवसापासून कारभाऱ्यांचें काम पतकरल्याचा जरा विसय झाला. महाराजांच्या समोरासमोर विरुद्ध वागण्याचा हा प्रसंग आहे. बारकाईच्या विशेष चौकशीअंतीं आढळलें कीं तो मारवाडी या खटल्यांत अगदीं निर्दोषी आहे व महाराजांच्या मनांत याला शिक्षा होऊन याची दुर्दशा उडावी. बरें याला शिक्षा न द्यावी तर आपल्या कारभारीपणास आतांच आंचवावें. मारवाडी सुटला कीं आपल्या हातीं नारळ मिळणार. हे राजकारस्थानी, हट्टाग्रही, मानी व तीव्रबुद्धि तुकोजीराव महाराज स्वेच्छेस अनिष्ट असें वर्तन सहन करणार नाहींत. हा राजा आपल्यास लौकरच वाटाण्यांची अक्षत लावणार; असें नानांच्या मनांत पक्कें बिंबलें तथापि आमच्या न्यायपटु दिवाणांनीं निर्दोषी मारवाड्यास सोडिलें.

नानांनीं मारवाड्यास सोडून दिला ह्मणजे होळकरसंस्थानास रामराम करून मुंबईस जाऊन स्वस्थ बसावें इतकाच केवळ प्रकार नव्हता. मतलबी, राजकारस्थानीं, हलक्या मनाच्या हुद्देदार लोकांशीं या सरळ व न्यायमदांध न्यायाधीशाचें बरें नसल्यामुळें एक वेळ इंग्रज सरकारची चाकरी सोडतांना जसा अनिष्ट काल आला होता त्याचप्रमाणें अगर जास्ती भयंकर प्रसंग पुन्हां आपल्यावर गुदरतो कीं काय कोण जाणे. हे राजकारस्थानी लोक आपला मतलब साधत नाहीं असें वाटल्यास कितीही अन्याय व सज्जनाची अप्रतिष्ठा कोणत्याही प्रकारानें करावयास चुकणार नाहींत, असे विचार मनांत येऊन ही महाराजांच्या

मर्जीविरुद्ध मारवाड्यास मुक्त करणें ह्मणजे जाणूनबुजून दुष्ट सर्पाच्या शेंपटीवर पाय देणें अथवा आंवसावरल्या वाघाच्या तोंडांमध्यें हात घालण्यास यत्न करणें होय, असें कारभाऱ्यांच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. तथापि, "सत्यमेवजयते" या महावाक्यावर नजर देऊन नानांनीं सुपथावलंबनच केलें. याचें नांव धैर्य.

या खटल्याचा शेवट अनपेक्षित झालेला पाहून महाराजांस जरा खेद झाला तरी, त्या गुणज्ञ तुकोजीरावानें नानांच्या केंसासही धक्का लावला नाहीं!!! उलट पुढें जनसमूहाच्या अघटित रचनेंत परमेश्वरलीलेनें योग्य व्यवस्था केली, त्यामध्यें मानवदृष्टीनें जो कुटुंबघात असा दिसला, त्यावेळीं तुकोजीराव महाराज नानांचें जनरूढीप्रमाणें सांत्वन करीत असतां प्रचारामध्यें तत्प्रसंगास योग्य बोलांच्या पलीकडचे बोल महाराज नानांच्या पाठीवर हात ठेवून बोलले; त्यांचा आमच्या कानीं आल्याप्रमाणें सारांश देतोंः—"नाना! या क्षणिक संसारामध्यें मनुष्यमात्रावर प्रसंग गुदरतात, त्यामध्यें वृद्धापकाळीं पत्नीवियोग व पुत्रशोक हीं महत् संकटें होत, ईश्वरइच्छेपुढें इलाज नाहीं. मेल्याबरोबर आपल्यास मरवत नाहीं. आपण विचारीच आहां. सर्व दुःख गिळून दिवस लोटले पाहिजेत. बराच वेळ उभयतांही स्तब्ध होते. पुन्हां महाराज ह्मणतातः—नाना! "बोलेल तो काय करील" असें मात्र समजूं नये. आपणास ऐहिक कृत्यांचा किळस येऊन मुंबईस जाण्याचा विचार आपण करूं नये ह्मणून बोलतों. आपला पुत्र

गेला नाहीं. आह्मी त्याच्या ठिकाणीं आहों. तुमचा वियोग आह्मांस शेवटपर्यंत होऊं नये अशी आमची इच्छा आहे. तुह्मारे उपर हम कफन डालेंगे."

रा० ब० नाना मोरोजींच्या वेळीं इंदुरावर एक मोठेंच किटाळ येऊं पहात होतें. तें रा० ब० रांच्या मनमिळाऊ स्वभावानें, चतुराईनें व धूर्ततेनें तसेंच खुद्द महाराजांच्या धाडशी स्वभावानें त्याहीपेक्षां ईश्वरकृपेनें ह्मणा जर टळलें नसतें तर इंदूरचें बडोदें व तुकोजीचा मल्हारराव होण्यास विलंबच नको होता. व्याघ्राचा मंत्री गरुड असतां सुज्ञ मंत्र्यानें राजाच्या पितृतिथीची शक्कल काढून दर्भ घेऊन समोर येणाऱ्या ब्राह्मणाचा जीव वांचविला. त्याच राजाचा मंत्री पुढें कावळा झाला. तेव्हां लोभी ब्राह्मण आशाबद्ध होऊन पुन्हां त्याच तिथीवर लक्ष ठेवून गेला, तों प्राणास मुकला. तसें या आणीबाणीच्या वेळीं रावबहादुरांचें चातुर्य इंदूर संस्थानास उपयोगीं पडलें असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

एका मुगबीरानें ( गुप्त हेरानें ) सर लिपेल ग्रिफिन गव्हरनर जनरलचे एजंट यांस अशी खबर दिली कीं, इंदूरसरकारानें गेल्या सालांत शिसें फार खरेदी केलें आहे. इतकें संस्थानचे खर्चास लागण्याचा संभव नाहीं. हा सर्व कापट्यभाव गुप्तरीतीनें . इंग्रजसरकारच्या विरुद्ध चालला आहे. इंदूरसरकार दारूगोळा जमा करण्याच्या खटपटींत आहे. प्रसंगवशात् रशियनलोकांस मदत देण्यास आपल्यापाशीं सामग्री असावी असा तुकोजी महाराजांचा घांट दिसतो, अशी बातमी एजंटाच्या कानीं

पडतांच साहेबमजकुरांचें पित्त खवळून गेलें. कारभाऱ्यांस त्यांनीं एक पत्र लिहिलें. त्यांत होळकरसंस्थानामध्यें गतसालीं बाहेरून शिसें आलें किती व कोणत्या उपयोगाकरितां व किती खर्ची पडलें याचा आंकडा मागविला. या पत्राचा हेतु नानांच्या लक्षांत येईना. हें कांहीं क्षुल्लक काम असेल असें समजून, रीतीप्रमाणें या गोष्टीचा महाराजांच्या मराठी दफ्तरीं तपास केला व त्याजबद्दल तपशील आल्याप्रमाणें उलट उत्तर पाठविलें. तें पत्र वाचून तर सर लिपेल साहेबांची पायांची तिडिक कपाळास गेली. कांहीं दिवसांनीं राजवाड्यामध्यें साहेब मजकूर स्वतः आले. त्यावेळीं खुद्द महाराज, त्यांचे ज्येष्ठ बंधु सर काशीराव दादासाहेब के. सी. एस्. आय्. परळीकर रामराव, दिवाणसाहेब, बक्षीसाहेब कारभारी व पडद्यापलीकडे मुख्य राणीसाहेब, इतक्या मंडळीसमक्ष कारभाऱ्यांचें सदरहू इंग्रजी पत्र एजंटांनीं काढलें आणि ह्मणाले, इतकें शिसें एवढ्याशा कामाकडे खर्च झालें कसें? एवढ्या शिशांत तशीं शेंकडों कामें होतील. वेताळाचें स्वरूप धारण करून त्या पत्रांतील मजकूर खोटा आहे ह्मणून त्यांनीं बरेच इकडे तिकडे हातपाय आपटले, कारभाऱ्यांवरही बरेच घसरले. शेवटीं महाराजांस लक्षून बोलले कीं, “ हम् • इसूबाबत व्हाईसरॉयसाहेबकूं लिखेंगे.” महाराज ह्मणतातः—अछा तुं दस् दफे लिखो हम एक दफे लिखेंगे. हें महाराजांचें तिखट उत्तर ऐकून साहेबांस मोहोरी खाल्यासारखें वाटलें व ठसक्यासरसे उठून जाऊं लागले. महाराज ह्मणाले,

"जरा बैठो पानगुलाब लेवो." साहेब ह्मणाले:—तुह्मारा पानगुलाब नहीं होना व ताबडतोब निघून गेले. जातांना साहेबांनीं आपल्या बंगल्यावर दोनप्रहरीं या गोष्टीचा खुलासा करण्याकरितां बक्षीसाहेब, वकीलसाहेब व कारभारी यांस पाठवून देण्यास सांगितलें.

इकडे वाड्यामध्यें सर्व मंडळी अगदीं गर्भगलित होऊन गेली. बहुतेक लोकांच्या डोळ्यांपुढें बडोदें-कमिशन मूर्तिमंत उभें राहिलें. सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. जिकडे तिकडे लोक खलबतें व अंदाज करूं लागले. कोणास कांहीं सुचेना, राज्यावर काय अनर्थ गुदरणार कोण जाणे. आपल्या गरीबाच्या पोटावर पाय येणार. मग राजकुळाचे हाल तर कुत्रा खाणार नाहीं. अशा विवंचनेंत जवळील सर्व लोक होते, तरी महाराज अगदीं मोरोपंत ह्मणतात तसे "गाढासन विकंपधी धीट" होतेसें दिसे. खुद्द महाराणीसाहेबांनीं मुद्दाम कारभाऱ्यांस बोलावून या विषयावर बोलत असतां त्या फार चिंतातुर दिसल्या. राणीसाहेब ह्मणाल्या:—नाना! तुह्मी तर नांवाजलेलीं माणसें, बहुतेक काळ इंग्रजलोकांच्या सहवासांत गेला, आणि वाड्यांत बडेसाहेबांपुढें ब्र सुद्धां काढलात नाहीं हें कसें? त्यावेळीं आपलें चातुर्य व तोडजोड अगदीं कशीं नाहींशीं झालीं? सरकारचा स्वभाव तुह्मांस माहीतच आहे. चकमक ती. विस्तव पडण्यास काय उशीर आहे? असल्या प्रसंगीं आपल्यासारखीं शांत माणसें जवळ पाहिजेत तीं कशासाठीं? संवाद लौकरच आटपला ह्मणून कांहीं बरें, नाहीं तर

येथें आणखी काय शब्द तोंडांतून बाहेर येणार होते कोण जाणे? प्रसंग आल्यास आपण कांहीं तुकडा पाडून देण्यास कमी करणार नाहींत. बरें आतां झालें तें झालें. तें कांहीं परत येत नाहीं. साहेबांचे बंगल्यावर अद्याप आपल्यास जायचेंच आहेना? तेथें गेल्यावर साहेबांची नीट समजूत पाडा. नानाः—आपण आतां काळजी करूं नये. ह्या गोष्टीचा संशय साहेबांच्या मनांत काय आला हें मी अद्याप चांगलें समजलों नाहीं. अगोदर या कामांत साहेबांस इतका राग कां आला याचें कारण माझ्या लक्षांत येत नाहीं. तथापि माझा यत्न किती सफळ होतो तो पाहूं या. साहेबांच्या बंगल्यावर जाण्याची वेळ आली. त्या उभयतांनीं आजाराच्या सबबीनें कोठीवर (बंगल्यावर) जाणें टाळलें. नानांस तेथें गेलेंच पाहिजे होतें. ते निघून गेले. बंगल्यावरही साहेब फार घुश्शांतच होते. साहेब ह्मणतातः—नाना! या राजद्रोही खटपटीची हिंदुस्थानसरकार क्षमा करतील असें वाटत नाहीं.

नानाः—यांत माझी बराबर समजूत होत नाहीं, पण आमचें हिंदुस्थानसरकार येथेंच आहे. आपण मनांत आणाल तसें होईल. मुठींत सांपडलेला टोळ मारणें असल्यास मूठ दाबावी नाहीं तर सोडावी.

साहेबः—एका वर्षामध्यें खंडोगणती शिसें ह्या राज्यांत खपलें ह्मणतात. सर्व पूल आणि तलाव वगैरेकरितां, हें असंभवनीय बोलणें कोणत्या शहाण्या मनुष्यास खरें वाटणार? शिवाय इंजनेरखात्याकडून आह्मीं याबद्दल शोध

करविला आहे, त्यावरून आमच्या समजास विशेष दृढीकरण होतें.

नानाः—पहिली गोष्ट अशी कीं, मी येथें येण्याच्या अगोदरची ही खरेदी आहे, ह्मणून त्यांनीं मराठी टिपण दिलें, त्या धोरणानें मीं आपल्यास पत्र लिहिलें, यांत माझा अपराध काय? नेटिव लोकांची इमारती बांधण्याची रीत अलीकडील धोरणाशीं पाहूं गेलें असतां अगदीं भिन्न आहे हें साहेबांचे लक्षांत असेलच. इकडील लोकांच्या समजुतीप्रमाणें इमारतीची बळकटी ती बांधण्याच्या हेतूवर अवलंबून नसतां बांधणाराच्या ऐपतीवर अवलंबून असते. कधीं कधीं अशीं उदाहरणें साहेबांच्याही पाहण्यांत आलीं असतील. कितीएक ठिकाणीं इमारतीचे पाये वाजवीपेक्षां फाजील खोल खणून हव्यासानें आंत फारच मजबुती करतांना माझ्या पाहण्यांत आलें आहे, तर अशा बड्या संस्थानामध्यें इतकें शिसें खरेदी झालें एवढ्यावरूनच तें राजद्रोहाचे हेतू तडीस नेण्याकरितांच असेल असें ह्मणणें सर्वांशींच खरें धरणें आपल्यासही विचाराअंतीं पसंत पडणार नाहीं व यथार्थेही वाटणार नाहीं. कर्त्या पुरुषाचे मनांत कल्याण करावयाचें आलें पाहिजे, मग त्यास कारणें विपुल सांपडतात. ‘वाहत्या गंगेंत हात धुण्याची ही संधि आहे. आपण जाणतांच, नवीन देऊळ बांधण्यापेक्षां जीर्णोद्धार करण्याचें विशेष पुण्य आहे.’ साहेबः—पुरे, पुरे, आपले बोलण्याचा आशय मी समजलों. पण “ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी” असें तर आपलें नाहींना?

नानाः—राग नसावा. हें आपलें ह्मणणें वावगें नाहीं.

साहेबः—नानासाहेब! आपले इतके कोते विचार असतील असें माझ्या स्वप्नींही आलें नव्हतें. एकून तुह्मी आपलपोटेपणा करूं पहातां. सार्वजनिक हिताची हानि करून स्वहित साधावें असें आपलें ह्मणणें आहे काय?

नानाः—सार्वजनिक हित हें स्वहिताचें दुसरें नांव मात्र आहे. या दोहोंची एकमेकांमध्यें इतकी गुंतागुंत आहे कीं, प्रत्येकाला कोणतेंही नांव दिलें तरी चालेल. आत्म-हितांत परहानि होत आहे तर तें खरें आत्महितच नव्हें, व परहित करण्याच्या हिय्यामध्यें जर स्वार्थ साधतां येत नसला तर परमार्थाच्या गोष्टी व्यर्थ आहेत. तात्पर्य, न्यायाचें तत्व मनुष्यानें दृढतम बाळगलें ह्मणजे सर्व कांहीं साधतें. भेद कांहीं राहिल्यास केवळ शाब्दिक तेवढा राहतो.

साहेबः—नाना! वाद्यामध्यें मी आपणांस उद्दे-शून जे कांहीं कठोर शब्द बोललों ते सर्व महा-राजांना लागून होते. "लेंकी बोले नि सुने लागे" असा प्रकार करणें आह्मांस या राजकीय प्रकरणामध्यें फार जरूर पडतें. आपल्या मनास खेद वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. आतां हें शिसेंप्रकरण शेवटपर्यंत नेऊं नये असा आपल्या बोलण्याचा आशय दिसतो, तत्संबंधीं माझे विचारही आतां आपल्यासारखेच झाले आहेत. ही सर्व गोष्ट जर संशयात्मकच आहे असें तुमच्या बोलण्यावरून मलाही वाटूं लागलें आहे तर हें सर्व प्रकरण एथच्या-एथेंच विझवावें हें बरें. परंतु नाना! एतद्देशीय राजांना

वेळच्यावेळीं कह्यांत ठेवणें अगदीं अवश्य आहे. जेथच्या तेथेंच त्यांची नांगी मोडून टाकिली पाहिजे, ह्मणून हें प्रकरण मीं पुढें नेण्याचा बेत रहित केला हें महाराजांस कळवूं नका, कारण त्यांना जरब बसणें जरूर आहे. हें प्रकरण आंतल्याआंतच विझालें.

इंदूर मुक्कामीं रावबहादुर नाना असतां त्यांच्या सदय हृदयाचें आणखी एक उदाहरण वाचकांस कळविण्याजोगें आहे. या गोष्टीवरून लक्षांत येईल कीं या सत्पुरुषाचे मनांत आपल्या नांवाची लोकांत टिमकी वाजवावी व लोकांचें नुकसान करून सरकारची मर्जी संपादावी असें स्वप्नींही नसे, इतकेंच नव्हे, पण साहजिक नांवाचा डंका होण्याची वेळ आली असतांही ती आपल्या सद्वर्तनाच्या ओघाच्या सपाट्यानें नाना हरप्रयत्न करून घालवून टाकीत; असें अनेक वेळां घडून आलें आहे व ह्मणूनच इतर कितीएक खटपटी लोकांचीं नांवें इंग्रजी भाषेंतील अक्षरांनीं मंडित झालेलीं आढळतात, त्याप्रमाणें आमच्या सत्वशील नानांचे नांवावर जडावाचें काम न होतां तें जसेंच्यातसेंच अक्षरशत्रु व अक्षरशून्य राहिलें आहे.

सत्तावन सालीं बंडाची धामधूम चालली असतां उत्तरहिंदुस्थानामध्यें एका मनुष्यानें बरीच बंडाळी केली. तो बेणी माधव या नांवानें त्यावेळीं लोकांस माहीत झाला. त्यानें केलेली नासाडी लोकांच्या मनांतून फार दिवस गेली नाहीं. कालगतीनें लोकांना त्याच्या मारहाणीचा विसर पडत गेला, तरी कांहीं तद्देशीय ज्ञातारे लोक

इंदुरामध्यें होतेंच. त्यांस बेनी माधवाचें नांव कानीं पड-तांच थरकांप सुटत असे. परोक्ष व अपरोक्ष माहितीमध्यें जमीनअस्मानाचें अंतर असतेंच. अस्तु. आमचे रा० ब० तेथें असतां एक गृहस्थ भगवीं वस्त्रें परिधान करणारा बाह्यतः तरी साधुसंतरूपानें इंदुरांत आला. त्याला ओझेबुवा ह्मणत. हा गृहस्थ हिंदुस्थानी भाषा बोले हें सांगणेंच नलगे. अंगानें सडपातळ, दाढी लांब वाढलेली व जटाधारी, पायघोळ भगवी कफणी, हातांत किंवा पांघरूण शाल-जोडी, रामदासीथाटाची एक लहानशी रौप्यशोभित कुबडी, डोळे पाणीदार, नाक सरळ व भोंवया कमानदार, घनदाट दाढीमिशीच्या केंसांमध्यें पांढऱ्यांपेक्षां कुळकुळित केसांचाच भरणा फार, असा लांबट चेहरा, दुसऱ्याच्या मनाचे तरंग काय चालले आहेत, ते खोंचून पाहून दि-सतातसे पाहण्याचा यत्न करीत आहेसा दिसे. आधीं हिंदुस्थानी भाषाच लाघवी. त्यांत ती सुशिक्षित व ब-हुश्रुत मनुष्याच्या तोंडीं स्पष्ट वर्णोच्चारांमुळें श्रोत्यास फारच मोहक वाटे. तात्पर्य या बुवांकडे जाणाऱ्याये-णाऱ्यांची रात्रंदिवस मुंग्यांसारखी रव लागलेली असे. देवळांत जाणारे लोक सारेच परमार्थबुद्धीनें जातात असें होत नाहीं. त्यांमध्यें कांहीं साधु, कांहीं भोंदू, कांहीं उचले, कांहीं तोंड पाहणारे, व कांहीं "महाजनो येन गतःस पंथाः" या ह्मणीस अनुसरणारे लोक असता-तच. या बुवांकडे येणाऱ्यांपैकीं लष्करी खात्यांतील हिं-दुस्थानी लोकांचा भरणा फार असे. त्यांमध्यें एकाच्या मनांत हा बुवा मागें इंग्रज लोकांच्या हातून जीव घेऊन

पळालेला बेनी माधव असावा अशी कल्पना आली. ही गोष्ट चतुष्कर्णी होतांच षट्कर्णी होऊन शहरभर फोकलली. कितीएक लोक आह्मीं त्यास ओळखिला असें धडधडीत ह्मणूं लागले. संस्थानमार्फत त्या बुवास अटकावून चौकशी सुरू केली. बहुतेक लोकांचे व चौकशी करणारांचे अभिप्राय व ठराव बुवास प्रतिकूळच होत गेले. शेवटीं तो सर्व खटला कारभारीसाहेबांपुढें आला. नानांनीं या बनविलेल्या बेनी माधवाच्या कामांत मनाचा मोठेपणा, पोक्तता, खरी माहिती संपादन करण्याची हातोटी, व त्या माहितीचा सदुपयोग करण्याचा निश्चय, हे गुण अलोट दाखविले. उभय पक्षांकडील बहुतेक सारखा पुरावा होता. २९ वर्षांमागें पाहिलेल्या मनुष्यास विशेष सबळ कारण असल्याशिवाय तोच हा असें ह्मणणें ह्मणजे केवळ धाडसाचें काम होय. अशा मनुष्यास ओळखिला असें ह्मणणाराचाही कांहीं तरी अंतर्गत कुत्सित हेतु असावा. तसेंच २९ वर्षांमागें केलेल्या अपराधाबद्दल आज त्याचा प्राण घ्यावा असें ह्मणण्यासही नानांचें मन रुकार देईना. कितीएक लोकांनीं नानांचे कान फुंकण्याचा यत्न केला, पण असल्या सदोष वाऱ्यास आंत शिरण्यास वाटच मिळेना. कोणी सांगत;—नाना! या मनुष्यास बेनी माधव ठरविल्यास इंग्रजसरकार व इंदूरसरकार आपणांस पदवीधर करतील, तर ही संधि हातची घालवूं नका. सर्व गोष्टी खऱ्या पण एक गरीबाचा जीव व नांवापुढें जोडलेलीं इंग्रजी अक्षरें या दोन वस्तूंचें तोल नानांच्या ताजव्यांत

होईना. शेवटीं सर्वांचे विचार, कानउघाडण्या, उपदेश व सूचना एका बाजूस ठेवून कारभारीसाहेबांनीं धाडस केलें असें ह्मणणें जरी अप्रयोजक दिसतें तरी दुसरा शब्द आमच्यानें योजवत नाहीं. कारण त्या बुवाला बुवाच आहे असें ह्मटलें, ह्मणजे अग्नीला अग्नी व पाण्याला पाणी ह्मटलें असें वाचकांस वाटेल.

बेनी माधवप्रकरणांत नानांनीं केलेला ठराव तुकोजीराव महाराजांनीं पाहून नानांच्या सौजन्याचें व धैर्याचें मोठें कौतुक केलें. तुकोजीराव महाराज ह्मणजे मोठा नानाफडणीस असे. त्यांनीं विचार केला कीं हें शेण पडलें आहे खरें, आतां आपल्या आंगास डाग लागल्याशिवाय यांतून पार पडण्याची युक्ति ही नव्हे, तर या बुवास सोडून देण्याकरितां कारभाऱ्यांच्या लेखी अभिप्रायासह रेसिडेंटाकडे पाठवून द्यावा असा हुकूम केला. तदनुसार बुवास तिकडे पाठवून नाना स्वतः कांहीं निमित्त शोधून रेसिडेन्सीमध्यें साहेबांस भेटण्याकरितां गेले. अर्थात् साहेबांजवळ याप्रकरणीं गोष्टी निघाल्या, तेव्हां कारभारीसाहेबांच्या बोलण्यावरून असला अद्वितीय मनुष्य कसा आहे तो पाहण्याची इच्छा दुय्यमसाहेब मात्र त्यावेळीं तेथें होते त्यांस झाली. एजंटसाहेब बाहेर स्वारींत होते. कारभारी बंगल्यांतून बाहेर पडताहेत तों लष्करी अंमलदार त्या बुवास घेऊन आले. कारभाऱ्यांच्या वाणीनें अगोदरच साहेबांच्या मनरूपी जमिनीस पाणी लावून इतकी उत्तम कमावणी केली होती कीं, आपल्या हेतूंची लागवड करण्यास बुवास फा-

रशा अडचणी आल्या नाहींत. बुवानें खुद्द साहेबांजवळ-ही आपल्या बेनी माधवपणाच्या राहिल्याविषयीं खातरी केली व साहेबांचें मन विरघळून टाकिलें. त्याच्या पारमार्थिक पथाविषयीं मोहित होऊन साहेबांनीं कांहीं रोख रुपयांची रक्कमही बुवास दिली व आपल्या सहीचा एक लेख पुन्हां त्याच्याविषयीं कोणीं संशय घेऊं नये ह्मणून दिला. “एक डोळा मागितला पण देवानें दिले दोन”. बुवा इंदूर सोडून लागलेच चालते झाले.

तुकोजीराव महाराज यांस पुत्र दोन. ज्येष्ठ चिरंजीव शिवाजीराव ऊर्फ बाळासाहेब. या पितापुत्रांचें रहस्य नव्हतें; इतकेंच नव्हे पण बाळासाहेबांची वर्तणूक तुकोजीरावांस अगदीं आवडत नसे, ह्मणून बाळासाहेबांकडे संस्थानाच्या कारभारापैकीं कांहीं काम नव्हतें. बाळासाहेब पित्याला अगदीं पाण्यांत पहातात असेही उद्गार लोकांच्या तोंडीं ऐकूं येत. ह्यातान्याच्या मागें राज्याचे मालक आपणच या समजाच्या जोरावर कोणताही अधिकार नसतां कारभारामध्यें त्रासदायक व कधीं कधीं भयप्रद ढवळाढवळ पित्याच्या मर्जीविरुद्ध ते करीत. कांहीं कामदार या भावी राजाची अगोदरपासून मर्जी संपादण्याच्या उद्देशानें त्यांच्या अन्यायी कृत्यांस अनुकूल असें वर्तन ठेवीत असत. एक वेळ दोन तीन कामदारांवर बाळासाहेबांची गैरमर्जी झाली. त्या रोषाचा सूड घेण्यासाठीं बाळासाहेबांनीं कारभारी रा० बहादुर नाना मोरोजी यांस निरोप पाठविला कीं त्या कामदारांपैकीं एकास अजीबात कामावरून दूर करावा व बाकी

दोघांच्या इंदूर शहरांतून दूर दूर बदल्या कराव्या. न्याय्य कृत्य करण्यानें आपणांवर एखादें विवक्षित संकट येऊं पाहणार अशी खात्री असली तरी त्यामध्यें उडी घालण्यास नाना कधीं तिळप्रायही भीत नसत. होळकरगादीच्या भावी मालकास कारभाऱ्यांनीं रोकड जबाब पाठविला कीं आपण नमूद केलेल्या त्रिवर्ग कामदारांच्या नेमणुका खुद्द महाराजांनीं केल्या आहेत. त्यांची कामांत कोणत्याही प्रकारची तकशीर आमच्या नजरेस आली नाहीं, तर निरपराधी मनुष्यास शिक्षा करणें ही गोष्ट आमच्या हातून होणार नाहीं. या खरमरीत जबाबाचा बाळासाहेबांस अर्थातच फार राग आला. त्यांनीं पुन्हां कारभाऱ्यांस निरोप पाठविला कीं आपण आमचें न ऐकाल तर तुमचें आमचें पटणार नाहीं. कारभाऱ्यांनीं इतक्यावर तरी थांबावयाचें होतें, पण सत्याचें पाठबळ असलें ह्मणजे कृतांतकाळाचेंही भय धरण्याचें कारण नाहीं असें मनांत आणून रा० ब० रांनीं युवराजास कळविलें कीं न पटल्यास आपल्या घरीं जाऊन ईश्वरकृपेनें आह्मांस अर्धी भाकर मिळाली आहे, तिनेंच संतोष मानून घेऊं.

पुढें तुकोजीराव महाराज मधुमेहानें फार दिवसांचे आजारी होते, त्यांचा त्याच रोगानें अंत केला. वडिलांच्या मागें ज्येष्ठ पुत्र बाळासाहेब यांस गादी मिळेल किंवा नाहीं याविषयीं लोकांना वानवा वाटत असे. ग्रिफिनसाहेबांचें व बाळासाहेबांचें फार चांगलें होतें असेंही ह्मणतां येत नसे, ह्मणून खुद्द बाळासाहेबांसही

त्याजबद्दल धास्ती नव्हती असें नाहीं असें ह्मणत. तथापि, " कर्मणो गहनो गतिः " याप्रमाणें ग्रिफिनसाहेबांच्या अकस्मित अपूर्व कृपाप्रसादेंकरून बाळासाहेबांस गादी मिळाली. हातीं अधिकार येतांच आपल्या वडिलांनीं परोपकाराच्या निरनिराळ्या कामांकरितां निवडक त्या त्या कामास योग्य अशीं माणसें हरप्रयत्नानें जवळ बाळगून ठेविलीं होतीं त्यांची एकामागून एक उचलबांगडी करून हातीं नारळ देण्यास आरंभ केला. स्थानिक हायकोर्टाचे न्यायाधीश रा० गरुड, लष्करीखात्याचे मुख्य बापूसाहेब रेशीमवाले वगैरे शेलक्या माणसांनीं आपापले बहुतेक जन्म इंदूरच्या नोकरींत घालविले, त्यांस एका निमिषामध्यें किंचित् मात्र खेद न वाटतां हातानिराळे केले. कांहीं दिवसांनीं पुढें रावबहादुर नाना मोरोजी, वडिलांनीं पसंत केलेले कारभारी, यांच्याकडे नजर गेली.

इंग्लंडच्या इतिहासामध्यें पांचव्या हेन्रीची गोष्ट वाचकांस अवगत असेलच. एके दिवशीं युवराजाच्या एका सहचरानें गुन्हा केला, व त्याला मुख्य न्यायमूर्ती गॅस्कनी यां समोर उभा केला. हें युवराज हेन्री यांस सहन न होऊन त्यांनीं भरकोर्टांत आपला खंजीर उपसला व कोर्टाचे कामास अडथळा करण्याकरितां पुढें सरसावले. कैदीस मुक्त करण्याविषयीं भावी राजेपणाच्या जोरावर न्यायाधीशांस दर्डवून सांगितलें. न्यायमूर्ती गॅस्कनीनें आपलें कर्तव्य न विसरतां, व न्यायासनापुढें राजा व रंक समान कल्पून राजपुत्रास तुरंगांत पाठविलें. या त्यांच्या

धैर्याबद्दल पांचव्या हेन्रीनें गॅस्कनीचा गादीवर आल्यानंतर योग्य सन्मान केला व आपल्या पित्याच्या वेळीं असे निखालस न्यायाधीश होते, तें भाग्य आपल्यास नाहीं ह्मणून खेद दर्शविला. त्याचप्रमाणें. एके दिवशीं बाळासाहेब महाराजांनीं प्रसंगास योग्य असें दरबार भरून पांचहजार रुपये व कारभाऱ्यांना योग्य असा पोषाख नजर करून आमच्या नायकांस ह्मणतातः—नाना! आपण अगदीं पूर्ववयांत नोकरीस आरंभ केला असें दिसतें, व अगदीं नाहीं तरी ३०।३५ वर्षें इंग्रजसरकारची अव्याहत चाकरी केली. आपले हुद्देही मोठ्या जबाबदारीचे होते. पुढें आपल्या फार दिवसांच्या अनुभवापासून व विद्वत्तेपासून आपल्या प्रजेचें हित करून घेण्याकरितां येथील महाराजांस तुह्मांस तुमच्या वार्धक्यामध्यें या संस्थानशकटास जुंपणें योग्य दिसलें. दुर्दैवानें घाला घालून आपलें कुटुंब व दिग्गज पुत्र आपल्या विस्तीर्ण परिवाराचा भावी आश्रय काळाच्या स्वाधीन केला ह्मणून आह्मीं आपणांस इतउपर त्रास द्यावा हे उचित दिसत नाहीं. आपला हा विराम घेण्याचा वेळ आहे, तर इंदूरसंस्थानाचें हें मोठेंच दुर्भाग्य. यावर नानांनीं उत्तर केलें:—मला अद्याप खुशाल काम करण्याचें सामर्थ्य आहे, तथापि आपली मनीषा मला निरोप देण्याची असल्यास, तेंही बरें. यावेळीं गेल्या अनपेक्षित एकाएकीं घडलेल्या घाऱ्यामुळें नानांचेंही मन उद्विग्न होऊन अस्वस्थ झालें होतें. राहिलेला काळ बाकीच्या कुटुंबामध्यें घालवून परमार्थसाधन साधल्यास संपादावें अशी उत्कंठा नानांस

या वेळीं फार झाली, व मुंबईस परत यावयाचा निश्चय झाला. यावेळीं ग्रिफिनसाहेबांनीं स्वदस्तूरचें एक पत्र पाठविलें आहे त्यामध्यें कारभाऱ्यांची हुशारी, प्रामाणिकपणा, व निस्पृहतेची ढळढळीत साक्ष आहे. यानंतर पुन्हां एक वेळ ग्रिफिनसाहेब मुंबईस आले असतां नानांच्या घरीं आपण होऊन आले होते, त्यावेळीं सर्व कुटुंबांतील माणसांचा पृथक् पृथक् परामर्ष घेऊन कांहीं वेळ कुशलवृत्ताच्या गोष्टी बोलून गेले. नाना मुंबईस आल्यावर सर मंगळदास नथुभाई यांजकडे पूर्ववत् रोज जात असत. सर मंगळदासांच्या मागें ते त्यांच्या जिनगीचे ट्रूस्टी शेवटपर्यंत होते. प्रस्तुत यांचा व्यासंग ह्मणजे संसारसंबंधीं काम व ऐहिक व पारमार्थिक वाचन सकाळीं ७ पासून रात्रीं १० वाजेपर्यंत अव्याहत चालतें असे.

'मागें पाय येऊं लागला ह्मणजे चोहोंकडून येतो.' नाना दरबारांतून परत आले व त्याच रात्रीं त्यांचे वडील चिरंजीव, कृष्णराव ऊर्फ बाबा यांस अकस्मात् देवाज्ञा झाली. तथापि दहा दिवसांचे आंत नाना मुंबईस येऊन ठेपले. किती दृढनिश्चय हा! आणि काय शांतवृत्ति ही!!

---

## भाग १४.

## नानांच्या कुटुंबाची रचना व त्यांचा सार्वजनिक सुधारणेशीं संबंध.

नानांचें लग्न झाल्यावर सुमारें दोन वर्षांनीं उभयतां एकत्र राहूं लागलीं व तेथपासून त्यांचा गृहस्थाश्रम

झाला. यांच्या पत्नीचें नांव सत्यभामा व माहेरचें नांव कृष्णाबाई होतें. यांच्या ज्ञातीमध्यें पूर्वीं मुलींचीं नांवें ह्मटलीं ह्मणजे मोठमोठ्या नद्यांचीं किंवा पुराणप्रसिद्ध स्त्रियांचीं असत, पण तें मान अलीकडे अगदीं बदलून गेलें आहे. अलीकडील नांवें ह्मणजे नानीबाई, चंपूबाई, कमळाबाई, पुतळाबाई, सोनाबाई, सोकरबाई, इ०. या बाईच्या निश्चयासारखें फळ तिजला ईश्वरानें दिलें. हिच्यासारख्या भाग्यवान् बायका आमच्या पाहण्यांत फार थोड्या आल्या व आमच्या वाचकांसही बहुधा अ-सेंच ह्मणावें लागेल. हिंदुलोकांमध्यें मुलींचीं बाळंतपणें ऐपतीप्रमाणें माहेरीं करण्याची चाल आहे. माहेरघर गरीब असल्यास पहिलें बाळंतपण तरी करतात. निदान श्रीमंत मुलगी आपल्या खर्चानें तरी आईच्या घरीं बा-ळंतपणास जाते. आमच्या सत्यभामाबाईचा निश्चय होता कीं, "सुई तिकडे दोरा," आपला पति तिकडे आपण. नानांनींही तिच्या मर्जीविरुद्ध वर्तन शेवटपर्यंत केलें नाहीं. बायकांचें बाळंतपण ह्मणजे केवळ प्राणां-तिकाचा प्रसंग; किंबहुना त्याहूनही अधिक. बालकाची आस्था आणि मरणाचें भय, हे दोन मनोविकार त्यावेळीं बलवत्तर होऊन त्या अबलेची ओढाताण करीत असतात. बाळंतिणीचें दुःख बाळंतिणीलाच माहीत, वांझेस काय ठाऊक? अस्तु, असले तेरा प्रसंग कृष्णाबाईनें आपल्या पतीसमागमें परदेशीं काढले. या साध्वीस एकंदर अ-पत्यसमूह आठ पुत्र व पांच मुली असा होता. इह-लोकींच्या संसारामध्यें नानांस योग्य भागीदारीण ही स्त्री

मिळाली होती. नानांचा जमाखर्च ती स्वतः आपल्या हातानें ठेवीत असे.

घरांतील चाकरमाणसें, आप्तवर्ग, मुलें, सुना वगैरे कुटुंबास ती एकाच प्रेमभावानें वागवीत असे. या बाईनें एखाद्या चाकरास काढिलें असें आमच्या पाहण्यांत व ऐकण्यांतही नाहीं. इतकेंच नव्हे, पण एखादा चाकर बदली देऊन रजा घेऊन गेला, रजा संपून आल्यावर बदलीस जा ह्मणून उभयतांपैकीं कोणाच्यानेंही सांगवेना. याप्रमाणें यांचा परिवार फार वाढलेला असे. यांच्या घरामध्यें कांहीं चाकर नानांच्या वयाचे होऊन वारले व त्यांचे पुत्रपौत्र नानांच्याच घरीं कित्येक दिवस नांदले. एक नानांच्या नातवंडास ह्मणतो कीं "मी सायबासनीं शाळेंत पोंचवीत असें, तवा त्यांनीं नाय असा दुवाडपणा केला." नानांच्या घरांतील चाकरांचा समुदाय ह्मणजे "अठरा धान्यांचें कडबोळें." बाणकोटचे कुळंबी, कोंकणी मुसलमान, घांटी, मराठे, उत्तरहिंदुस्थानी पुरभय्ये, सुरती गुजराथी. अलीकडे इंदुराहून परत आल्यावर या समूहास आणखी भर पडली आहे. यांच्या घरीं मुलांस शिकविण्याकरितां येणाऱ्या मास्तरांची संख्या पंधरांपर्यंत वाढलेली आमच्या पाहण्यांत आहे. यांचें कुटुंब पाहून आह्मांस 'गोल्डस्मिथचे व्हिकार' कादंबरीचीं आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. मास्तरांचा व इतर चाकरांचा पगार पहिल्या दोन तीन तारखांच्या आंत व्हावयाचा. कितीएक मास्तरांचा पगार त्यांच्या चांगुलपणावर किंवा त्यांस मदत करण्याच्या हेतूनें देत

असत. आपल्या मुलांचें हित किती होतें याजकडे तादृश लक्ष नसे, असें ह्मटलें तरी चूक होणार नाहीं. हा पगार प्रत्येकीं २ पासून ३० रुपयांपर्यंत आमच्या पाहण्यांत आलेला आहे. प्रत्येक मुलाच्या विद्येसाठीं दरमहा दहांपासून शंभर रुपयांपर्यंत नानांनीं खर्च केलेला आमच्या पाहण्यांत आहे. नानांचे द्वितीय चिरंजीव विलायतेस विद्याभ्यासाकरितां पांच वर्षें होते. बारिस्टरची परीक्षा देऊन ते मुंबईमध्यें काम करीत असत. यांच्याकरितां तर दरमहा सुमारें ३०० रुपये नाना पाठवीत असत. हा मुलगा अभ्यासी असल्यामुळें आईबापांचा विशेष लाडका असे. यानें विलायतेस जाण्याची उमेद दाखविली, तेव्हां मोठी अडचण मातोश्रीची परवानगी ही वाटत होती. यावेळीं याचें वय १७ वर्षांचें होतें, व त्याची पत्नी गरोदर होती. अशावेळीं विलायतेस जाण्यास मातोश्रीचें अनुमोदन पडेना, पण पितापुत्रांनीं तिची समजूत घातली. तीही फार दृढनिश्चयाची बायको, आपलें सर्व दुःख गिळून मुलास पाठविण्यास तयार झाली. याचप्रमाणें आणखी एकवेळ तिनें पोक्त विचार दाखविला, त्यावरून या गृहिणीची कुटुंबव्यवस्था करण्याची योग्यता सहज दिसून येते. नानांस इंदूरची दिवाणगिरी पतकरण्याविषयीं पाचारण आलें त्यावेळीं अनेक कारणांमुळें, व विशेषेंकरून त्यांच्या थोडक्यांत संतोष मानून घेण्याच्या निसर्गामुळें ते इंदुरास जाण्याची नाराजी दाखवीत असत. पण त्यांच्या पत्नीनें बुद्धिवाद करून नानांचीं विरुद्ध कारणें अगदीं मोडून टाकिलीं व

इंदुरास जाण्यास मुख्यत्वेंकरून तीच कारणीभूत झाली. हिच्या हाताखालीं सुना कोणत्या व मुली व बहिणी कोणत्या हें परक्यास ओळखणें दुरापास्त असे.

अलीकडे ज्यास सुधारणा ह्मणतात त्यास नानांची कांहीं मदत लोकांमध्यें प्रसिद्धीस आलेली दिसत नाहीं, यावरून नानांना जुन्या मताचे अनुयायी असें ह्मणणें प्रशस्त होईल कीं काय? याचा निर्णय आह्मी कांहीं घटित गोष्टी खालीं देतों त्यांवरून वाचकांस सहज करितां येईल.

पुनर्विवाहोत्तेजक मंडळीचे नाना सभासद झालेले आढळत नाहीं, व हा पक्ष आह्मांस अवश्य पाहिजे किंवा नको असेही प्रसिद्ध उद्गार कोठें आढळत नाहींत. तथापि मुंबईमध्यें आजपावेतों जे पुनर्विवाह झाले त्यांतील बहुतेकांस नानांनीं तन, मन, धन खर्चीं घातलेलें आढळतें. प्रत्येक वेळीं नानांनीं पट्टी भरलेली आढळते. भोजनसमारंभासुद्धां नाना तेथें बिनचूक हजर असत, यामुळें दंग्याधोप्यासंबंधें “सुंठीविना खोकला गेला” असें त्या मंडळीस वाटे. मोरोबा कान्होबा हे गृहस्थ यांच्या ज्ञातीमध्यें विद्वान्, पराक्रमी व पैसेवाले होऊन गेले. यांनीं पुनर्विवाहास केवळ उत्तेजन देण्याकरितां वृद्धापकाळीं आपण स्वतः एका विधवेशीं लग्न केलें. त्यावेळीं त्यांच्या ज्ञातिगृहस्थांनीं फार जोर धरला व त्या वधूवरांखेरीज त्यांचें त्यांच्या ज्ञातिगृहस्थांमध्यें कोणी नाहींसें झालें. यांचे खोगीरगणतीचे कंठाळभर स्नेही ह्मणविणारे लोक होते, पण अंतींचा कोणी नाहीं. भोजनाचें

आमंत्रण घेऊन कपाळ दुखतें, पोट दुखतें, काम आहे, वडील रागें भरतील, बायको ऐकत नाहीं अशा पोरकट सबबी सांगून वधूवरांच्या पंगतीस बसावयास कोणी आला नाहीं. नानांनींही न जावें अशी मध्यस्ती करण्यास कितीएक यत्न करीत होते, पण नानांनीं मोठें धैर्यानें उत्तर केलें कीं मी आमचे स्नेही मोरोबा कान्होबा यांस अंतर देणार नाहीं असें वचन दिलें आहे. मी त्यांचे पंगतीस जेवल्याबद्दल कोणतेंही संकट आलें तरी तें भोगण्यास राजी आहें. नाना पहिल्यानें पुढें भोजनास सरसावले ह्मणून मागाहून कांहीं लोक त्या कळपास जाऊन मिळाले. या वधूवरांचा शेवट लौकरच फार शोचनीय झाला. उभयतांचीं प्रेतें एके ठिकाणीं बांधलेलीं विहिरींत सांपडलीं. मोरोबांचा परिवार मोठा होता. त्यांचें उत्तरकार्य त्यांचे अपत्यमंडळीस योग्य दिसलें त्याप्रमाणें केलें. परंतु त्या पुन्हां संपादन केलेल्या सौभाग्यधारिणी सतीस स्मशानमित्रही कोणी राहिले नाहींत असें नानांनीं पाहून तिच्या उत्तरकार्याचा पुढार आपण घेतला.

मुंबईमध्यें कांहीं लुबऱ्या लोकांनीं "बालविवाहनिषेधोत्तेजक" मंडळी स्थापन करून आपण सुधारक ह्मणून लोकांपुढें यावें असा हेतु मनांत धरला. एक थोटा पिंपळ पुढें होऊन नानांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें ह्मणून भेटीस गेला आणि आपल्या भावी सभेचे उद्देश सांगून अध्यक्षस्थान स्वीकारण्यास विनंति केली. नाना ह्मणतातः—अहो! चोरास चोरी करणें हें चांगलें कीं वाईट? असा प्रश्न केला तर तो चांगलें व हाच उपजीवनाचा

उत्तम मार्ग असें कधीं सांगणार नाहीं. तथापि सुधारलेल्या राष्ट्रांमध्येंही चोऱ्या होतात, ह्मणून सभा करून व्याख्यानानें चोऱ्या बंद होणार नाहींत. आतां चोरीचें उदाहरण बालविवाहाला सर्वांशीं लागू पडणार नाहीं, तथापि यामध्येंही बराच भाग तशा प्रकारचा आहे. प्रस्तुतकाळीं शेंकडा नव्याण्णव आईबापें लहान मुलांचीं लग्नें करणें हें चांगलें नाहीं असें ह्मणणारीं सांपडतील. बोलण्याप्रमाणें चालणें होत नाहीं एवढाच काय तो दोष राहिला आहे. तो सभेच्या हातून दूर होईलसें वाटत नाहीं. "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें." तुमच्या कळपांत येतील तेवढ्यांना तुह्मी तुकारामबुवा करूं इच्छितां बरें. उद्देश फार चांगला आहे.

उ० या भावी सभेचा उद्देश केवळ व्याख्यानें देण्याचा नाहीं. सर्व सभासदांनीं लहान मुलांचीं लग्नें करणार नाहीं ह्मणून शपथा वहाव्या, आणि होईल तितकी मंडळी आपल्या मताप्रमाणें शपथ वाहण्यास तयार करावी.

नाना०—सभेमध्यें लोकलज्जेस्तव शपथा वाहून किंवा नुसतीं व्याख्यानें ऐकून आपला उद्देश फारसा तडीस जाईलसें वाटत नाहीं. कांहीं थोड्या लोकांचीं लहानपणीं लग्नें करण्याची वहिवाट दिसते पण तो प्रकार चांगला आहे, अशा समजानें करतात असें नाहीं. अनेक कारणांवरून तसें करणें कित्येक लोकांस भाग पडतें. आपल्या हिंदूलोकांमध्यें मुलींनीं अविवाहित राहणें ह्मणजे अधर्माचरण आहे; अशा समजानें वृद्ध बाप आपल्या डोळ्यांदेखत मुलीच्या कर्जांतून मुक्त कसा होईन या

विवंचनेंत असतो. ऐहिक स्थितीच्या संबंधानें ह्मणा अगर धर्मसंबंधी चालीप्रमाणें ह्मणा, कित्येक मुलींचीं लग्नें त्यांच्या भावंडांच्या लग्नांवर अवलंबून असतात. अशा कोणास काय अडचणी पडतात त्या सांगतां येणार नाहींत. "पाण्यामध्यें मासा राहतो कैसा, जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे." हिंदुलोकांच्या प्रस्तुत स्थितीमध्यें जाणत्या लोकांनीं करण्यासारखा एकच इलाज दिसतो. लग्नासाठीं त्यांनीं आपलीं मुलें वाढविण्यास यत्न करावा आणि अशिक्षित लोकांस उदाहरणें घालून द्यावीं. त्या उदाहरणांचा लोकांवर जितका परिणाम होईल तितकें कार्य व्याख्यानांनीं व शपथांनीं होणार नाहीं. साधारण लोकांची विद्याचारसंपन्नता ज्या मानानें वाढत जाईल, त्या मानानें आपल्या रीतीभातींमध्यें सहजच फेरफार होत जाईल, तर साधारण लोकांच्या शिक्षणाची तजवीज, हें प्रस्तुत पहिलें काम आहे.

योद्धीला उत्तेजन न देतां उलट धैर्य खचण्यासारख्या गोष्टी सांगणारा सारथी आपल्या रथावर कामाचा नाहीं असें त्या आलेल्या गृहस्थास वाटून ते मुकाट्यानें परत गेले.

नानांनीं आपल्या सर्व मुलींचीं लग्नें १२ वर्षांच्या वयानंतर केलीं. नानांच्या घरांतील सर्व मुलींना व सुनांना चांगल्याप्रकारचें मराठी व इंग्रजी शिक्षण मिळालें आहे. मुलांच्या विद्येसाठीं जसे घरीं मास्तर येतात, तसेच मुलींच्या विद्याभ्यासासाठीं परद्वीपस्थ स्त्रियांची योजना अद्याप आढळते. नानांच्या कित्येक सुनांनीं व मुलींनीं

लिहिलेलें इंग्रजी पाहून उदार शिक्षणाच्या घरांत यांचा अभ्यास गेला आहे असें सहज लक्षांत येतें.

नानांला स्वभावतः समाजापुढें आपलें नांव मिरविणें आवडत नसे, हें वाचकांच्या केव्हांच लक्षांत येऊन गेलें असेल; तथापि आपण पुढार घेतल्यानें समाजाचें वास्तविक हित खरोखर होण्याचा संभव दिसत असल्यास आपला अंगस्वभाव एकीकडे ठेवून तें काम उत्सुकतेनें मनापासून करण्यास नाना पुढें सरसावत. यांच्या ज्ञातींतील अनाथ विधवा व शिक्षाग्राही मुलें यांस कांहींतरी सामाजिक मदत व्हावी या हेतूनें एकापेक्षां अधिक वेळां यत्न या ज्ञातींतील उद्योगी व उदार मनाच्या गृहस्थांनीं केले, पण यश आलें नाहीं. या अपयशाचा परिणाम लोकांमध्यें फारच अनिष्ट झाला. असला पुन्हा यत्न करूं इच्छिणाऱ्या गृहस्थांवरची श्रद्धा लोकांमध्यें अगदीं नष्ट झाली. अशा प्रकारच्या यत्नारंभींच दुफळ्या काय नि तिफळ्या काय, एकाचें तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे होऊन कित्येक लोकांच्या सदुद्देशांचें वारा-पाणी होऊन जाई; अशाप्रकारची मंडळी असावी असें दीर्घदर्शी पुष्कळ पुरुषांचे मनांत येई, पण वजनदार, विद्वान्, लोकप्रिय आणि हरतऱ्हेनें आपसांतले बारीक-सारीक तंटेबखेडे मोडण्यास समर्थ असा पुरुष कोण पुढारी करावा, याबद्दल बऱ्याच लोकांचें मन हताश होत असे. कोणी अपयशास भिऊन माघार घेत. कोणी पैसेवाले असून लोकप्रिय नव्हते. कोणास कांहीं, कोणास कांहीं, प्रत्येकांत व्यंगोक्ति काढीत. रावबहादुर

नाना मोरोजी या कामासाठीं त्यांच्या ज्ञातिगृहस्थांस सकलगुणालंकृत वाटत; परंतु नाना ह्मणजे आधींच ना, ना, तशांत अविच्छिन्न संसारसुख भोगीत असतां एकाएकीं एकामागून एक आलेल्या अपायांनीं नानांच्या मनास विशेष अस्वस्थता आली असावी असें अज्ञ लोक अनुमान करीत. शेवटीं पुढारी लोक जमून नानांकडे आले व अशाप्रकारच्या भावी सभेची आवश्यकता दाखवून अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं विनंति केली.

समस्त ज्ञातीच्या हिताकडे लक्ष पुरवून आपल्या हातून फूल नाहीं फुलाची पाकळी स्वज्ञातीची सेवा करावी आणि ती होण्याचा संभव दिसतो असें पाहून व कांहीं ठळक ठळक ज्ञातिगृहस्थांकडे बोटें सन्मानदर्शनार्थ दाखवून लोकांनीं दिलेला मान नानांनीं स्वीकारिला. या सभेच्या भरभराटीविषयीं विशेष सांगणें नलगे. प्रस्तुत ती वर्तमानपत्रद्वारें प्रसिद्ध होतच आहे. या सभेमध्यें हृदयभेदक, वजनदार व पोक्त विचार नानांच्या तोंडचे ऐकून बहुतेक सुज्ञ गृहस्थ विरघळून जात असत. कितीएक मोकळ्या मनाचे लोक सद्गदित अंतःकरण होऊन प्रांजलबुद्धीनें नानांपाशीं स्वतः येत व त्यांच्या अपूर्व भाषणाचा परिणाम आपल्या मनावर काय घडला तें उघडपणें बोलून दाखवीत. अलीकडे या सभेच्या मार्फत कितीएक गरीब अनाथ कुटुंबांस मदत होत असते.

हिंदुस्थानसरकाराच्या कायदे करणाऱ्या सभेपुढें संमतिकायद्याचा खरडा विचाराकरितां पुढें आला होता, तेव्हां सर्व हिंदुस्थानभर हिंदुमुसलमानज्ञातीं-

मध्यें फार गवगवा झाला. ह्या जातींमध्येंही मतभेद होऊन दोन पक्ष झाले ह्मणा किंवा होते, त्यांनाच अधिक स्पष्ट रूप मिळालें असें ह्मटलें तरी चालेल. या खरड्याचा आशय " नवऱ्याशीं संभोग करण्यास बायकोची कबुली कायदेशीर दहा वर्षांपासून पुढें धरावी असा पूर्वी कायदा होता, ती इयत्ता आतां १२ वर्षांपर्यंत वाढवावी असा होता. " एक पक्ष ह्मणत, हा व्यवहार कायद्यानें गुन्हा ठरवावा व विरुद्धपक्षाचे लोक ह्मणत कीं या कामांत सरकारचा हात नसावा. " पाहिजे " पक्षाकडच्या लोकांमध्यें प्रामाणिक व अप्रामाणिक अथवा साधु व भोंदू अशा दोन जाती होत्या असें दिसतें. कारण कांहींचें तत्व "येन केन प्रकारेण प्रसिद्धःपुरुषो भवेत्" होतें. कांहींना गौरवर्णास खुष करून ऐहिक हेतु तडीस न्यावेसें वाटे व अशा कायद्यापासून आमच्या लोकांचें खरें हित आहे असें मनापासून वाटून झटणारे लोक फार थोडे, निदान त्यावेळीं तरी दिसले नाहींत. आपल्या स्वतांच्या आठ वर्षांच्या मुलीचें लग्न लावून सोडलेले व ३०।४० वर्षांचे आपण १०।११ वर्षांचे मुलीबरोबर आमरणांत जखडून घेतलेले व १६ वर्षांचे आंत आपल्या बायकोस मातृत्व संपादनाचें साधन करून दिलेले आणि अशा मुलीच्या अर्भकास अंगावर दूध न मिळाल्यामुळें डाक्टरी अघोर उपाय करण्यास तयार झालेले लोक " पाहिजे " पक्षांमध्यें सुद्धां बहुत पाहण्यांत येतात. असो " नको " पक्षांतही अनेक प्रकार आहेत. धर्मसंबंधीं कामांत सरकारचा हात नसावा अशा मताचे लोक फार आहेत;

कारण विवाह व गर्भाधानविधि अगदीं सर्वांशीं धर्मविधि होत. पुत्रोत्पत्ति व तदनुषंगानें पित्याची मुक्ति हा विवाहाचा मुख्य हेतु होय. दुसऱ्या प्रकारचे लोक ते पाश्चिमात्य विचारसरणीस लुब्ध झालेले. यांचें ह्मणणें कीं ही अत्यावश्यक सुधारणा कायदेशीर शिक्षेनें लोकांच्या डोक्यावर डाळण्याचा यत्न करणें श्लाघ्य नाहीं. ती आपसांत समजुतीनेंच लोकांनीं केली पाहिजे; त्यास उपाय केवळ विद्यावृद्धि हाच होय.

तात्पर्य, सर्व देशभर "नको" व "पाहिजे" असे दोन पक्ष मुख्यत्वेंकरून झाले. उभयपक्षांच्या शहरोशहरीं सभा झाल्या व सरकारास आपआपलीं सकारण मतेंही कळविलीं. खेड्यापाड्यांतही "नको" पक्षाच्या चर्चा फार दिवस सुरू होत्या. पण मुंबईशहरीं या पक्षाची सभा होण्यास फार विलंब लागला. तथापि सर्व प्रकारच्या वर्तमानपत्रांतून धर्मदृष्ट्या, बहुलोकसमूह प्रकृतिदृष्ट्या, व देशांतील वस्तुस्थितिदृष्ट्या, "नको" पक्षानें रगडून ऊहापोह चालविला होताच. तथापि मुंबईसारख्या राजधानीच्या, नानाविधज्ञातिप्रचुर समूहाच्या व परोप्रकारच्या व्यापारनैपुण्याच्या शहरीं या पक्षाची सभा न होणें ही तरी मोठी अजब गोष्ट. सर्व लोक आपसांत वळवळत होते, पण वयोवृद्ध, विद्यावृद्ध, वजनदार, लोकप्रिय व धोरणी असा अध्यक्ष सांपडतो कोण या विवंचनेंत लोक पडले होते. रावसाहेब अण्णा मंडलिक तर अगोदरच निवर्तले होते ह्मणून सारी पंचाईत. कोणी या पक्षाचे कट्टे ऊहापोहपटु सर्जन मेजर

कीर्तिकर यांजकडे बोट दाखवीत, पण हे मुंबापुरस्थ नव्हेत व वयोवृद्ध नव्हेत. चुरचुरित लेखणीनें सणसणीत लेख सोडणारे खरमरीत पुण्यग्रामस्थ टिळक यांच्याही अंगीं तींच व्यंगें लोकांच्या डोळयांपुढें ढळढळीत दिसत होतीं. रावसाहेब कीर्तिकर अशा कामांत मुळींच पडावयाचे नाहींत. रा० ब० नाना मोरोजी यांच्यामध्यें वर निर्दिष्ट केलेल्या गुणांपैकीं एकही उणा नाहीं पण यांचें मन हें काम स्वीकारण्यास वळावें कसें? अलीकडे त्यांना वेदांताखेरीज कांहींच नको असें ह्मणतात. असो, पण या कायाद्यासंबंधें त्यांचें मत तरी काय आहे, त्याचा कोणास अंदाज आहे काय? त्यांचें मत—"नको" पक्षास अनुकूल असल्यास कांहीं तरी आशा आहे, नाहीं तर मनाच्या समजुतीविरुद्ध लोकांस खुष करण्याकरितां अथवा कशातरी उपायांनीं लोकांस आपल्या कच्छपीं नाचूं लावण्याकरितां अथवा कोणताही आपला हेतु तडीस नेण्याकरितां खात्रीनें ते वागणार नाहींत. तर अगोदर त्यांचें मत समजलें पाहिजे, मग त्यांचा पुढला विचार. पुढारी मंडळीपैकीं रा० साधल्यांनीं या गोष्टीचा खुलासा करण्याचें पतकरून दोन बरोबर वजनदार माणसें घेऊन त्यांच्या भेटीस गेले. भावी सभेचें अध्यक्षस्थान स्वीकाराल किंवा नाहीं असा रावबहादुरांस प्रत्यक्ष प्रश्न न करितां, या कामांत सरकारानें हात न घालावा हें बरें असा मंडळीनें आपला अभिप्राय प्रदर्शित केला. त्यांचाही अभिप्राय मंडळीच्या कार्यास प्रतिकूल पडला नाहीं, इतकेंच नव्हे पण मुंबईंत एक जाहीरसभाही

व्हावी असें मत दिसून आलें. ती वेळ गेल्यावर नानांच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें आपल्याकडे लोक आले होते त्यांच्या हेतूविषयीं ते बारीक शोध करूं लागले. आह्मीं त्यांस त्यांचा हेतु आपण अध्यक्षस्थान स्वीकारावें असा आहे, हें स्पष्ट सांगितलें. तें काम करण्यास ते आरंभीं नाखुष होते, कारण त्यांची खात्री होती कीं इंग्रजसरकार हा कायदा पास केल्याशिवाय रहाणार नाहीं एक व आपल्यास ह्मातारपणीं आतां ह्या उठाठेवीची गरज नाहीं. आतां पुढली वाट चोखाळण्यांत शांतपणें आपला काळ जावा अशी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे, ही दुसरी गोष्ट. याचप्रमाणें मंडळीस दुसऱ्या भेटीमध्यें स्पष्ट उत्तर नानांकडून मिळालें. त्यावर मंडळीचें ह्मणणें पडलें कीं आपल्या पहिल्या भेटीमध्यें आमचा समज झाला कीं आपला अभिप्राय "नको" पक्षास अनुकूल आहे व आपण अध्यक्षस्थान स्वीकारण्यास माघार घेणार नाहीं अशा समजुतीवर आह्मी बहुतेक तयारी करून आलों आहों.

माझ्या वर्तनावरून लोकांची समजूत माझ्या इच्छेविरुद्ध झाली असली तरी, अन्याय होत नसेल तर त्यांच्या समजुतीप्रमाणें चालण्यास मी मागें सरणार नाहीं, व एकप्रकारचा विश्वासघात होतांहोईपर्यंत मजकडून होणार नाहीं. हें काम पतकरलें तर प्रतिपक्षाचे लोक मला आपलेकडचा आहे असें समजताहेत ते नांवें ठेवतील व त्याच लोकांचें प्रस्तुत प्राबल्य आहे. कांहीं चिंता नाहीं. सरकारानें या कामांत हात घालूं नये असा माझा अभिप्राय आहे आणि तो अभिप्राय कोठेंही,

केव्हांही व कोणाहीपुढें बोलून दाखविण्याचा प्रसंग माझ्यावर गुदरला असतां मी भिणार नाहीं. अशा कामांत मी आजवर भ्यालों नाहीं व यापुढेंही आपल्या मनाच्या समजुतीविरुद्ध बोलण्याचा प्रमाद मजकडून होऊं नये अशी इच्छा आहे.

इतकें स्पष्ट आश्वासन मंडळीस मिळाल्यावर ताबडतोब सभेची वेळ व स्थळ ठरविण्याच्या कामीं खटपटीस सुरवात झाली. ही सभा माधवबागेंत तारीख ८ फेब्रुवारी १८९१ रोजीं ४ वाजतां सायंकाळीं भरली. माधवबागेसारख्या विस्तीर्ण स्थळींसुद्धां सभेच्या मुख्य स्थळीं तर काय पण सर्व बागेमध्यें रस्त्यापर्यंत उभें राहण्यासही जागा मिळण्यास मारामार पडत होती. सभेमध्यें गुजराथी व दक्षणी बड्या लोकांचीं मुख्य उद्देशपुष्टिकरणार्थ आपापल्यापरी सबळ कारणें दाखवून सुरस भाषणें झालीं.

सभेचें काम चाललें असतां आह्मांस एक चमत्कारिक गोष्ट वाटली. कोणत्याही प्रकारची सुशिक्षित लोकांची सभा असो, त्या ठिकाणीं काय बोलावयाचें व कोणीं बोलावयाचें तें अगोदर ठरलेलें असतें; त्याप्रमाणें या सभेमध्येंही होतेंच. पण कित्येक नामांकित गृहस्थ त्या सभेस अगदीं आयत्यावेळीं बाहेरगांवाहून आले, त्यांपैकीं आमचे प्रस्तुत नामदार टिळक होते. संमतिबिलाच्या संबंधानें विरुद्धपक्षाचे शास्त्रार्थ इंग्रजी व देशी वर्तमानपत्रद्वारा खोडून काढण्यामध्यें व शहरोशहरीं लोकमत स्पष्टपणें प्रदर्शित करण्याच्या हेतूनें सभा भर-

विण्यामध्यें आमच्या नामदार पश्चिद्रसूत्रधारांनीं किती अकटोविकट भगीरथ प्रयत्न केला, त्याचें जरी सभेचे अध्यक्ष योग्य गौरव करीत असत तरी या मराठाधुरीणाच्या मूर्तीची प्रत्यक्ष ओळख नानांस नव्हती. कीर्तीची असून त्या वेळीं उपयोगीं पडली नाहीं, ही साधी मूर्ति अध्यक्षांजवळ जाऊन बोलण्याची परवानगी मागूं लागली, ती त्यांस मिळाली नाहीं.

रामनामानें पाषाण तरले व रामेश्वरीं लंकेस जाण्याकरितां सेतु बांधला गेला; ह्मणून एके दिवशीं खुद्द राम समुद्रतीरीं एकटेच बसले असतां, त्यांच्या मनांत आलें कीं आपण दगड पाण्यावर तरतात कसे ते पहावे. एक दगड पाण्यांत टाकला, तो बुडाला. लाजून मागें पहातात, तों मारुति मागें उभा होताच, त्यानें ती मौज पाहून त्यास हसूं आलें आणि ह्मणाला, महाराज, पाषाण तारणें आपल्या नामाचा गुण आहे, हातांचा प्रताप नव्हे. दयाराम आंत्माराम यांची व्यापारांत इतकी पत होती कीं सर्व हिंदुस्थानभर त्यांच्या नांवाच्या हुंड्या लाखों रुपयांच्या पाहिजे तो विकत घेत असे. एक वेळ स्वतः दयाराम यात्रेस गेले व त्या ठिकाणीं पैशांची तूट आली, ह्मणून आपणच स्वतः बाजारांत जाऊन पेढीवाल्यापाशीं कांहीं पैशांची रक्कम मागूं लागले, पण त्यांस कोणी कवडीलासुद्धां पातीना. तेव्हां त्यांस वाईट वाटून अगदीं खिन्न मुद्रा करून बसले. त्यांच्या मुनीमानें शोध करतां कारण समजलें. मुनीमानें त्यांस सांगितलें कीं, महाराज! आपल्या सहीची पत बाजारांत आहे. तशीच

अद्याप आहे, मात्र आपली पत आजपर्यंत कोठेंही नव्हती त्याचा आपल्यास एवढा खेद वाटण्याचें कारण नाहीं. आपण पाहिजे त्या किंमतीच्या हुंडीवर सही करून द्या, मी पैसा आणतों पहा. तद्वत् आमच्या नामदार टिळकांनीं आपलें नांव दुसऱ्या कोणाच्या मार्फत सांगून पाठविलें असतें तर त्यांस अनायासें बोलण्यास परवानगी मिळाली असती, असो. या सभेस पूर्ण संमतीचीं बाहेरगांवाहून थोरथोर गृहस्थांचीं पत्रें आलेलीं वाचलीं गेलीं. सरजन मेजर कीर्तिकर यांचें या प्रसंगीं मनोरंजक भाषण होईल अशी लोकांस फार आशा होती, पण कांहीं जरूरीच्या कामास इतर ठिकाणीं गुंतल्यामुळें त्यांचें येणें या प्रसंगीं झालें नाहीं. त्यांचें पूर्ण संमतीचें पत्र आलें होतें तें वाचलें गेलें, त्यावेळीं लोकांची आशा भंग झाली. (या विषयावरील आपले छापी लेख कीर्तिकरांनीं प्रसिद्ध केले आहेत ते वाचनीय आहेत.)

नानांच्या स्वभावास सभेमध्यें बोलायाला मुळींच नको असे, सबब जेव्हां जेव्हां अध्यक्षस्थान स्वीकारण्याची वेळ येई तेव्हां ते आपल्यास काय बोलावयाचें असेल तें लिहून नेत असत. ते वारंवार ह्मणत कीं, लोकांपुढें बोलण्यास मनुष्यानें आरंभ केला ह्मणजे, त्याचे तोंडांतून वायफळ शब्द येण्याचा संभव फार व तसे येत नाहींत असा एकही वक्ता सांपडणें दुरापास्त आहे. बोललेले शब्दांतून बरेच आपल्या तोंडून त्यावेळीं आले नसते तर बरें झालें असतें असें बहुतेकांस वाटत असतें. व तें मला अगदीं सहन होत नाहीं. बहुसमाजापुढें लोकांचीं भाषणें ऐ-

कून मन उचंबळत असतें, तेव्हां नवीन विचार मनांत उठतात. मागें ठरलेले कमी करण्याचा मोह उत्पन्न होतो. तात्पर्य, मन अस्थिर होऊन अपक्क विचार बाहेर येण्याची धास्ती असते. असो, नानांनीं या प्रसंगीं भाषण वाचलें त्याचा वाचकांकरितां आह्मी गोषवारा खालीं देतों.

सज्जनहो! या प्रसंगीं मला अध्यक्ष निवडून काढल्यानें जो आपण माझा सन्मान केला त्याबद्दल अंतःकरणपूर्वक मी आपले आभार मानतों. येथें जमलेल्या सद्गृहस्थसमूहामध्यें हें स्थान शोभविण्यास मजपेक्षां कितीतरी अधिक योग्य माणसें आहेत हें मीं सांगणें नलगे. तथापि ज्याअर्थीं आपली मर्जी अशी झाली, त्याअर्थीं आपली इच्छा शिरसावंद्य मानणें मला योग्य वाटत आहे व शक्त्युनुसार मजवर सोंपविलेलें काम करण्यास तयार होणें माझें कर्तव्य आहे तर माझ्या अल्पसामर्थ्यानुरूप यत्न करितों. आपण या ठिकाणीं हिंदुस्थानसरकारास संमतिकायद्यासंबंधीं एक योग्य अर्ज तयार करून पाठविण्याकरितां जमलों आहों, प्रस्तुत आपलें काम तत्संबंधीं विशेष ऊहापोह करणें हें नव्हे, हें सांगणें अगदीं जरूर आहे. या कायद्याचा खरडा हिंदुस्थानसरकारच्या कायदे करणाऱ्या मंडळीपुढें विचार करण्याकरितां आला आहे. सभ्यगृहस्थहो! इंडियन पिनलकोडाच्या एका विवक्षित कलमामध्यें फेरबदल करण्याच्या हेतूनें हा कायद्याचा खरडा कायदे करणाऱ्या सभेपुढें आला हें आपणांस निःसंशय विदितच आहे; ह्मणजे विवाहित व अविवाहित स्त्रियांनीं आपलें मत देण्यास लायकीचे व-

याची यत्ता पूर्वीं दाहा वर्षांची होती ती वाढवून बारा वर्षांची करावयाची आहे. या चळवळीस सुरुवात करण्यामध्यें सरकारचा हेतु उत्तमच आहे; आपल्या प्रजेचें कल्याण, या उद्देशास कोण नांव ठेवील; आपल्यापैकीं अतिमंदमतिही ही गोष्ट कबूल करील. परंतु हिंदुसमाजाच्या आंतील वृत्तीची त्यांस मुळींच ओळख नसल्यामुळें त्यांचा गैरसमज होऊन त्यांची ही अगदींच दिशा चुकली किंवा नाहीं याविषयीं लोकांच्या मनांत संशय उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. अविवाहित स्त्रियांच्या संबंधानें पाहूं गेल्यास, दहांचीं बारा वर्षे झाल्यास त्याच्या विरुद्ध अर्थात आमचें कांहींच बोलणें नाहीं; उलट आह्मांस त्याचा आनंदच आहे, इतकेंच नव्हे पण आह्मी याच्याही पुढें धांव घेऊं आणि सरकारास विनंतीही करूं कीं, हें वय वीस वर्षेपर्यंतही वाढविल्यास आमची हरकत नाहीं; कारण तेणेंकरून हिंदुधर्मास कांहीं अडथळा होणार नाहीं व आमच्या समाजाचें त्यांत कल्याणच आहे. पण विवाहित स्त्रियांच्या संबंधानें पाहूं गेलें तर चालू असलेल्या कायद्यांत फेरबदल करण्याची आवश्यकता काय व असें करणें योग्य तरी आहे कीं काय याविषयीं फारच मतवैचित्र्य आहे. आपल्या व्हाइसरायांच्या कायदे करणाऱ्या मंडळीचीं भाषणें झालीं, त्याखेरीज तिन्ही इलाख्यांतील वर्तमानपत्रद्वारें जी चर्चा झाली आहे तेणेंकरून हा विषय दांडक्यांनीं झोडला जाऊन त्याचें हाडानहाड मोकळें झालें आहे. विद्वज्जनसमूहाचे दोन पक्ष होऊन एक पक्षाचें खात्रीलायक

ह्मणणें आहे कीं, या बदललेल्या कायद्याचा धर्माशीं कांहीं संबंध येत नाहीं इतकेंच नव्हे पण या नवीन कायद्याच्या योगानें हिंदुसमाजाचें कोटकल्याण होण्याचा संभव आहे. तथापि दुसऱ्या बाजूचे विद्वान् गृहस्थ तितक्याच खात्रीनें व अंशतः अधिक आवेशानें व नेटानें ह्मणतात कीं या भावी कायद्याच्या योगानें सरकार प्रत्यक्ष हिंदुधर्मांत हात घालीत आहे. हा कायदा जर सरकारानें लोकांवर लादला, तर जुलूम होऊं लागेल व हिंदुसमाजामध्यें जिकडे तिकडे अस्वस्थता उत्पन्न होईल. सज्जनहो! आपण या ठिकाणीं प्रस्तुत चळवळीस हातभार लावण्यास जमलों आहों यावरून आपला समावेश दुसऱ्या पक्षांत केला पाहिजे असें मला वाटतें. स्त्रियांस ऋतु प्राप्त झाला ह्मणजे, लागलाच गर्भाधानविधि केला पाहिजे अशी शास्त्राज्ञा आहे व तदनुसार लाखों हिंदूंची चालही आहे. तर सनातन चालत आलेल्या हिंदुधर्मशास्त्रावरील हाडीं खिळलेल्या श्रद्धेशीं या कायद्याचें पदोपदीं घर्षण निःसंशय होणार असें ह्मणणें मला भाग येतें. पण एखादे स्त्रीस बारावें वर्ष संपलें नसतां गर्भाधानविधि झाला तर हा कायदा झाला ह्मणजे तो विधि बेकायदेशीर होईल; ह्मणजे एका बाजूस वाघ व दुसरीकडे आड, अशा स्थितींत शास्त्र वा फौजदारी कायदा मोडलाच पाहिजे. असे प्रसंग क्वचित ह्मटले, तरी येतात. अशा वस्तुस्थितीमध्यें दयाळू महाराणीच्या राजनिष्ठ व नियमानुचारी प्रजेपैकीं बहुतेक हिंदुप्रजेचें तरी मन अस्वस्थ झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

या नवीन कायद्याची आवश्यकताही दिसत नाहीं, कारण ज्या गोष्टी बंद करण्यासाठीं हा कायदा करावयाचा, त्या तर अगदींच विरळा पाहण्यांत येतात. क्वचित् गोष्टींसाठीं कायदा करणें हें तत्वास अनुसरून नाहीं. शरीरास इजा होते त्या खटल्याबद्दल पिनलकोडामध्यें अन्यत्र तजवीज केलेलीच आहे. मीं माजिस्ट्रेटाचें काम दक्षिणप्रांतांत बरेच ठिकाणीं, खानदेशांत व खुद्द मुंबईत अठ्ठावीस वर्षांवर केलें आहे; पण इतक्या वेळांत असला खटला माझ्या पुढें कधीं आल्याचें स्मरत नाहीं. असले खटले कोठेंच घडले नसतील किंवा पुढें कधींही घडणार नाहींत, इतकी धांव मी घेण्याचें धाडस करीत नाहीं. तरी हें खचित आहे कीं, अशा खटल्यांची संख्या इतकी सूक्ष्म होईल कीं त्यांबद्दल होणाऱ्या कायद्यापासून फळास येणारें हित **जवापाडे** आणि प्रजेच्या धर्मसंबंधीं विचारांत सरकार अगदीं अलिप्त असतें असा जो आजपर्यंत लोकांचा समज दृढतर होऊन बसला आहे त्याला जबरदस्त धक्का बसून जें अनहित होईल तें **पर्वताएवढें** होईल. आणखी असें कीं जरी हा "माराकुटीचा" गुन्हा पोलिसानें आपण होऊन दाद घेण्याचा केला नाहीं तरी दुष्ट, खटपटी, चाहाड लोकांना त्याचा अतिनिंद्य व्यापार चालविण्यास आणखी एक द्वार मोकळें होतें. फौजदारीकडील न्यायाधीशास खोटी बातमी देण्यास, खोटा पुरावा तयार करण्यास, खोटे साक्षी तयार करण्यास व अशा प्रकारचीं घाणेरडीं कामें करून किंवा लोकांस धास्ती घालून आपलें पोट जाळण्यास आणि मागचे सूड

घेण्यास चांडाळांस सवड मात्र होईल. न्यायाधीशापुढें एखाद्या कुटुंबावर असला गुन्हा शाबीत झाला असतां त्याची कायदैना होईल व कशी दशा उडेल याचें मित्रहो! आपणच मनन करावें. प्रथमारंभीं पोलिसाला असल्या खटल्यांत हात घालण्यास कायद्यानें अधिकार दिला नाहीं तरी प्रथम चौकशी करण्याकरितां तो खटला त्याजकडे पाठविण्यास माजिस्ट्रेटास अधिकार असतोच, मग पोलिसाच्या कह्यांत गरीबें आलींच का नाहींत? सभेच्या कामास सुरुवात करण्यापूर्वीं, सद्गृहस्थहो? आपणांवर मोठें दुःख प्रदर्शित करण्याचा प्रसंग गुदरला आहे. ब्राडला. एम. पी. च्या मरणाची हृदयभेदक बातमी आपण सर्वांनीं ऐकिलीच आहे. हे गृहस्थ आमच्या हितानहितांमध्यें वांटेकरी होत असत, हें सर्वांस विदितच आहे. चवदा महिन्यांमागें हा महात्मा येथें येऊन आमचाच बनला होता. याच्या मरणानंतर बहुसमाजाची सभा अशी ही पहिलीच आहे. या कामाकरितां कदाचित् निराळी सभा भरेल तरी असला दुःखकारक घाला पडल्याबद्दल खरें अंतःकरणास झालेलें दुःख व खेद प्रदर्शित न केल्यास आपण आपल्या कर्तव्यास चुकलों असें होईल, तसेंच निरपेक्षबुद्धीनें आह्मां मुक्या अनाथांकरितां श्रम केले त्याबद्दल कृतज्ञता प्रदर्शित न करणें ह्मणजे कृतघ्नता होईल. या गोष्टीच्या महत्वानुसार मीं सभेपुढें सदरील विचार स्वीकारार्थ ठेवावा हें योग्य दिसतें:—

आमचे हितचिंतक व आह्मांस निरपेक्षबुद्धीनें आपलें

पाठबळ देणारांपैकीं फार धीट व श्रेष्ठ चार्लस ब्रॉडला यांच्या अकालिक मृत्यूनें आमच्या देशावर प्रचंड घाला पडला. त्यामुळें या सभेस फार दुःख व खेद होत आहे ही गोष्ट सभेनें आपल्या लेखांत नमूद करून ठेविली आहे.

---

## भाग १९.

### पुत्रशोक व संपादितज्ञानानुभवाचा प्रसंग.

इहलोकींची संसारयात्रा करीत असतां सर्व दिवस सारखे सुखामध्यें गेल्याचीं उदाहरणें लोकांच्या पहाण्यांत फारच थोडीं आढळतात. कोणास आरंभीं, कोणास मध्येंच, कोणास शेवटास कोणत्या तरी प्रकारचे घाले पडलेले सोसावे लागतात. यूरोपस्थ एका महान् तत्ववेत्त्याचें वचन आहे कीं, "मरणापूर्वीं कोणास सुखी ह्मणतां येत नाहीं." खुद्द साक्रेटिसालाही विषप्राशनानें देहविसर्जनाचा प्रसंग आला; पण ह्या तत्ववेत्त्याची वृत्ति किती शांत होती हें इतिहासप्रसिद्ध आहे. साधारण लोकांमध्यें आणि ज्ञान्यांमध्यें फरक पाहतां हाच असतो. संकटें सर्वांवर गुदरतात. यामध्यें चित्तास व्यग्रता न येऊं देणारीं माणसें क्वचित् आढळतात. नानांना आपल्या इहलोकयात्रेमध्यें आरंभापासून बराच वेळ वादळांशिवाय गेला, ही गोष्ट मोठी कौतुक करण्यासारखी होती; कारण यांच्या कुटुंबाचा विस्तार असाधारण होता. या प्रचंड वृक्षाला इंदुरास असतां मूळाशीं कीड लागली किंवा दृष्ट पडली. युनिव्हर्सिटीनें छापून काढलेल्या पु-

ष्कळ भूदेवांचे आंगारे लावले, पण एकही गुणकारी होईना. इंदुरांतील सर्व वैद्यक निष्फळ असें अनुभवास आल्यावरून तुकोजीराव महाराजांनीं, नानांनीं आपल्या पत्नीला मुंबईस घेऊन जावें अशी सूचना केली. विख्यात डा० अण्णांवर आपला फार भरंवसा आहे, ते नाहींत, तर बडे बडे युरोपियन डाक्टर आहेत. " कोणाच्या तरी कोंबड्यानें एकदांचें उजाडो, " अशा बिचाऱ्या स्थितीमध्यें रोग्याच्या सभोंवतीं खंडोगणती चाकरमाणसें असण्यापेक्षां जिव्हाळयाचा आप्तवर्ग जवळ असेल तर अधिक समाधानकारक होतो. मुंबईस आल्यावर पूर्ण भरंवशाचे डा० अण्णा रोज एक खेप करून रोग्यास औषधोपचार चालवीत होते. शिवाय एक डाक्टर व एक कंपौंडर रात्रंदिवस रोग्यापाशीं असत. आठ मुलगे, जाऊन येऊन सर्व मुली व स्वतः नाना या भाग्यशाली बायकोच्या सेवेंत तत्पर असत. कृष्णाबाईचा दुसरा मुलगा सदाशीव तिच्या इतर मुलांपेक्षां जरा विशेष धाडसी व मेहनती होता. हा बॉरिस्टरचें काम काठेवाड प्रांतांत करीत असे, तो मातोश्रीचे सेवेस कुटुंबासह येऊन बसला होता. त्याचें लाडकें नांव दादा असे. यानें मातोश्रीकरितां पराकाष्ठेची आंगमेहनत घेतली. तिच्या रोगाला जें डाक्टरांनीं नांव ठेविलें, त्या रोगाची चिकित्सा नानांनीं अनेक पुस्तकें जमा करून त्या दोन वैद्यांपाशीं वाचून चर्चा करीत बसावें. एके दिवशीं या रोगाविषयीं भवतिनभवति चालली असतां, एक डाक्टर ह्मणतातः—नाना! आपण या वाच्यतेंत इतकें मन

घालतां हें बरें नाहीं, कारण रोग्याच्या भवितव्याविषयीं आपणांस खेद मात्र अधिकाधिक होत जाईल. यावर नाना उत्तर करितात कीं, व्याधीला डाक्टरांचे इलाज चालतात पण आधी घालविणें हें बहुतांशीं ज्याचें त्यानेंच केलें पाहिजे. एकादी गोष्ट निरुपाय व अनिवार्य ठरली ह्मणजे होणाऱ्या परिणामानें माझ्या मनास दुःख होणार नाहीं. पण जर इलाज असून तो हातून झाला नाहीं तर मात्र मन खात राहील. माझ्या वर्तणुकेंत किंवा चर्येंत कोणत्याही रीतीचा फेर आढळत असल्यास " दुःख होईल " हें ह्मणणें शोभेल. मला तर आपलें बोलणें निर्मूल वाटत आहे. राजवैद्य तर निरुत्तर होऊन बसले. हळू हळू तीन तपें वाढत गेलेल्या नानांच्या खिल्लाराची मुहूर्तमेढ शुक्रवारीं सकाळीं सन १८८६ च्या जानेवारी महिन्याच्या ८ वे तारखेस उपटून एकाएकीं पडली. एक धारण पडल्यावर बाकी एकावर इमारतीची काय दशा विचारावी! आपल्यास पत्नीवियोग होणार नाहीं असें सर्व लोकांप्रमाणें नानांसही वाटून आपल्यामागें आपल्या कुटुंबवर्धिनीस दरमहा २०० रुपये मिळतील अशी तजवीज करून ठेविली होती. आपण बेत करीत असतों एक प्रकारचे आणि त्या जगन्नियंत्याची असते व्यवस्था कांहीं निराळीच. आपल्या हिंदूंमध्यें नवऱ्याच्या अगोदर स्त्रीस देहविसर्जनाचा प्रसंग आला तर तिच्यासारखें भाग्य कोणतेंच नाहीं असें मानतात, व स्त्रियांस वैधव्यासारखी दुसरी असह्य स्थिति नाहीं. नायकांच्या समजुतीप्रमाणें पारलौकिक दृष्टीनें आणि

इतरांच्या समजाप्रमाणें कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी कृष्णाबाई आपले आठ पुत्र, चार मुली व सर्व नातवंडांचा कळप व आपला पति आपल्या सभोंवतीं डोळ्यांत तेल घालून बसले असतां आपल्या दैदीप्यमान सौभाग्याचा अचल व निरभ्र लौकिकाचा व संसारांतील उच्च सुखोपभोगाचा झेंडा मिरवीत पति इंदूरचे दिवाण असतां कैलासवासी झाली. आह्मांला वाटतें, लाखांत एकादीस अशी स्थिति प्राप्त होत असेल. स्त्रिया अशा स्थितीची कल्पना करून आंवडे घोंटीतच बसतील. स्त्रीपुरुषांना एकविचारानें खाणेंपिणें, निजणेंउठणें, बसणेंबोलणें करण्याची बरेच दिवस संवय होऊन, दंपत्यभावामुळें त्यांचा अगदीं एकजीव होऊन जातो अशीं उदाहरणें हजारों आढळतात. असा बनलेला जोडा कालगतीनें फुटला तर मागें राहिलेल्या बिचाऱ्या मनुष्यास काय वाटत असेल याची कल्पना ज्याच्यावर तो प्रसंग गुदरला असेल त्यासच करतां येईल. त्यास सर्व जग स्मशानवत् भासून जातें, व सर्व व्यवहार निरपेक्ष घडूं लागतात. मूढमति संसारसक्त लोक असतात, त्यांस निर्दिष्ट केलेली स्थिति दुःखास्पद व असह्य होते. विचारी व तीव्रबुद्धीचे लोक आपलें लक्ष परमार्थाकडे लावून दुःखशमन करितात. नानांच्या वर्तनामध्यें कोणत्याही प्रकारचा लेशमात्र फरक पडला नाहीं. कोणत्याही प्रकारचीं दुःखदर्शक चिन्हें त्यांच्यामध्यें आढळतना. उत्तरकार्य आटपल्यानंतर नाना परिवार घेऊन इंदुरास गेले.

तीन साडेतीन महिन्यांनीं नानांचा दुसरा मुलगा आ-

जारी पडल्याची खबर त्यांस इंदुरास समजली. दादा काठेवाडामध्यें बॅरिस्टराचें काम करीत असे हें वाचकांस पूर्वींच विदित आहे. दादास क्षय झाला. तो मुंबईस येऊन डा० अण्णा कुंटे त्यास औषधीउपचार करूं लागले. नानांला रोजची खबर तारेनें कळविली जात असे. दिवसेंदिवस दादाची प्रकृति क्षीण होत चालली. डा० अण्णाही रोग्यास नामांकित युरोपियन डाक्टरांस दाखवा असें सुचवूं लागले. दादा कांहीं दिवस वडिलांबरोबर इंदुरास होता, व नाना ह्मणत कीं, दादासारखा फरडा इंग्रजी लिहिणारा जर मजपाशीं नसता, तर ही जोखिमाचीं अवजड व महत्वाचीं राजकीय कामें माझ्या हातून वेळच्यावेळीं तडीस जातीं किंवा नाहीं याचा मला फार संशय वाटतो. लांबलचक खटला समजून घेण्यास आठपंधरा दिवस मोडावे व त्याविषयींचा ठराव साधकबाधक कारणांसह नानांनीं आपल्या चिरंजीवांस सांगावा आणि ह्मणावें दादा! याचें टिपण केलें पाहिजे. दादानें रात्रीं बसून ठराव लिहून टाकावा. कधीं कधीं ८–१०–१५–२०–२५ पानेंपर्यंत लिहिलेलीं पाहून नानांस सखेद कौतुक वाटत असे. नाना ह्मणतः—दादा! तूं असें रात्रीचें जाग्रण करीत जाऊं नको. अशा अनियमितपणानें आपली प्रकृति ग्रासून टाकशील. दादा उत्तर करितोः—इंग्लंडामध्यें दोन वाजेपर्यंत जाग्रण समजत नाहींत. तेथें असतांना मी याहून अधिक वेळ वाचीत बसत असें. नानाः—तें सर्व खरें, परंतु तूं आतां त्या हवेमध्यें नाहीं, जेथचें तेथें, असो. दादाच्या अत्या-

वस्थेच्या तारा नानांस जाऊं लागल्या; परंतु नाना इंदूर सोडून लाडक्या मुलास भेटण्याकरितां अंतकाळीं-ही आले नाहींत. तर मग या विचारी पुरुषास आपण पाषाणहृदयी ह्मणणार! त्याच्या प्रकृतिसाठीं, विद्येसाठीं हजारों रुपये खर्च केला तो ममतेखेरीज काय? आपण मुंबईस जाऊन भवितव्यांत अंतर पडणार नाहीं. मुलाच्या स्थितीमध्यें अंतर पाडतां येणार नाहीं, स्वतःची आधी व व्याधी मात्र वाढेल. जाणारी वस्तु जाऊं लागली तर तिला अडविणारा कोण आहे? संकटांत पडलेल्या आप्त-मित्रांस तन्निमित्त मदत न करितां आपला जीव धोक्यांत घालून त्या बापड्याचे मदतीचा उगम बंद करणें हें खऱ्या ममतेचें लक्षण नव्हे. असे अनेक विचार नानांचे मनाची ओढाताण व कित्येक वेळां विदारणा करीत असत. संकटसमयीं सुविचाराच्या गोष्टी सांगणारी, मनाची शांति करणारी पत्नीही आपणास सोडून गेली. दादा आपल्या मागें आपल्या विस्तारलेल्या जाळ्यास कांहीं आधार आहे असें वाटतें, पण ईश्वराचे मनांत काय आहे कोण जाणे. याप्रमाणें मनाचे तरंग मागो-माग झुंडीच्या झुंडी अंगावर घुसून येऊन भूत, वर्तमान व भविष्यकाळच्या स्थितीचीं मूर्तिमंत चित्रें एकमेकांशीं लगटून उभीं करीत असतां एकाएकीं तार येऊन पोहों-चली. महाराणीव्हिक्टोरियांचा जन्मदिवस, सन १८८६ मे महिन्याची तारीख २४ सोमवार हा दिवस परमेश्वरानें नानांच्या दुःखी अंतःकरणावर दादाच्या मरणानें डाग देण्यास शोधून काढिला. या घाल्यानें नानांचें अंतःक-

रण न फाटतां त्यांची वृत्ति दिवसेंदिवस विशेष अंतर्मुख होत चालली असें त्यांच्या वर्तणुकेवरून स्पष्ट दिसूं लागलें.

नानांचा ज्येष्ठ पुत्र बाबा इंदुरास त्यांजपाशींच असे. त्याचीही प्रकृति बरी नाहीं असें थोड्याच काळांत दिसून आलें. औषधीउपाय तर चाललेच होते. बाबा अगदीं थकला असें कोणासही वाटलें नाहीं. बाबाचा आहार ह्मणण्यासारखा तुटला नव्हता, ह्मणून त्याच्या अत्यावस्थेविषयीं कोणासही शंका आली नाहीं. तशांत नानांचीं सर्व मुलें बांधेसूद, मजबूत, साधारणमानाहून लौकर लक्षांत येण्यासारखीं उंच होतीं व बाबा हे या संबंधानेंही अनुक्रमानें पहिलेच होते. एके दिवशीं बाबा कोचावर बसून रात्रीं १० वाजतां औषधसेवन करीत होते, इतक्यांत नाना तेथें आले. त्यांस बाबा ह्मणतो, नाना! आज मला रोजच्याहून बरें वाटतें. मी आज विशेष गोडीनें जेवलों. तर मग तुला गुण पडत चालला आहे असें सांगून बापानें मुलाचें समाधान केलें. त्याच दिवशीं सन १८८६ च्या अक्टोबर महिन्याच्या २९ तारखेस शुक्रवारीं रात्रीं ९ वाजतां खोकला लागून बाबा जागे झाले व अंतकाळीं शेरभर सुमार रक्त ओकून पडलें व बाबांनीं शेवटची विश्रांति घेतली. चाकरानें सर्व माणसांस जागें केलें. नानांच्या डोळ्यांत टीप नव्हीं, वृत्तींत बदल नाहीं, विचारांत चांचल्य नाहीं. शांतपणें पुढची तयारी केली. काय हें विचारगांभीर्य! कोण मनोनिग्रह हा! "देखे मडें नि येई रडें" या ह्मणीस संसारांत असून अलिप्त राहणाऱ्या या पुरुषानें

हरताळच लाविला! नानांनीं इंदूर सोडलें ह्मणून सांगितलें तें ही गोष्ट घडल्यावर दोनतीनच दिवसांनीं. मुंबईस येऊन थावटल्यावर सर मंगळदास यांजकडे सायंकाळीं तीन वाजतां जाण्याचा क्रम सुरू झाला.

नानांचें शेवटलें मूल मुलगा होता. त्याचें नांव अनंदराव. या मुलावर आईचें प्रेम शेवटला असल्यामुळें जास्त होतें व तसें असणें साहजिकच आहे, ह्मणून अनंदरावापुढें नानांखेरीज कोणाचीही डाळ विकत नसे. याच्या पाठीचा कणा लहानपणींच वांकडा होऊन कुबड आलें होतें. व तेंही अंशतः त्याचेवरील प्रेम वाढविण्यास कारणीभूत झालें होतें, असें बहुत लोकांस वाटतें. हा सर्व भावंडांत अशक्त, व याचें चिरजीवित संशयात्मक वाटत असे ह्मणून यास शाळेंत जाण्याविषयीं फार सक्ती न करितां घरगुतीच काय होईल त्या शिक्षणाची त्यास भर घालीत असत. स्वभावतः हा फार तीक्ष्णबुद्धीचा मुलगा होता, याचें बोलणें नेहमीं मार्मिक व तिखट असे. याचे डोळे फार पाणीदार व कपाळ लांबरुंद होतें. अनंदरावावरील प्रेम त्याच्या कुबडाचा परिणाम किंवा त्याचे कुबडाचें कारण या गोष्टीचा निर्णय निर्विवाद होत नाहीं. शेजारचे कित्येक लोक ह्मणतात, लहान असतां तो एकवेळा गड्याच्या हातून ह्मणा किंवा आपोआप पडला असतां ही गोष्ट गड्यानें घरीं कळविली नाहीं. त्या आघातानें याच्या पाठीच्या कण्यास इजा झाली असावी व त्यावर औषधीउपाय तत्क्षणीं झाले नाहींत. हें ह्मणणें असंभवनीय दिसत नाहीं खरें, तथापि जो चाकर या

मुलांस संभाळी, असें आमच्या पाहण्यांत आहे तो अर्थात अशिक्षित व कामचुकारूही होता. घरांतलें इतर काम करायला न पडावें ह्मणून तो चाकर या मुलास हातांत घेऊन असे. बायका मुलास कमरेवर घेतात, तेव्हां मुलाच्या पाठीस कमरेवर घेणारांच्या मनगटाचा आधार असतो, परंतु पुरुषाचें तशांत अविचारी गड्याचें फार वेळ घेणें मुलास अनहितकारक होतें. गडी मुलास मनगटावर बसवितात; मग तें मूल तसें बसण्यास लायक असो अगर नसो. सारा दिवस मनगटावर मुलास बसविण्याचा प्रसंग गड्यास आला ह्मणजे, गडी आपल्या गळयांत फडका बांधून, त्यांत आपला हात अडकवितो आणि मुलास बसण्याकरितां एक प्रकारची पाठीशिवाय खुर्ची तयार करतो. मुलाचे पाठीचा कणा वांकलाच पाहिजे. अशा स्थितींत अनंदराव ४।९ वर्षांचा होईपर्यंत होता. या अनिष्ट अवस्थेनें मुलाच्या कुबडास बरेंच पुष्टीकरण केलें असावें. मुलांस बाळगणें ह्मणजे त्यांस शिक्षण देणें होय. आईबापांची जरी असें शिक्षण देण्याची इच्छा नसते, तरी नीचसंगतीनें नकळत त्या मुलांस हलकट शिक्षण मिळतें. ही गोष्ट कोणते मुलांचे पालक नाकबूल करतील? याचा ढळढळीत पुरावा पाहिजे असेल त्यानें मुंबईतील शाळा धुंडाव्या, ह्मणजे श्रीमान् लोकांच्या मुलांमध्येंही बाल्याच्या भाषेची झांक मारते हें पाहतां येईल. शाळेमध्यें पंतोजीचें पहिलें काम ह्मणजे या अश्लाघ्य बीजारोपणाचें निर्मूलन करणें असतें. शिकविण्यापेक्षां विसरविण्याचेंच काम फार असतें. आपल्या अर्भक यजमानापुढें

बाल्यानें खुशाल विडी ओढावी, अभद्र बोलावें, व मौजेनें त्या यजमानपुत्राच्या तोंडावर धूरही सोडून हंसावें. ही उणीव दूर करण्याकडे लोकांचें लक्ष जेव्हां वेधेल तो सुदीन. एके दिवशीं अनंदरावाचे ढुंगणावर सूज आली व ती दिवसेंदिवस वाढते असें पाहून सुज्ञ वैद्य बोलाविले. उं: तें बसून जाईल असें सांगून तें बसण्याचीं औषधें लावूं लागले; तथापि त्याची वाढ कमी होईना. मग तें पिकून तयार झालें, त्यास फोडावें असें ठरल्याप्रमाणें एका कुशल डाक्टरानें त्यावर शस्त्रक्रिया केली, व आंतून बराच पू काढला. अनेक प्रकारच्या वैद्यांनीं ती जखम भरून काढण्यास आपआपलें कौशल्य व चतुराई खर्चीं घातली, पण कोणाच्याही हातास यश आलें नाहीं. रोज दोन वेळां धुऊन काढण्याचा क्रम आठ महिने चालला होता. कण्याच्या हाडामध्यें रोगाचें मूळ आहे असें डा० ह्मणत व तेथें औषधें चालविणें दुरापास्त गोष्ट होती. शेवटीं सन १८८९ आगष्ट महिन्याच्या २ तारखेस शुक्रवारीं दोन प्रहरांनंतर साडेतीन वाजतां या लाडक्या शेवटल्या मुलाच्या आयुष्यक्रमणाचा शेवट झाला. त्या वेळींही नाना आपल्या नित्यक्रमांत चुकले नाहींत. सर मंगळदासांकडून नानांस बोलावून आणावें लागलें. त्या दिवशीं सायंकाळीं सात वाजतां आह्मी नानांपाशीं बोलत बराच वेळ बसलों होतों, पण दुःखाचें चिन्ह आमच्या दृष्टीस पडलें नाहीं. संसारांतील आप्तवर्गवियोगामुळें कितीएक समंजस लोकही वेडावतात, या विषयावर, तत्वज्ञानावर, ब्रह्मनिष्ठतेवर, विद्याव्यासंगावर व कांहीं तत्वज्ञा-

न्याच्या आयुष्यक्रमणावर बोलणें नित्यक्रमाप्रमाणें चाललें होतें. जणूं काय, गतगोष्टींविषयीं या विचारी पुरुषाचा कांहींच संबंध नाहीं. यांच्या पोक्तपणाची शिकस्त आहे. अशीं उदाहरणें फार विरळ आढळतात. या जगामध्यें अगदीं पूर्ण अशी वस्तु मुळींच नाहीं. कोणतीही गोष्ट वाईट किंवा चांगली आहे असें बोलण्याचा प्रघात आहे. परंतु ती वस्तुतः सर्वांशीं वाईट किंवा सर्वांशीं चांगली नसते. त्यामध्यें कांहीं तरी अंशतः उणीव असतेच. आतां आपणांस खेदकारक अशा गोष्टी या संसारामध्यें पदोपदीं आढळतात, पण सूक्ष्मदृष्टीनें पाहिलें तर त्यामध्येंही समाधानकारक भाग थोडा तरी असतोच, त्याकडे लक्ष पुरवून अनिष्ट गोष्टींपासूनही सज्जन आपलें समाधान करून घेतात. आमच्या चरित्रनायकांचीही याप्रमाणेंच विचारसरणी होती. अनंदराव माझ्या अगोदर गेला ही गोष्ट आह्मांस कितीही दुःसह असली तरी त्याच्याच हितासाठीं त्यास माझ्या मागें ठेवणें त्या सर्वज्ञास प्रशस्त वाटलें नसेल, असे उद्गार नाना वारंवार काढीत. अनंदराव पंगू होता व आमच्या मागें त्याचे हाल होण्याचा संभव होता. हाच आजार जर माझ्यामागें त्यास येता, तर न जाणों त्याची व्यवस्था काय झाली असती! तर ईश्वरकरणी अगाध आहे.

नानांचा चवथा मुलगा विनायकराव. यास पोष्टखात्यामध्यें नौकरी होती. यास गुदद्वारानें रक्तश्राव होण्याची खोड लागली होती. पांच सहा महिन्यांनीं हें दुखणें उद्भवे, व दोन तीन दिवस श्राव होऊन गेला ह्मणजे मोकळा होत असे. पण शौचाचा अवरोध हो-

ऊन श्राव झाला नाहीं ह्मणजे अत्यावस्था होत असे. शेवटीं याच तीन दिवसांच्या आजारानें विनायकरावाचा शेवट सन १८८९ माहे नवंबर ता०–२०–बुधवारीं करून रावबहादुरांचा वृद्धापकाळ लोकदृष्ट्या तरी ह्मणा अगदीं दुःखरूप करून टाकला, व संसारांतील दुःखांचा कळस करून सोडला. या शिवाय लहान मुलें कुटुंबांतून कमी झालीं तीं निराळीं.

रा० ब० नाना यांचा सातव्या नंबरचा मुलगा सुंदरराव, याचें वय सुमारें १९ वर्षाचें होतें. इतर मुलांप्रमाणें हाही उंच व सदृढ होता. यावेळीं हा मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेस जाण्याच्या तयारीस लागणार, इतक्यांत 'छातींत दुखतें' अशी कुरकुर कानीं येऊं लागली. इतरांप्रमाणें यासही कफक्षयाची भावना आहे असें वैद्य गुणगुणूं लागले. पुढें कांहीं दिवसांनीं याची शाळा सुटली व हा अगदीं बिछान्यास खिळला. कांहीं महिने वैद्याचे रीतीप्रमाणें उपचार चालले असतांही रोगाची चढती कमानच होती. शेवटीं स० १८९२ वाच्या जानेवारी महिन्याच्या १९ वे तारखेस रात्रौ साडेनऊ वाजतां वृद्धापकाळीं नानांच्या आधींच पोळलेल्या अंतःकरणावर सुंदररावानें आणखी एक सुंदर डाग दिला.

प्राचीन काळीं ग्रीस देशामध्यें स्पार्टा शहर विख्यात होऊन गेलें, तेथें शहरांतील सर्व मुलांस सरकार आपल्या खर्चानें शिक्षण देत असे. प्रस्तुत शिक्षणाचा रोंख विशेष मानसिक सुधारणेकडे जसा आहे, तसा त्या वेळीं सर्वांशींच शारीरिक सुधारणेकडे असे. त्या वेळीं तेथें मु-

लास शिकविणें ह्मणजे--खुस्ती मारणें, कोसांचे कोस पळत जाणें, रानांतील श्वापदें मारून त्यांवरच निर्वाह करणें, चोरी करणें पण त्या कामांत न सांपडणें, फटके खाणें, पण डोळ्याचें पातेंही न हालविणें. या कामांत मुलास तयार करण्याकरितां, त्याच्या पाठीवर रक्त बाहेर पडेपर्यंत फटके मारावे व त्याची पाठ बरी करून पुन्हा फटके मारावे. हा क्रम इतके दिवस चालू ठेवीत कीं शेवटीं फटके मारिले असतां रक्तश्राव होत नाहीं व फटके खाणारा डोळाही मिचकावीत नाहीं. याप्रमाणें इतिहासकाराचे लेख वाचून आपल्यास सखेद आश्चर्य वाटतें, पण नानांनीं आपलें अंतःकरण याहीपेक्षां पुष्कळ अंशांनीं अधिक कठोर केलें होतें. पुत्रशोक-रूपी विषारी भाले परमेश्वरानें नानांच्या हृदयांत एका-मागून एक खुपसले तरी यांच्या डोळयांवाटे अश्रुपात दृष्टीस पडतां आढळला नाहीं. मनाचें चांचल्य यत्किंचि-तही दिसून आलें नाहीं. नित्यक्रमांत तिळमात्रही फरक नाहीं. पारमार्थिक अध्ययनांत अशा प्रसंगाच्या दिवशीं सुद्धां अंतर नाहीं. काय मनोनिग्रह हा!! शाब्दिक ब्रह्मवेत्ते आमच्या पहाण्यांत बहुत आले, पण ज्ञानाचा परिणाम आचरणावर अशा प्रकारें घडलेला ज्ञानी निदान माझ्या पहाण्यांत आला तो एवढाच.

इ० स० १८९४ सालीं आगष्ट महिन्याच्या १७ वे तारखेस नानांचे वडील चिरंजीव बाबा यांची मुलगी चेलाबाई सौभाग्यवती होऊन लौकरच परलोकवासी झाली व त्याच महिन्यांत २७ वे तारखेस नानांचे चौथे

चिरंजीव विनायकराव यांची कन्या सौभाग्यवती माणक-बाई इजला देवाज्ञा झाली.

इतक्यानेंच झालें नाहीं. वाचकहो! आणखी एक गोष्ट अशीच हृदयभेदक आहे, ती सांगून ही आमची शोकमालिका पुरी करतों. "देणें व दुखणें कोणास नको" तशीच लोकांची रड ऐकणें खुशालचंद वाचकांस आवडत नाहीं, पण जसें लढाईचें भयंकर वर्णन केल्याशिवाय शिपायाचें शौर्य दाखवितां येत नाहीं, तसें संसारामध्यें वेळोवेळीं आलेल्या दुःखकारक प्रसंगांचें हृदय पोळणारें वर्णन केल्याशिवाय या गृहस्थाश्रमी पुरुषाचें गांभीर्य, विद्याव्यासंगाचा परिणाम, सद्वर्तनानें मनास आलेलें स्थैर्य व ऐहिकावरील आसक्तिराहित्य हे गुण दाखवितां येणार नाहींत.

नानांचे तृतीय चिरंजीव? (पुत्र?) बळवंतराव यांची प्रकृति सुमारें वर्ष सहा महिने डळमळितच दिसूं लागली होती. यांसही इतर बंधुवर्गाप्रमाणें कफक्षयाचीच भावना आहे असें ह्मणत. दिवसेंदिवस क्षीण होऊन यानींही बिछाना धरला व शेवटीं १८९९ मध्यें एप्रील महिन्याच्या १६ व्या तारखेस देह ठेविला. त्या वेळीं नानांची मुलगी सौभाग्यवती छोटूबाई बरेच दिवस घरामध्यें आजारी कफक्षयानेंच होती. इच्या पतीनें व वडिलांनीं फार दिवस इच्याबद्दल कष्ट केले. ज्या ज्या ठिकाणची हवापाणी या रोग्यास मानवेल असें वैद्य सांगत त्या त्या ठिकाणीं इला नेऊन ठेविली तरी रोगास सदोदित चढती कळाच होती.

दशरथ राजाचा मुलगा राम वनवासास गेला, पुन्हा परत येण्याची आशा होती, तरी दशरथाची काय अवस्था झाली हें पुराणांतरीं प्रसिद्धच आहे. इंग्लंडामध्यें बर्क महान् तत्वज्ञानी व प्रचंड वक्ता झाला, त्याचा वृद्धापकाळीं मुलगा परलोकवासी झाल्यामुळें बर्कसारख्या तत्वज्ञान्याची बुद्धि नष्ट होऊन विचारसरणीचा ओघ भलतीकडे गेला, व श्रोत्यांस मूर्च्छा आणणारें त्याचें वाक्पांडित्य अगदीं पळपळीत होऊन कर्णरंध्रें रिझवीनासें झालें. इतका सारा अनर्थ पुत्रशोकानें केला, असा बकल इतिहासकाराचा अभिप्राय आहे. ग्रीस देशामध्यें एक महाज्ञानी वक्ता तद्देशीय लोकसमूहापुढें तत्वज्ञानाच्या गोष्टी सांगत असतां व आत्म्याच्या चिरायुत्वाविषयीं साधारण अज्ञजनाची समजूत घालीत असतां त्याची स्वतांची लाडकी मुलगी आदल्याच दिवशीं इहलोक सोडून तेंच चिरायुत्व भोगण्यास परलोकीं आपल्या पित्यास टाकून गेली. तिचें स्मरण होतांच त्या वक्त्याच्या डोळ्यांवाटे लोकांपुढें अश्रुधारा चालल्या, अशीं इतिहासप्रसिद्ध अनेक उदारणें आहेत. पण रा० ब० नाना मोरोजींच्या बुद्धिमत्तेस या सत्तरी पलीकडच्या अमलांतही अशा प्रकारची झीज लागली नाहीं. "साठी नि बुद्धि नाटी" या ह्मणीचा उपयोग या वयोवृद्ध पुरुषास कांहीं होत नव्हता.

---

## भाग १६.

### अखेरच्यासंग.

सर्व जगतामध्यें गुणावगुणाधिक्य जेथें आढळतें, तेथें

तें बारीक शोधाअंतीं, आपोआप मिळालेल्या किंवा मुद्दाम दिलेल्या शिक्षणाचा परिणाम असतें असें आढळून येईल. अर्थात्, त्याचें बीजारोपण ईश्वरकृपेनें झालेलें असलें पाहिजे. मूळचा अंकूर धजावाचा व रोप्याची खतपाणी घालून जोपासणा झाली ह्मणजे तें झाड तरतरीत होऊन उत्तम दशेस पोंचतें. एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यावर प्रीति करण्याचा गुण हा निरनिराळया व्यक्तींमध्यें निरनिराळ्या मानानें कमजास्त आढळतो. त्याचेंही कारण शिक्षणच आहे. प्रीतीच्या ईश्वरदत्त बीजास पहिल्यानें खतपाणी आईपासून उत्तम प्रतीचें मिळतें, तदाभावे आजीपासून, नाहीं तर कडेलोट दाईपासून, या रोप्याचें पोक्त वयामध्यें बायकोपासून व नवऱ्यापासून परस्पर पुष्टीकरण होत असतें. जगांतील वस्तुस्थितीचें वास्तविक ज्ञान ह्या झाडास फार मारक आहे. व मानवी स्वभावाचा अनुभव आणि त्याच्या अवाढव्य कुटुंबरचनेची माहिती जसजशी अधिक वाढत जाते तसतशी या झाडास कीड लागत जाते. शेवटीं पक्के ब्रह्मनिष्ठ ब्रह्मज्ञानाचा उपयोग घेऊं लागले ह्मणजे तर हें झाड होतें किंवा नव्हतें याचाही संशय पडूं लागतो. वरील सर्व गोष्टी आमच्या चरित्रनायकांस लागू अक्षरशः आहेत हें आतां वाचकांस सांगणें नलगे. कितीएक गृहस्थ एखादें उत्तम रसिक काव्य किंवा शोकपर कादंबरी वाचीत असतां इतके तल्लीन होऊन जातात कीं, ते आपणास तो विषयवीरच आहों असें समजतात, व डोळ्यांवाटें अश्रुधारा चालल्या असतात. तशी नानांची स्थिति

कधींच झाली नाहीं. त्यांची सर्व विचारसरणी केवळ शास्त्रीय असे. कोणतीही गोष्ट पुढें आली कीं, ती कसोटीस लावून पहावयाची, ही त्यांची जबरदस्त संवय शेवटपर्यंत चालू होती.

घरांतील मुलांचें अध्यापन करणें ही गोष्ट नानांस फार मनापासून आवडत असे. या कामाचा या पुरुषास कधींच कंटाळा येतां दिसला नाहीं. आजपर्यंत यांच्या वाचनाचा रोख तीन चतुर्थांश ऐहिक व एक चतुर्थांश पारमार्थिक असे. शेवटीं शेवटीं या मानाची व्युत्क्रमस्थिति झालेली आढळत असे. एतद्देशीय व परदेशीय तत्वज्ञानाचे ग्रंथ स्वतः वाचावे, व ऐकावे या कामांत नानांचा दिवसांतून बराच वेळ जात असे. तुकाराम, ज्ञानेश्वर, एकनाथ वगैरे साधूंचे ग्रंथ वाचून त्यांचें मनन करण्यांत नाना विश्रांति घेत. योगवासिष्ठादि ग्रंथ वाचून तल्लीन होणें नानांस अलीकडेच फार आवडूं लागलें होतें. कैफाच्या योगानें कित्येक लोक उन्मत्त होतात व कित्येक अगदीं म्लानवदन व खिन्न होऊन बसतात, त्यांपैकीं नानांची दुसऱ्या वर्गांत गणना केली पाहिजे. कारण शाब्दिकब्रह्म जाणणारे लोकांना दुसऱ्याचा पाडाव करण्याची फार हौस असते. नानांस एकमेकांचा पाडाव करण्याच्या हेतूनें तत्वज्ञानावरील वादविवाद वाचणें व ऐकणें अगदीं आवडत नसे. “ परधर्मो भयावहः ” पण परधर्माचीं मतें खोटीं पाडून दाखविण्याचा कोणी ग्रंथांमध्यें किंवा वाक्‌पांडित्यानें यत्न करीत असला तर, तितकी हिंमत, काळ व अक्कल त्या मनुष्यानें व्यर्थ खर्च

केली असें समजून त्याकडे नाना फार दुर्लक्ष करीत. ज्ञानाच्या कैफामध्यें नानांस बहुत प्रसंगीं मुग्ध बसण्याची फार आवड असे. सायंकाळीं पाच वाजतां फिरावयास जाऊन आल्यावर भोजनोत्तर १० वाजण्याच्या अगोदर कधींही नाना निजत नसत. तारुण्यांतला त्यांचा मानसिक तरतरीतपणा शेवटपर्यंत कोमेजला नाहीं, कारण ज्ञानेश्वरीच्या अनेक टीका ताडून पहाण्यांत त्यांचा वेळ जाई. अमृतानुभव वाचून त्यांतील अर्थगांभीर्यामध्यें तल्लीन होणें व त्यांतील शब्दलालित्याचें कौतुक करणें नानांस फारच आवडत असे. ब्रह्मचारीबुवांचा वेदोक्त धर्मप्रकाश ग्रंथ एकापेक्षां अधिक वेळ नानांनीं वाचला. प्राकृत ग्रंथावलोकन झाल्यावर तेवढ्यानेंच समाधान न पावतां त्यांनीं एक शास्त्री ठेवून त्यांचेपाशीं गीतामूळ वाचून शास्त्रीबावांखेरीज आपणच ते श्लोक ज्ञानेश्वरीमध्यें वाचावेत. दररोज दोनप्रहरीं दोनपासून चार वाजेपर्यंत गीतावाचनांत नानांचा वेळ जाई. - गुरुशिष्यांच्या गुणांची बेरीज शंभर झाली तर शिकणें उत्तम रीतीनें चालतें, नाहीं तर घोंटाळा. गुरूच्या अंगीं अध्यापकाचे गुण चाळीस असले आणि शिष्याच्या अंगीं अध्ययनाचे साठ असले तर अध्ययन सुरळीत चालतें. वाचनामध्यें येणाऱ्या गोष्टींतील कार्यकारणभावादि अनेक प्रकारचे प्रश्न शिष्यानें करावे व गुरूनीं त्याचा उलगडा करून द्यावा. शिष्यास अशा गोष्टींची कल्पनाच करतां न आली तर गुरूनीं आपण होऊन ते विचार शिष्याच्या मनांत भरून द्यावे म्हणजे काम झालें. परंतु उभयतांपैकीं कोणासच जर या

प्रकारचें वाचन करतां आलें नाहीं, तर मग पडली त्यांत माती. अस्तु, प्रत्येक श्लोकांतल्या धातुसमासादि सर्व गोष्टी मुखोद्गत ज्याला असत, ज्यानें लोकांना शेंकडो वेळां गीता शिकविली होती, ज्यानें गीतेवरील सटीक पुस्तकें आपल्या गुरूपाशीं अनेक वेळां वाचलीं होतीं व ज्याच्या अध्यापनपटुत्वाची त्यांच्यापाशीं अध्ययन करणारे वाखाणणी करीत असत, त्या शास्त्रीबावांना नानांच्या प्रश्नाचा झाल्यास घरीं उलगडा करावा लागे. आपल्या अडचणी दुसऱ्या दिवशीं शास्त्रीबावांनीं सुविचारास जुळतील अशा दूर केल्या तर आनंद प्रदर्शित करावा; नाहीं पेक्षां गप बसावें व पुढें सुरू करण्यास विनंति करावी. नानांचें याप्रमाणें शास्त्रीबुवांसमवेत सुमारें एक वर्षावर गीता व तसलेच ब्रह्मज्ञानविचारप्रचुर संस्कृत ग्रंथांचें अध्ययन चाललें होतें. शेवटीं एके दिवशीं शास्त्रीबावा नित्यक्रमाप्रमाणें वाचनास नानांच्या घरीं गेले तों महिना भरला नसतां, त्यांच्या हातावर नेमलेली रकम येऊन पडली व पुन्हा आमंत्रण पाठविल्यावर यावें असा निरोप आला. एकाएकीं वाचनक्रम बंद पडल्याबद्दल शास्त्रीबावांस मोठें नवल वाटलें; परंतु दोन दिवशीं चौकशीअंतीं नाना आजारी आहेत, त्यांस ताप आला असें समजलें. नानांचा ताप दोषी वाटल्यावरून आप्तसमूह घाबरला व नानांच्या शिलकी मुलांपैकीं वडील दीनानाथ यास कलकत्त्यास शंभर रुपयांची चाकरी होती, त्यास तार करून आणविण्याचा विचार नानांस कळविला. नानांनीं तार करून मुलास न घाबरविण्याविषयीं आग्रह

धरिला; असे चार दिवस लोटले. दीनाजीला तार केली. इ० स० १८९९ च्या मे महिन्याच्या १२ वे तारखेस रात्रौ ९ वाजतां नानांच्या आंगास अलोट घाम सुटला. दीनाजी आला नाहीं. मुलेंमाणसें घाबरलीं. नाना त्यांचें सान्तवन करतात, उष्णकाळ आहे, घाम यावयाचाच, धास्ती वाटण्याचें कारण नाहीं. तुमच्या मुलांस या उबाळया दिवसांत घाम येतो, त्या वेळीं तुह्मी अशींच घाबरतां का? दीना अद्याप आला नाहींना? याप्रमाणें चांगले शुद्धीवर आप्तमंडळीबरोबर बोलत असतां नऊ वाजून पंधरा मिनिटांनीं नानांचा शब्द बंद पडला. कोणापाशीं निरवानिरवीचा एक शब्दही नाहीं. मरण ह्मणजे देहविसर्जन, आपण आंगांतून आंगरखा काढून टाकतों, त्याप्रमाणें आत्म्याचें देह ठेवणें होय; एका खोलींतून दुसऱ्या खोलींत जाणें व मरणें यांत कांहीं फारसें अंतर नाहीं. तेव्हां मरणाची धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं, त्याच्याबद्दल फारशी तयारी करण्याचेंही कांहीं कारण नाहीं, अशी नानांची समजूत असे व तदनुसार लोकांशीं त्यांचा संवादही असे. "बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाउलें." शेवटपर्यंत नानांच्या बोलण्यांत व वागण्यांत फरक नाहीं हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल, हाच नानांच्या चरित्रापासून शिकण्यासारखा धडा. पाठारे प्रभूसमाजांतील आज एक तारा मावळला, त्याची जागा कोणी भरून काढील तो सुदीन.

समाप्त.